


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन



अनुक्रमणिका






# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

संपादक
डॉ. भालचंद्र फडके

प्रकाशक
वासू देशपांडे, कार्यवाह

मुद्रक
चिं. स. लाटकर
कल्पना मुद्रणालय

मुखपृष्ठ छायाचित्र ©
देवीदास बागूल

R. N. 6398/57

अनुक्रमणिका



Vishnu Krishna Chiplonkar

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

अंक १८९ : एप्रिल–मे–जून १९७४ मूल्य : तीन रुपये

संपादक : डॉ. भालचंद्र फडके

अनुक्रमणिका





वाङ्मयेतिहास प्रकाशन समारंभ प्रसंगी राजभवनमधील शामियानाचे प्रवेशद्वारात प्रवेश करीत असताना पंतप्रधान श्रीमती इंदिरा गांधी यांचे समवेत डॉ. भीमराव कुलकर्णी व श्री. मधुकाका कुलकर्णी



वाङ्मयेतिहासाचे खंड तयार झाल्यावर डॉ. भालचंद्र फडके यांनी खासदार श्री. कस्तुरे यांचे समवेत श्रीमती इंदिरा गांधी यांची भेट नवी दिल्ली येथे त्यांचे निवासस्थानी घेऊन त्यांना वाङ्मयेतिहासाचे खंड भेट दिले.

अनुक्रमणिका







महाराष्ट्र साहित्य संस्कृति मंडळ पुरस्कृत
महाराष्ट्र साहित्य परिषदेचे मुखपत्र

# महाराष्ट्र–साहित्य–पत्रिका






मूल्य : तीन रुपये

**अंक : १८९**
**चैत्र ते ज्येष्ठ शके १८९६**
**एप्रिल–मे–जून १९७४**
**प्रसिद्धी दिनांक ३ जुलै १९७४**

**संपादक**
**डॉ. भालचंद्र फडके**

प्रकाशक व मुद्रक : श्री. वासू देशपांडे, कार्यवाह, महाराष्ट्र साहित्य परिषद टिळक रस्ता, पुणे ३०. मुद्रक : श्री. चिं. स. लाटकर, कल्पना मुद्रणालय, पुणे ३०


अनुक्रमणिका






# संपादकीय



गतवर्षात ( १९७३–७४ ) ' पत्रिके 'चे तीन अंक आपल्या हाती देता आले. या तिन्ही अंकांचे रसिक वाचकांनी यथोचित स्वागत केले. कागदाची टंचाई, छपाई व अन्य खर्चातील अफाट वाढ याची झळ ' पत्रिके 'ला सोसावी लागत आहे. बदलत्या परिस्थितीनुसार ' पत्रिके 'ला आपला संसार थाटावा लागणार. या वर्षाचा पहिला अंक आपल्या हाती देताना आम्हाला अतिशय आनंद होतो आहे. मालाकारांचे मराठी भाषेवर आणि मराठी निबंधावर मोठे ऋण आहे. चिपळूणकरांच्या व्यक्तिमत्त्वाविषयी, त्यांच्या कर्तृत्वाविषयी खास लेख समाविष्ट करावेत या संकल्पाप्रमाणे लोकहितवादी, जोतिबा फुले, आगरकर, लो. टिळक यांच्याही निबंधाचे स्वरूप स्पष्ट करणारे लेख द्यावे आणि इंग्रजी राजवटीच्या प्रथम स्तबकातील निबंधाची जडणघडण कशी झालेली आहे त्याचे चित्र उभे करावे असा मनोदय होता. या दृष्टीने म. म. दत्तो वामन पोतदार, माधव मनोहर, दुर्गा भागवत, प्रा. व. दि. कुलकर्णी यांचे लेखन समाविष्ट करण्याचा प्रयत्न या ना त्या कारणाने सिद्धीस गेला नाही. पण मालाकारांच्या लेखनाचे स्वरूप व रहस्य ' विष्णुपदी ' या आपल्या ग्रंथात वाचकांच्या पुढे ठेवणारे ज्येष्ठ व्यासंगी संशोधक प्रा. श्री. ना. बनहट्टी, डॉ. सरोजिनी शेंडे, प्रा. कऱ्हाडकर, डॉ. भास्कर भोळे, डॉ. सुधाकर भोसले, डॉ. मनोहर अळतेकर इत्यादींच्या लेखनामुळे आमचा संकल्प थोडाफार साकार होऊ शकला. या सर्व लेखकांचे आम्ही आभारी आहोत.

## ' निबंधमालाकार ' विष्णुशास्त्री चिपळूणकरांना अभिवादन ! :

' निबंधमाले 'चा पहिला अंक २५ जानेवारी १८७४ रोजी प्रसिद्ध झाला. आज एक शतक लोटले. तरी अर्वाचीन गद्याचा पाया घालणाऱ्या शास्त्रीबुवांची ' निबंधमाला ' अद्याप टवटवीत आहे, ' मराठी भाषेची सांप्रतची स्थिती ' वर्णन करून मालाकारांनी महाराष्ट्राच्या वैचारिक प्रबोधनाच्या कार्यास आरंभ केला आणि ' आमच्या देशाची स्थिती ' स्पष्ट करून स्वमत प्रतिपादनाचा व परमतखंडनाचा आठ वर्षांचा उद्योग थांबविला. ४ जाने. १८८१ ते १४ मार्च १८८२ पर्यंत शास्त्रीबुवा

अनुक्रमणिका

' केसरी ' तून लिहीत होते. मृत्यूच्या मांडीवर चिरनिद्रा घेण्यापूर्वी ( १७ मार्च १८८२ ) ' मालाकारां'नी ' केसरी ' त ' देशोन्नती ' याविषयीचे विचार मांडताना लिहिले होते, " आमच्या देशात जन्मभूमीचा अभिमान शिथिल होण्यास या राष्ट्राचे विस्तीर्णत्व व जातिभेद ही दोन मोठी कारणे झाली आहेत " आणि तोड सुचविली होती की देशाभिमान आणि देशबंधुत्व वृद्धिंगत झाले तरच देश स्वतंत्र होईल व उत्कर्षापर्यंत जाईल. स्वभाषा, स्वधर्म आणि स्वदेश याबद्दलच्या अभिमानाची ज्योत प्रज्वलित करणाऱ्या शास्त्रीबोवांचे मोठेपण लो. टिळक, आगरकरांनी ओळखले होते. ता २२ मार्च १८८२ च्या केसरीतील अग्रलेखात श्री. गो. ग. आगरकर म्हणतात, " ज्याप्रमाणे प्रख्यात फ्रेंच ग्रंथकर्ता व्होल्टेर याने एकदा कोरडा उचलला म्हणजे स्टाकहोम व रोम आणि पीतर्सबर्ग व लिस्बन यांच्या दरम्यान चटसारी मंडळी चळचळ कापत असे, त्याप्रमाणे शास्त्रीबुवांनी लेखणी उचलली की रावसाहेब, रावबहादुरे रेवरंडे, सरस्वती – यांची पाचावर धारण बसे. आपल्या मागे आपले नाव चालविण्यास त्यांनी एक सप्तसंवत्सरा निबंधमाला कन्येखेरीज दुसरे काही ठेवले नाही. त्यांच्या त्या गद्य कृतीला ' स्फुरत्कलालापविलासकोमला ' हे बाण कवीचे वर्णन हुबेहूब लागते. कोणी एकदा शास्त्रीबोवांना असा प्रश्न केला की असे कडक लेख लिहिण्यास तुम्ही कसे धजता ? त्यावर त्यांनी असे उत्तर केले की अगोदर तुरुंगात एक पाय ठेवून मग आम्ही देशोन्नतीसाठी आपली लेखणी हाती घेतली. एखाद्या वेळेस त्यांचा कल्पनाविहंग पूर्ण पंख पसरून भराऱ्या मारू लागला म्हणजे त्याला हिंदुस्थान देश स्वतंत्र होऊन प्रजासत्ताक राज्याखाली सुखाने नांदत आहे असे दिसे. " लो. टिळकांनी तर ' केसरी ' च्या १९ मार्च व २ एप्रिल १९०१ च्या अंकातून चिपळूणकरांच्या कार्याचे यथायोग्य मूल्यमापन करताना म्हटले, " त्यांनी स्वभाषेची अभिवृद्धी करून आपल्या देशावर जे उपकार करून ठेविले आहेत त्यांच्या ऋणातून मुक्त होण्यास आम्हास पुष्कळ दिवस लागतील. "

विष्णुशास्त्री चिपळूणकरांचा जन्म १८५०त झाला. लेखन वाचनाचा नाद जबर १८६५त पहिली परीक्षा देऊन ते कॉलेजात गेले. १८७२ त ते बी. ए. झाले. १८७३ त काही महिने बाबा गोखले यांच्या शाळेत शिक्षकाचे काम केल्यावर ५।३।७३ रोजी पुण्याच्या सरकारी हायस्कूलात हंगामी सेकंड असिस्टंट मास्टर म्हणून रुजू झाले. या तात्पुरत्या जागेवर काम करताना त्यांना सरकार महिना नव्वद रुपये व दहा रुपये भत्ता म्हणून देत असे. वयाच्या तेवीसाव्या वर्षी नोकरी लागलेल्या शास्त्रीबोवांना सरकारी नोकरीत ' रस ' नव्हता. ' निबंधमाले 'चे कार्य जसजसे समोर येऊ लागले तसतसे स्वातंत्र्यशत्रू आणि स्तुतिप्रिय अधिकाऱ्यांशी त्यांचे तेढे पडू लागले आणि १ जाने ७८ रोजी त्यांची रत्नागिरी येथे बदली झाली. १ जून ते १५ जुलै ७८ आणि १३ एप्रिल ते १४ आक्टो १८७९ अशी रजा घेऊन त्यांनी डायरेक्टर ऑफ पब्लिक इन्स्ट्रक्शनच्या संमतीने राजीनामा दिला अशी म. म. दत्तो वामन पोतदार यांनी परिषदेकडे दिलेल्या

'सर्व्हिस बुका 'त नोंद आहे. सरकारी दास्याची रुपेरी बेडी तोडून स्वतंत्र झालेल्या चिपळूणकरांच्या लेखणीतली दाहकता त्यांच्या लेखनातून जाणवते. त्यांनी मराठी निबंधाला आगळेच तेज प्राप्त करून दिले. प्रतिपक्षावर कडाडून हल्ला करीत असता त्यांचे लेखन आक्रमक, लढाऊ पवित्रा घेई. एखाद्या प्रश्नाविषयी ते सर्वांगाने विचार करीत आणि जे लिहीत ते वाचकांना विचार करायला लावी. त्यांचा शब्द न शब्द देशहिताच्या तळमळीतून घडलेला असे. ५ एप्रिल १८८१ च्या 'केसरी 'त शास्त्रीबोवा लिहितात, "जो खरा देशहितेच्छु असेल त्याने 'भीड भिकेची बहीण' ही बिलकुल धरता उपयोगी नाही. त्यास जे जे दोष जेथे जेथे दिसतील, ते ते तेथल्या तेथे त्याने सर्व स्पष्टपणे सांगितलेच पाहिजे" स्वार्थासाठी खुशामत करणारी आणि दोषाविष्करण करण्यास भिगारी पत्रे देशास परम अहितकारक आहेत या निष्ठेने त्यांनी 'निबंधमाला' चालविली. तिचे ऋण मराठी भाषा, मराठी साहित्य व मराठी संस्कृतीचे संवर्धन करणारा मराठी माणूस अमान्य करणे कधीच शक्य नाही.

## साहित्यिकांना पुरस्कार

एप्रिल १९७२ ते मार्च १९७३ या कालावधीत प्रसिद्ध झालेल्या मराठी साहित्य-कृतींना महाराष्ट्र शासनाने पारितोषिके देऊन गौरविलेले आहे. या सर्व पुरस्कार मिळालेल्या लेखकांचे मनःपूर्वक अभिनंदन! विशेषतः 'लोकशाहीचा कैवारी' म्हणून बॅ. नाथ पै यांचे सुरेख चरित्र परिषदेचे कार्यवाह श्री. वासू देशपांडे यांनी लिहिले आणि पारितोषिकाचा मान मिळविला याचा आम्हांस विशेष आनंद होतो. पारितोषिक विजेत्यात प्रा. भालचंद्र बा. केळकर, डॉ. यू. म. पठाण, राजा मंगळवेढेकर, वऱ्हाडपांडे, इ. परिषदेच्या सदस्यांचा समावेश आहे याचा आम्हाला अभिमान वाटतो.

गाडगीळ—गोखले यांच्यानंतर मराठी कथेला नवे रूप लाभले ते जी. ए. कुलकर्णी यांच्या कथालेखनामुळे! 'निळासावळा' ते 'काजळमाया' असा त्यांचा कथालेखनाचा प्रवास! भारतीय साहित्य अकादमीने त्यांना पारितोषिक देऊन गौरविले हे उचितच झाले. जीवनाच्या दुःखमयतेची, त्याच्या शोकात्मतेची जाणीव व्यक्त करणारी त्यांची कथा अतिशय देखणी, झपाटून टाकणारी, भारावून टाकणारी अशी. जी. ए. चे कथाविश्व माणसाला हरवून टाकणाऱ्या भयाण, दाट, विस्तीर्ण जंगलासारखे! त्यांची प्रत्येक कथा म्हणजे एक अनोखा, अस्वस्थ करणारा, अंतर्मुख करणारा अनुभव! अशा एका श्रेष्ठ कथालेखकाचा सन्मान झाला याचा आनंद.

## सोलापूरचे जिल्हा साहित्य संमेलन :

एप्रिलच्या २७ व २८ तारखेला पुणे विद्यापीठाच्या मराठी विभागाचे प्रमुख व ज्येष्ठ








समीक्षक डॉ. रा. शं. वाळिंबे यांच्या अध्यक्षतेखाली सोलापूर येथे जिल्हा साहित्य संमेलन यशस्वीरीत्या पार पडले. महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या सोलापूर शाखेने, जिल्ह्यातील प्रत्येक तालुक्यात मराठी साहित्य संमेलन भरविण्याचा उपक्रम सतत १२ वर्षे चालविला आणि या वर्षी गीतरामायणकार कविराज ग. दि. माडगूळकर यांचे आशीर्वाद घेऊन चांगल्या प्रथेचे पुनरुज्जीवन केले. या संमेलनाचे स्वागताध्यक्ष होते. श्री. गंगाधरपंत कुचन ! ते म्हणाले, "आज मराठी तेलगू, उर्दू, हिंदी, गुजराथी व सिंधी भाषिकसुद्धा या सोलापूर शहरात गुण्यागोविंदाने नांदत आहेत." इतकेच नव्हे तर ही विविध भाषा बोलणारी मंडळी मराठी साहित्याच्या प्रेमाने एकत्र आली होती, साहित्यातील नव्या जुन्या प्रवाहांची चिकित्सा करीत होती. द. मो. दामले, शं. गो. पटवर्धन, बाबूराव जक्कल, जामदार, वकील या वृद्ध पिढीबरोबर प्रा. गांधी, प्रा. हिरेमठ, श्री. छत्रपती गुरुजी, शाह, इ. नवी पिढी तितक्याच उत्साहाने संमेलनाच्या यशासाठी धडपडत होती. उद्घाटक अध्यक्षांची भाषणे, काव्यवाचन, परिसंवाद, परस्पर परिचय, व्याख्याने असा भरगच्च' कार्यक्रम श्रोत्यांच्या उपस्थितीत पार पडला. अशा जिल्हा पातळीवर भरलेल्या लेखक-वाचक प्रकाशकांच्या मेळाव्यानूनच साहित्याची भक्ती वाढत असते, साहित्याविषयक जाण निर्माण होत असते. या निमित्ताने प्रा. रतनचंद गांधी यांनी संपादिलेली 'स्मरणिका' वाचीत असताना सोलापूर जिल्ह्यातील साहित्यसेवकांचे मनोगत स्पष्टपणे लक्षात येते.

## कै. के. नारायण काळे :

श्री. के. नारायण काळे नुकतेच कालवश झाले. त्यांचे नाव घेताच 'यशवंत–रत्नाकर' मासिकांचा काळ व त्या काळातील वाङ्मयविषयक उत्साहाचे वातावरण स्मरते. हे वातावरण विविध वाङ्मय प्रकारांनी घेतलेल्या रूपांमुळे, चिकित्सक टीकालेखनामुळे तयार होत होते. 'रत्नाकर'च्या शेवटच्या दिवसांत त्याचे संपादन काही काळ श्री. काळे करीत होते. नंतर 'प्रतिभा' पाक्षिकाच्या संपादकमंडळात ते आले आणि महाराष्ट्र साहित्य पत्रिकेचे संपादन प्रथम त्यांनी जानेवारी १९४० ते ऑक्टोबर १९४२ या काळात केले. त्यानंतर पुनः एप्रिल १९४६ ते ऑगष्ट १९४६ पर्यंत आणि जुलै १९६५ ते मार्च १९७० अशा दीर्घकालात त्यांनी पत्रिकेचे संपादन अतिशय कुशलतेने केले. जवळ जवळ वीस अंकांचे त्यांनी संपादन केले. हे अंक वाचीत असताना त्यांच्या चिकित्सक टीकादृष्टीचा, पाश्चात्त्य साहित्याच्या व साहित्यविचाराच्या परिशीलनामुळे आलेल्या डोळसपणाचा प्रत्यय येतो. तसे त्यांचे लेखन विविध नियतकालिकांतून विखुरलेले ! 'नाट्यविमर्श' या संग्रहात त्यांचे नाट्य व रंगभूमीविषयक लेखन एकत्र वाचायला मिळते आणि अगदी अलीकडे प्रा. जोग संपादित मराठी वाङ्मयाच्या इतिहासाच्या पाचव्या खंडात त्यांचे १८७४ ते १९२० या कालखंडातील

'नाटका 'विषयीचे विवेचन विशेष महत्त्वाचे आहे. कारण श्री. काळे नाट्य व चित्रपट क्षेत्रात जवळ जवळ तीस – पस्तीस वर्षे वावरले. आपल्याला पडलेल्या प्रश्नांची उत्तरे स्वतंत्रपणे शोधून काढण्याची त्यांना तळमळ होती. वाङ्मयविषयक किंवा रंगभूमीविषयक कोणताही प्रश्न असो, त्या प्रश्नांविषयी त्यांचे विवेचन मूलगामी असे. रूढमतापेक्षा निराळी मते कोणाला पटो वा न पटो ते प्रमाणपूर्वक मांडीत. ते नव्या नाट्याचे भाष्यकार होते, रंगभूमीचे निष्ठावंत उपासक होते व वाङ्मयविषयक नव्या प्रवृत्तींचे पुरस्कर्ते होते.

## कै. शंकर केशव कानिटकर उर्फ कवी गिरीश :

'रविकिरण मंडळा 'ची कविता हा आधुनिक मराठी कवितेतील एक महत्त्वाचा टप्पा होय. 'रविकिरण मंडळा 'चा एक महत्त्वाचा आधार नुकताच कालवश झाला. एक प्रसन्न कवी, विद्यार्थ्यांना आईची माया आणि पित्याचे प्रेम देणारा अध्यापक असा त्यांचा लौकिक होता. त्यांचे जीवन कृतार्थ होते. त्यांची कविता त्यांच्या जीवनाची साक्षी आहे. अभागी कमल, आंबराई यांसारखी त्यांनी खंडकाव्ये लिहिली, स्फुट कविता विपुल लिहिली. आपल्या काव्यगायनाने त्यांनी पांढरपेशा कुटुंबातून मराठी कवितेची आवड वाढविली. रविकिरण मंडळाच्या अन्य कविमित्रांप्रमाणे गिरीशांचा भर काव्यरचनेतील प्रयोगावर, जाणिवपूर्वक निर्मितीवर परिष्करणांवर होता. गिरीशांचे काव्यविषय प्रापंचिकांच्या परिचयाचे असत. त्यात जीवनाच्या विविध क्षेत्रांतील आदरणीय व्यक्ती होत्या, मनाला सुखविणारी रम्यस्थळे होती, सामाजिक चालीरीती होत्या, नामवंत संस्था होत्या. त्यांची कविता श्रुतिसुभगता आणि रचना–सौष्ठवामुळे लक्षणीय वाटे. आजही सारंगीवाला, गाणाऱ्या मोहिनीस, कृतज्ञता इ. कविता गाऊन सभेला मंत्रमुग्ध करणारी त्यांची मूर्ती डोळ्यासमोर येते. गिरीशांनी संकटे सोसली होती पण त्यांच्याशी झगडा देत देत ते सुख मिळवू शकले. त्यांनी 'गृहस्थधर्म' आचरिला. माणसं जोडली, मोठा परिवार गोळा केला. कविता लिहिली, कविता मनसोक्त गाऊन दाखविली आणि कविता तृप्त होईपर्यंत ऐकली. एक कृतार्थ जीवितयात्रा अखेर संपली!

## समाजशिक्षक श्री. कृ. भा. वावर :

एखादे विशिष्ट उच्च ध्येय डोळ्यांसमोर ठेवून त्या दिशेने सतत निरपेक्षबुद्धीने काम करणाऱ्या तपस्वी समाज सेवकांची महाराष्ट्रात तरी वाण नाही. ९ जून १९७४ रोजी कालवश झालेले एक नामवंत समाजशिक्षक आणि परिषदेवर प्रेम करणारे आजीव सदस्य श्री. कृ. भा. वावर हे असेच एक नंदादीपाप्रमाणे तेवत राहिलेले व्यक्तिमत्त्व! तीन तपांचे दीर्घ शैक्षणिक कार्य करून श्री. वावर शिक्षक म्हणून निवृत्त झाले. पण त्यानंतर समाजशिक्षणाच्या कार्याला त्यांनी वाहून घेतले. ज्ञानसाधन, ज्ञानदान आणि समाज-सेवा करीत ते खऱ्या अर्थानं जगले. आपणास जे जे ठावे ते ते प्रौढ साक्षरास समजून

सांगावे या हेतूनं त्यांनी १९५० च्या दसऱ्यापासून ' समाज शिक्षण माला ' सुरू केली. या मालेतून त्यांनी लहानमोठ्या लेखकांची एकूण २८४ पुस्तके विविध विषयांवर प्रसिद्ध केली. " शिवाजी महाराजांचा राज्यकारभार " हे त्यांचे अखेरचे पुस्तक. लोकशिक्षणाशिवाय लोकशाही यशस्वी होणार नाही आणि लोकशिक्षण लोकभाषेतूनच होणे आवश्यक आहे ही श्रद्धा मनी बाळगून त्यांनी या मालेत जवळ जवळ सव्वाशे छोटी पुस्तके लिहिली. अंधश्रद्धा, अज्ञान समाजातून दूर व्हावे म्हणून वाणी आणि लेखणी राबवणारे एक व्रतस्थ, प्रेमळ गृहस्थ म्हणजे श्री. अण्णासाहेब बाबर !

## कै. आनंद रामकृष्ण नाडकर्णी :

" ज्ञानेश्वरी ' हा मराठीतील अनेक संशोधकांचा चिंतनाचा विषय आहे. कै. आनंद रामकृष्ण नाडकर्णी यांचा " ज्ञानेश्वरीतील लुप्त शब्दांचा कोकणी बोलीत शोध " या नावाचा हस्तलिखित प्रबंध पाहण्यात आला. श्री. नाडकर्णी यांची जन्मभूमी आणि कर्मभूमी कारवार ! शिक्षक, विमा एजंट, स्वतंत्र व्यवसाय अशा विविध भूमिका करीत करीत नाडकर्णी कारवारच्या सार्वजनिक जीवनात अधिक स्थिर झाले. कारवार, काळी ते गंगावळी, कद्रेकर नाडकर्णी इतिहास, शिव महिम्न स्तोत्राचा मराठी अनुवाद ही त्यांची काही पुस्तके. ज्ञानेश्वरीचे अध्ययन करून करीत असता कोकणी बोलीत शोध घेण्याची त्यांना इच्छा झाली. लुप्त शब्दांचा शोध घेण्यासाठी श्री. नाडकर्णी यांनी गोमंतकीय कोकणी, कारवारी कोकणी आणि मंगळुरी चित्रापुरी कोकणी अशा तीन बोलींचा स्वीकार केला आहे. चर्चा करण्यासाठी घेतलेला शब्द असलेल्या ज्ञानेश्वरीतील ओव्या किंवा वानगी दाखल चरण, संपादकांनी त्या शब्दाचा वेगळ्या जागी वेगळा अर्थ केलेला असल्यास ते भिन्न अर्थ, कोकणी बोलीतील त्या शब्दाचा रूढ अर्थ, त्या रूढ अर्थाने तो शब्द वापरल्याची कोकणी साहित्यातून अवतरणे आणि असा अर्थ स्वीकारल्यास मूळ ओवीच्या आशयात होणारा फरक अशा पद्धतीची मांडणी आहे. कळांतर ( व्याज ), कन्हा ( उंट ), कोंड ( खड्डा ), खर ( कठीणपणा ), खांड ( तलवार ), गोंधुळूक ( सूर्यास्ताची वेळ ), आस्थान ( बैठक ) इत्यादी शब्दांची त्यांनी केलेली चर्चा लक्ष वेधून घेते.

**भालचन्द्र फडके**

अनुक्रमणिका






# प्रकाशन समारंभ



## मराठी वाङ्मयाचा इतिहास खंड ३, ४ व ५

महाराष्ट्र-साहित्य-परिषदेच्या वाङ्मयेतिहास समितीची अशी इच्छा होती की नव्याने तयार झालेल्या मराठी वाङ्मयेतिहासाच्या तिसऱ्या, चौथ्या व पाचव्या खंडाचे प्रकाशन भारताच्या पंतप्रधान श्रीमती इंदिरा गांधी यांच्या हस्ते व्हावे आणि या निमित्ताने परिषदेच्या कार्याचा त्यांना परिचय करून द्यावा. त्यांनी पुण्यास यावे म्हणून प्रयत्न चालू होता, पत्रव्यवहार होत राहिला पण त्यांच्या भेटीचा योग या ना त्या कारणाने जुळून आला नाही. पुणे विद्यापीठाच्या रौप्यमहोत्सव प्रसंगी डि. लिट् पदवीचा स्वीकार करण्यासाठी श्रीमती इंदिराजी येणार असे ठरत होते. तेव्हा परिषदेचे पदाधिकारी व वाङ्मयेतिहास समिती यांनी निर्णय घेतला की वाङ्मयेतिहासाचे तयार झालेले खंड श्री. इंदिरा गांधी यांना अर्पण करावे व पुणे भेटीत त्यांच्या हस्ते प्रकाशन समारंभ व्हावा असा परिषदेचा मनोदय व्यक्त करावा. म्हणून 'पत्रिके'चे संपादक यांनी त्यांचे विद्यार्थी-मित्र लोकसभासदस्य खासदार कस्तुरे (बुलढाणा) यांच्या समवेत श्रीमती इंदिरा गांधी यांची त्यांच्या निवासस्थानी भेट घेऊन २१ डिसेंबर ७३ रोजी वाङ्मयेतिहासाचे खंड अर्पण केले व कार्यक्रमाचा समावेश करण्याबद्दल अनुमती मिळविली.

पुणे भेटीचा कार्यक्रम ठरला त्यावेळीं देशातील परिस्थिती बदलत चालली होती. पुण्यातील वातावरण चिंताजनक होते. पण ६ एप्रिल ७४ रोजी राजभवनावर खास मंडप उभा करून कार्यक्रम पार पाडावा असे ठरले. इच्छा असूनही सर्वांना निमंत्रणे पाठविता येणे अशक्य होते. कार्यक्रमाच्या पूर्वतयारीसाठी कार्याध्यक्ष डॉ. भीमराव कुलकर्णी आणि विशेषतः कार्यवाह आणि वाङ्मयेतिहास समितीचे निमंत्रक श्री. रा. ज. देशमुख, कोषाध्यक्ष श्री. मधुकाका कुलकर्णी, कार्यवाह वासू देशपांडे आणि अन्य कार्यकर्ते सतत पंधरा दिवस राबत होते. राज्यपाल श्री. अलीयावर जंग, सौ. अलियावर जंग, राजभवनातील सेवक, सुरक्षाधिकारी, शासकीय अधिकारी इ० अनेकांच्या सहकार्याने पुष्पमालांनी सजलेला भव्य रंगमंच, सभागृह पंतप्रधानांच्या स्वागतासाठी सिद्ध झाले.

अनुक्रमणिका

६ एप्रिल ७४! सकाळी विमानतळावर अध्यक्ष डॉ. रा. शं. वाळिंबे यांनी पुष्पमाला घालून पंतप्रधानांचे स्वागत केले. समवेत कार्याध्यक्ष, कोषाध्यक्ष, कार्यवाह होते.

दुपारी तीन वाजण्याचा समय सनईच्या मंजुळ सुरावटीनं वातावरण भरून गेले. वाङ्मयेतिहासाच्या विविध खंडांतून लेखन करणारा लेखक वर्ग, केसरी, सकाळ, विशाल सह्याद्री, तरुण भारत इ. पत्रांचा संपादक वर्ग, कादंबरीकार, कथालेखक, संशोधक, इतिहासतज्ज्ञ, कवी, साहित्यसंमेलनाचे माजी अध्यक्ष, माजी मंत्री इ. निवडक व्यक्ती आसनस्थ होत होत्या. साहित्यिकांच्या समुदायातून अभिवादन करीत झपझप पावले टाकीत पंतप्रधान रंगमंचावर गेल्या. त्यांच्या मागोमाग राज्यपाल अलियावर जंग, मिसेस जंग, मुख्यमंत्री श्री. वसंतराव नाईक, सौ. वत्सलाबाई नाईक, शिक्षणमंत्री डॉ. अनंत नामजोशी, केन्द्रीय मंत्री रघुनाथराव खाडिलकर, केन्द्रीय नियोजन राज्यमंत्री मोहनभाई धारिया, ट्रस्टी श्री. विठ्ठलराव घाटे, ट्रस्टी व साहित्य व संस्कृती मंडळाचे अध्यक्ष तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी, परिषदेचे अध्यक्ष डॉ. रा. शं. वाळिंबे, वाङ्मये-तिहास खंडाचे संपादक प्रा. रा. श्री. जोग, कार्याध्यक्ष भीमराव कुलकर्णी, कार्यवाह श्री. वासू देशपांडे रंगमंचावरील आपापल्या जागी आसनस्थ झाले. परिषदेचे आद्य प्रेरणास्थान न्या. महादेव गोविंद रानडे यांच्या प्रतिमेला हार घालून पंतप्रधानांनी पूजन केले. श्री. उषाचिपलकट्टी यांच्या मधुर स्वरात पसायदान सुरू झाले. उपस्थितांचे स्वागत करून डॉ. रा. शं. वाळिंबे म्हणाले, "१९०६ साली परिषदेची जेव्हा स्थापना झाली तेव्हा 'महाराष्ट्र सारस्वत'कार विनायक लक्ष्मण भावे, 'आनंद'कार वासुदेव गोविंद आपटे, आणि नाट्याचार्य कृष्णाजी प्रभाकर खाडिलकर हे तिघे परिषदेचे चिटणीस होते. या तीन थोर पुरुषांचा नुसता नामनिर्देश सुद्धा महाराष्ट्र–साहित्य–परिषदेला सुरुवातीपासून मिळालेला ध्येयवादाचा बहुमोल वारसा स्पष्ट करावयास पुरेसा आहे. मराठी भाषेची वाढ चांगल्या रीतीने होण्यासाठी ज्या साधनांची आवश्यकता आहे ती साधने गोळा करणे हे परिषदेचे मुख्य कार्य आहे. या मुख्य कार्याच्या अनुरोधाने मराठी लेखकांची संमेलने भरविणे, सर्व मराठी ग्रंथांचा संग्रह करणे, अप्रकाशित मराठी काव्यांचा व ऐतिहासिक कागदपत्रांचा संग्रह करून त्यांच्या प्रसिद्धीची व्यवस्था करणे, साहित्यचर्चेसाठी मासिक किंवा त्रैमासिक काढणे, मराठी भाषेचा कोश तयार करणे, लेखकांना बक्षिस देऊन त्यांच्याकडून ग्रंथ तयार करवून घेणे, मराठी भाषेच्या व्याकरणाविषयी चर्चा करणे, हिंदुस्थानात निरनिराळ्या प्रांतांमध्ये स्थायिक झालेल्या मराठी बोलणारांचा परस्पर परिचय वाढविणे इत्यादी विविध कार्य करणे हे परिषदेचे उद्दिष्ट होते. याच उद्दिष्टाच्या सफलतेसाठी गेली अड्डसष्ट वर्षे परिषदेचे कार्यकर्ते आपल्या सामर्थ्यानुसार कार्य करीत आले आहेत."

परिषदेचे कार्याध्यक्ष डॉ. भीमराव कुलकर्णी या समारंभास पंतप्रधान उपस्थित राहिल्या याबद्दल आनंद व्यक्त करून म्हणाले,

"ह्या खंडांच्या संपादनार्थ प्रा. जोगांसारखे साक्षेपी संपादक लाभले. अनेक प्रकारच्या प्रतिकूल परिस्थितीतून मोठ्या धीमेपणाने त्यांनी हे कार्य पुरे केले आहे. सोळा-सतरा वर्षे एका विलक्षण आत्मीयतेने त्यांनी या कार्याकडे लक्ष दिले. त्यांची सूक्ष्म व चोखंदळ समीक्षादृष्टी आणि त्यांचे अभिजात सौजन्य यांमुळेच हे महत्त्वाचे कार्य पार पाडू शकले. सोळा वर्षे केलेल्या या संपादनकार्याचे आम्ही देऊ केलेले मानधन त्यांनी परिषदेला देऊन टाकले आहे. त्यांच्या या देणगीचे मोल परिषदेच्या लेखी फार मोठे आहे. परिषद त्यांची चिरंतन ऋणी आहे.

हे खंड सिद्ध होण्यासाठी अनंत हस्तांचे अनंत प्रकारे साहाय्य आहे. त्या साऱ्यां-बद्दल मी हार्दिक कृतज्ञता व्यक्त करीत आहे. महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाचे अध्यक्ष तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी, त्यांचे सहकारी आणि मंडळाचे सदस्य यांचे सुरुवातीपासूनचे प्रोत्साहन, मार्गदर्शन व मंडळाने दिलेले अनुदान यांचे या खंडांच्या निर्मितीमागे फार मोठे पाठबळ आहे. वाङ्मयेतिहास समितीचे निमंत्रक श्री. रा. ज. देशमुख यांनी चार वर्षे सातत्याने या कार्याचा पाठपुरावा केला याचेही मोल मी जाणतो."

पंतप्रधान श्रीमती इंदिरा गांधी यांनी वाङ्मयेतिहास खंडांचे संपादक प्रा. रा. श्री. जोग यांचा शाल, श्रीफल, पुष्पहार समर्पण करून सत्कार केला आणि वाङ्मयेतिहासाच्या तीन, चार व पाच अशा खंडांचे प्रकाशन केले. सत्काराला उत्तर देताना प्रा. रा. श्री. जोग म्हणाले,

" प्रस्तुत संपादनाचे कार्य केल्याबद्दल परिषदेने माझा सत्कार केला आहे. काही प्रमाणात ते कार्य अकरणरूप होते. म्हणजे असे की मला माझ्या कामाबद्दल मिळावयाचा मेहनताना मी न घेता परिषदेस परत केला, साहित्यिक या नात्याने मी या परिषदेतच लहानाचा मोठा झालो. त्याबद्दल वाटणाऱ्या कृतज्ञतेच्या पोटी मी हे केले. त्याबद्दल, म्हणजे कर्तव्यपूर्तीबद्दल सत्कार करण्याचे खरोखरच कारण नव्हते. मात्र माझे लक्ष आजच्या या सत्कारापेक्षा पुढे होणाऱ्या टीकेकडे आहे. महाराष्ट्रातील स्पष्टवक्ते विद्वान याचा योग्य तो समाचार घेतील यात मला शंका वाटत नाही.

उरलेल्या खंडांचे संपादन करण्यास मजपेक्षा अधिक अधिकारी व्यक्ती पुढे येत आहेत. त्यांच्याकडून ते काम त्वरित सिद्धीस गेलेले मला पहावयास मिळो यापेक्षा अधिक काही माझे मागणे नाही."

यानंतर पंतप्रधान श्रीमती गांधी भाषण करावयास उभ्या राहिल्या. उपस्थित साहित्यि-कांविषयी आपल्या शुभकामना व्यक्त करून त्या म्हणाल्या, 'वाङ्मयेतिहास सिद्ध करण्याचे महत्त्वाचे कार्य आपण केले आहेत. मराठी भाषा मी तितकी चांगली जाणू शकत नाही. यामुळे मला त्याचा आस्वाद घेता आला नाही. पण साहित्याविषयी मला प्रेम आहे. साहित्याच्या द्वारा त्या त्या प्रदेशाचे मनोगत व्यक्त होत असते. म्हणून

अनुक्रमणिका

जनतेचे मन जाणून घ्यायचे तर साहित्य अभ्यासिले पाहिजे. जातिवंत लेखक संस्कृतीचे, जीवनाचे दर्शन घडवीत असतो, माणुसकीचा शोध घेत असतो.

प्रत्येक प्रदेशाचे स्वतंत्र व्यक्तिमत्त्व असते आणि ते त्या प्रदेशाच्या भाषेतून व्यक्त होते. मला तर माणसाचा चेहरा पाहून तो कोणत्या प्रदेशाचा हे बरोबर ओळखण्याची सवय आहे. एखादद्दुसरी चूक होते. मला वाटते की हा देश केवढा अफाट पण विविधतेतच एकतेचे सूत्र मला गवसते. महाराष्ट्र व बंगाल हे असे दोन प्रमुख प्रांत आहेत की जेथे साहित्यनिर्मिती विपुल आहे. वेगवेगळ्या भाषांतून साहित्य मराठीत अनुवादले जाते. मराठी नाटक तर सर्व भारतात वैशिष्ट्यपूर्ण आहे. तुम्ही साहित्याचा इतिहास निर्माण करीत आहात त्याचा परिचय इतर सर्व भारतीय भाषांना झाला पाहिजे म्हणजे त्यांना मराठी माणसाच्या आशा-आकांक्षा कळतील.

मला वाटते की बुद्धिवंत हे कोणत्याही समाजाचे प्राण असतात. त्यांचा विचार समाज घडवितो. त्यांची दृष्टी काळाच्या पुढे धावत असते. ते समाज पाहतात, त्याचे मनोगत जाणतात म्हणूनच त्यांना स्वतंत्र विचाराने त्यांच्या मनाची मशागत करता येते.''

छोटेसे पण मनापासून केलेले भाषण संपले. सनईचे सूर दरवळू लागले. पंतप्रधान सर्वांचा निरोप घेत, मध्येच माणिकताई पटवर्धन आणि काही जुन्या परिचितांचे कुशल विचारीत आपल्या निवासस्थानी जातात.



अनुक्रमणिका

# ' दादा '



## पु० ल० देशपांडे

कवी गिरीशांना त्यांची मुले दादा म्हणायची. गिरीशांशी माझा ऋणानुबंध विद्यार्थी म्हणूनच जुळून आला आणि मीही त्यांना दादाच म्हणायला लागलो. वास्तविक ही विद्यार्थिदशा मी आपण होऊन ओढून घेतली होती. आपण एम्. ए. झाल्याशिवाय काही खरे नाही अशी एक इच्छा बी. ए. होऊन काही वर्षे लोटून गेल्यावर माझ्या मनात उड्या मारायला लागली होती. त्या वेळचा माझा सिनेमाचा व्यवसाय संभाळून एम्. ए. च्या टर्म्स भरणे मला शक्य नव्हते. पण सांगलीच्या विलिंग्डन् कॉलेजात दर सहामाहीला ओळीने आठ-दहा लेक्चर्स अशा रीतीने चार सत्रांना हजेरी लावली की, एम्. ए. च्या सगळ्या टर्म्स भरल्याची पुण्याई पदरात पडते असे मला कळले. त्या काळी गिरीश तिथे मराठीचे प्राध्यापक होते. मी त्यांना माझी इच्छा कळवली. त्यांचा आणि माझा त्यापूर्वीपासूनचा परिचय होता. त्यांनी उलट टपाली मला केवळ उत्तरच नाही तर अर्जाचा फॉर्मही पाठवून दिला. त्या पत्रातले ' नाऊ ऑर नेव्हर ! ' हे शब्द मला आजही लक्षात आहेत.

पहिल्या सत्राला हजरी लावण्यासाठी म्हणून मी विश्रामबाग स्टेशनात पहिल्यांदा उतरलो तेव्हा स्वागताला फलाटावर स्वतः गिरीशच हजर. टुमदार रेल्वे-स्टेशन ही मला अतिशय आवडणारी गोष्ट आहे. चिमुकल्या नदीच्या टुमदार घाटासारखी. ठराविक वेळी जराशी गजबजणारी आणि इतर वेळी शांत पडणारी ! मी एम्. ए. च्या वर्गातला विद्यार्थी म्हणून येणार असल्याची बातमी स्टेशनमास्तरनाही लागली असावी. ' पुढच्या पावलांत ' हंसा वाडकरबरोबर हीरोचं काम करणारा माणूस लाईन बदलून एम्. ए. व्हायला येणं हे प्रा० शं० के० कानेटकरांच्या दृष्टीने कितीही स्वागतार्ह असले तरी स्टेशनमास्तरांच्या हिशेबी रेल्वेच्या जनरल मॅनेजरने हेडहापिस सोडून राजेवाडी स्टेशनात अंजीर विकायला उभे राहण्यासारखे होते.

विद्यार्थ्याच्या स्वागताला त्याच्या वयोवृद्ध प्राध्यापकाने येण्याच्या घटनेने मी जरासा ओशाळलो.

" याऽ ऽ " दादा म्हणाले. मला वाटते की टागोरांनीच कुठेसे म्हटले आहे की,

अनुक्रमणिका

त्यांच्या कुठल्या तरी स्नेह्याच्या 'आश्रून ' (या) मध्येच पंचपक्वान्नांच्या भोजनासकट केलेले आदरातिथ्य भरलेले असायचे. दादांच्या घरी येणाऱ्या प्रत्येक अभ्यागताला ते असेच 'याऽऽ' म्हणायचे. पण काही दिवसांनी माझ्या लक्षात आले की, त्यांच्याकडून अतिशय जिव्हाळ्याने स्वागत व्हायचे ते त्यांच्या विद्यार्थ्यांचे. शिक्षक आणि विद्यार्थी हे नाते त्यांना फार सुखवून जायचे. शाळेत ते फार 'कडक' मास्तर होते म्हणतात. असतीलही. कारण कडकपणा हे त्या काळी 'गुरू आणि आपुला बाप' ह्यांचे व्यवच्छेदक लक्षण होते. माझा मात्र दादांच्या बाबतीतला अनुभव अगदी निराळा होता. एम्. ए. च्या परीक्षेसाठी अभ्यास करावा लागेल अशी दहशत त्यांनी मला कधीच घातली नाही. उलट 'हा अभ्यास तुमचा तुम्हीच करा' असाही गुरूपदेश दिला होता.

विश्रामबाग स्टेशनसमोरच त्यांचे घर होते. माझा बाडबिस्तारा थेट तिथे न्यायला लावला. माईंना म्हणाले, "ह्यांचा सिनेमा आपण पाहिलाय्...आता विद्यार्थी म्हणून आले आहेत." आणि माईंनी मला बसण्यासाठी स्वयंपाकघरांतच पाट मांडला. त्या स्वयंपाकघरात नातवंडे दुडदुडत होती. मोठ्या सूनबाई स्टोव्ह पेटवण्याच्या तयारीत होत्या. मधू, वसंता वगैरे गिरीशांच्या चिरंजीवांचीही माझी तशी आधीचीच ओळख होती. 'धन्यो गृहस्थाश्रमः' असे पदोपदी वाटावे अशा स्वरूपाचे ते घर. त्या घराने पाहता पाहता मला आतस्वकीय करून टाकले.

पाहुण्यांचे परकेपण घालवून टाकायची त्या घराला सवयच जडलेली असावी. माझ्या मनात गिरीशांची प्रतिमा आहे ती गृहस्थधर्माला अग्रहक्क देणाऱ्या कुटुंबप्रमुखाची.

'हृन्मंदिरि संसृतिशरस्वागत
हसतचि करिती कुटुंबहितरत
गृहस्थ जे हरि उरात रिझवत
सदनी फुलबागा रचिती...

ह्या कवी बोरकरांच्या व्याख्येत बसणाऱ्या गृहस्थाची. त्यांचा आणि माझा ते प्राध्यापक आणि त्यांच्या वर्गात बसलेला मी विद्यार्थी असा फारसा संबंधच आला नाही त्यांनी पहिल्या भेटीतच वर्गातली माझी हजेरी 'ऐच्छिक' करून टाकली होती.

"ह्या निमित्ताने आमच्या घरी तुमचा मुक्काम आठ-दहा दिवस पडत जाईल. अट एकच. तुम्ही असताना रोज संध्याकाळी गाणे-बजावणे झाले पाहिजे."

दादांना गाण्याची खूप आवड. आपल्या मोठ्या मुलाची – मधूची – गाण्याची आवड पाहून त्यांनी त्याला कोल्हापूरला भूर्जीखाँसाहेबांचा गंडाबंद शागीर्द करून गाणे शिकण्यासाठी तिथे ठेवले होते. बी.एस्सी. होऊ घातलेल्या आपल्या थोरल्या मुलाला इतक्या हौसेने गवयीबुवाचा बेहिशेबी व्यवसाय करायला परवानगी देणारे दादा हे आमच्या समकालीनांच्या 'बापा'तले एकमेव अपवाद असावेत. आपल्या थोरल्या

मुलाच्या पदरात पदवी पडली की, त्याला एकदाचे कुठेतरी चिकटवून टाकणे हे सर्व-सामान्य धोरण असताना खुशाल त्याला 'गवई हो' म्हणून उस्तादाकडे तालीम घ्यायला पाठविणे हे एक लहानसे बंडच होते. एरवी मात्र ते कुठल्याच अर्थाने बंडखोर नव्हते. खरे म्हणजे "सांभाळून जगावे" हेच आम्हा मध्यमवर्गीयांचे ब्रीद असते. जे जे म्हणून सांभाळायचे असते त्याची यादी बरीच लांब असते. तेव्हा 'बंड' वगैरे शब्द आपण मर्यादित अर्थानेच घ्यावे. दादा लहानाचे मोठे झाले तो काळही आजच्या तुलनेने चित्रापेक्षा चौकटीलाच अधिक मान देणारा. त्यातून त्यांनी शिक्षकाचा व्यवसाय पत्करला. त्या व्यवसायात फार मान मिळतो असा जो काही पारंपरिक गैरसमज आहे तो त्या काळी अधिक पक्का होता. आपण कसेही वागलो तरी चालेल, पण मास्तराने कसे वागावे हेही समाजाने आखून दिले होते. त्यामुळे मोठी बंडे तर दूरच राहिली, पण त्याच मध्यमवर्गीयातल्या कारकुनासारखी साधी विडी ओढून जिवाची चैन करावी म्हटली तरी मास्तरकीच्या नोकरीवर गदा यायची भीती! प्रल्हाद केशव अत्रे नामक एक दंगेखोर मास्तर हा त्या काळातला केवळ अपवाद. जीवनातले सारे पावित्र्य, चारित्र्य, ध्येय, त्याग वगैरे दागिन्यांचे डबोले सांभाळायची जबाबदारी फक्त शाळामास्तरांचीच आहे अशी आजही अपेक्षा आहे. ती पुरी करण्याची पूर्वीच्या इतकी सक्ती राहिलेली नाही हा भाग निराळा. अशा ह्या काळात देव, धर्म, राष्ट्रभक्ती, ऐतिहासिक वीर पुरुषांचे स्मरण ह्या विषयांवर कविता लिहायला हरकत नसे. पण प्रेम हा विषय मान्य नव्हता. तेव्हा क्वचित एखादा अपवाद वगळला तर मराठी साहित्यातली बंडखोरी वगैरे एकूण नेमस्तच! आमचे राजकीय नेमस्त जितके बंडखोर तितकेच सारे मध्यमवर्गीय बरेवाईट संस्कार घेत घेत लहानाचे मोठे होणारे साहित्यिकही नेमस्त. त्यात पुन्हा 'अन्य धर्मी भूपाल आर्यभूत्रा!' त्यामुळे बरेचसे मराठी ललितसाहित्य राजकीय, सामाजिक, धार्मिक, आर्थिक अशा निरनिराळ्या कोंड्यांतून आख्यापाख्या खेळून सूर मारीत होते. कोंड्या फोडण्याऐवजी चतुराईने कोंड्यांतून निसटत होते. त्या अन्यायांचा जाच कळू लागला होता. त्यांना वाचा फोडावी असे वाटत होते. तशी थोड्याफार प्रमाणात फुटतही होती.

इंग्रजी शिक्षणाने आता मध्यमवर्गीयांत बऱ्यापैकी जम बसवला होता. डेक्कन, फर्ग्युसन् वगैरे कॉलेजांभोवती काही वलये तयार झाली होती. त्या कॉलेजांत शिकणारी तरुणांची आता दुसरी–तिसरी पिढी आली होती. भिक्षुकी, थोडीफार संस्कृत पंडिती, कारकुनी ह्यासारखे पिढीजात व्यवसाय असलेल्या कुटुंबांतली ही मुले आचारविचारांनी पूर्वापार रूढीपासून थोडी फार निराळी वागायला लागली होती. त्यातच आता अपवादा-दाखल पाच-दहा मुलीही आल्या होत्या. शेली, कीट्स्, बायरन्, टेनिसन्, ब्राउनिंग् वगैरे इंग्लिश कवींच्या प्रेमविषयक कविता आणि स्त्री-पुरुषप्रेमातल्या विविध चढउतारांनी भरलेल्या त्यांच्या आयुष्यातल्या कहाण्या आपल्याबरोबर एक-दोन तरुणीही

ऐकताहेत, एखाद्या गोंडस ओळीने त्यांच्या गालावर रक्तिमा वगैरे चढतो आहे हा अनुभव त्या विद्यार्थ्यांच्या वडलांनी किंवा आजोबांनी कधीच घेतला नव्हता. हे सारे सुखद होते. त्याबरोबरच आपल्या समजात असे काही नाही याची खंतही होती. पाल्ग्रेव्हची ' गोल्डन् ट्रेझरी ' हे नव्या तरुणांचे ' बैबल ' होते. त्या कवितांची नवी नशा चढलेल्या डोळ्यांना फर्ग्युसनच्या कालव्यात केंब्रिजची ' कॅम् ' नदी दिसावी आणि उशालगतच्या उजाड टेकडीवर अफाट सृष्टिसौंदर्य आढळावे हे साहजिक होते. कॉलेजात नव्यानेच शिकायला येणाऱ्या पाच-सात अविवाहित तरुणींना तर भलतीच 'स्केअर्सिटी व्हॅल्यू ' मिळाली. शिकणाऱ्या तरुणांपैकी बरेच जण विवाहित असत. मॅट्रिक परीक्षेच्या मांडवातून कित्येकजण थेट लग्नाच्या मांडवात गेलेले असत. केवळ चार अक्षरांनी हात धड झालेली आणि निवड टिपण यापलीकडे इतर कशातही फारशी गती नसलेली कुटुंबिनी त्यांना लाभलेली असायची. तिच्याकडून विरहार्त भावना व्यक्त करणारी काव्यमय पत्रे यावीत, मग उत्तरादाखल तिला आपण शेलीची एखादी सुंदर काव्यपंक्ती लिहावी अशी स्वप्ने रंगवणाऱ्या त्या काव्यप्रेमी तरुणांना "चि. सौ. यमुना प्रसूत होऊन कन्यारत्न झाले. बाळ-बाळंतीण खुशाल आहेत. आम्ही बारसे उरकून घेतो आहो ..." अशा थाटाची मजकुरापेक्षा मायनाच मोठा असणारी कार्डे यायची ! ह्या साऱ्या पार्श्वभूमीवर कविता करण्यासाठी, त्या परस्परांना वाचून दाखवण्यासाठी, कविता ह्या विषयाची चर्चा करण्यासाठी, आणि एकत्र बसून चहा पिण्यासाठी काही तरुणांनी एकत्र जमणे हे एक बंडच होते. त्यात मनोरमा नावाची एक शिकलेली तरुणीही होती. तरी बरे ती विवाहित होती आणि तिचे पती ह्या कटात सामील होते. ह्या सन्-टी क्लबचे रविकिरण मंडळ झाले. ह्या मंडळाला मराठी साहित्यात कमालीच्या कौतुका-पासून ते कमालीच्या उपहासापर्यंत सर्व प्रकारचा अहेर स्वीकारावा लागला. ह्या मंडळाच्या साहित्यविषयक कार्याचा जमाखर्च काहीही असो, परंतु पंतकाव्य, संतकाव्य आणि शाहिरी काव्य यांच्याशी जखडलेले मराठीचे नाते तोडून हे मंडळ निघाले ! आंग्लसाहित्यांतून स्फुरलेल्या कल्पना, विचार यांचा मराठी कविता, कथा, कादंबरी, निबंध वगैरे साहित्यावर अपरिहार्यपणाने परिणाम होत होता. परंतु अशा रीतीने स्फुरलेली कविता गाऊन समुदायापुढे आणण्याचे फार मोठे कार्य ह्या रविकिरण मंडळातल्या कवींनी केले आणि त्यातले यशवन्त आणि गिरीश हे फार मोठे मानकरी होते ही गोष्ट रविकिरणमंडळाची कविता न आवडणाऱ्यांनाही मान्य करावी लागेल.

ह्या सार्वजनिक काव्यगायनातून गिरीश-यशवन्तांनी पुस्तकातली कविता मध्यम-वर्गीयांच्या घराघरांत नेऊन पोहोचवली. आता भक्तिमार्गप्रदीप, व्यंकटेशस्तोत्र, मोरोपंतांच्या आर्या ह्यांच्याबरोबर यशोधन, विरहतरंग, कांचनगंगा हे कवितासंग्रह कपाटात दिसायला लागले. मी प्रथम गिरीशांना पाहिले ते काव्यगायनाच्या पीठावरच. आमच्या शाळेत मी विद्यार्थी असताना त्यांचे काव्यगायन झाले होते. सरकारी शाळा-

खात्याने मंजूर केलेल्या कवितांचा अन्वयार्थ लावून लावून हैराण झालेल्या आमच्या पिढीला 'चला रायगडा शिवराजाचं दर्शन घेऊ' हे ऐकल्यावर काय वाटलं असेल याची कल्पना त्यानंतर अत्रे आणि गिरीशांनीच तयार केलेल्या अरुण वाचनमालेतून सुंदर सुंदर कविता शिकलेल्या पिढीला येणार नाही! कडक रेवडीखेरीज काहीही न मिळालेल्या पोराला चांदीच्या कागदात बांधलेले चाकलेट खायला मिळण्यासारखे ते काव्यगायन होते. 'पोर खाटेवर मृत्युच्याच दारा' ऐकताना त्यातल्या डाक्टराप्रमाणे आम्हीही लोचने पुसली होती. अन्वयार्थाचे सव्यापसव्य न करता कविता करू शकते, ती अर्थाला धरून गायची असते वगैरे अनुभव नवे होते. कवितेचा घोकण्यापलीकडे इतर कलाशी संबंध असतो हे तेव्हा प्रथम कळले. सरकारी शाळाखात्याने मंजूर केलेल्या कवितांचे खडे चारले गेलेली माझी ही शेवटली पिढी! त्यामुळे आमच्यापेक्षा वयाने थोडीफार वडील असलेली मंडळीही ह्या कवितेमुळे प्रसन्न झाली होती. शाळा-मास्तर किंवा कीर्तनकार वगैरेंच्या मध्यस्थीशिवाय जुनी कविता कळत नसे. इथे कविमुखातून ऐकली की कळायची. यशवन्त आणि गिरीश हे दोघेही कवी खड्या आवाजात त्या कविता म्हणायचे. पण तो खडेपणा पोवाडेवाल्यांसारखा कडकडीत नव्हता. गाणेही जेव्हढ्यास तेव्हढे होते.

उदी किंवा निळ्या रंगाचा ब्लेझरचा कोट. चकचकीत पितळी बटणांचा. कोटाच्या कॉलरवर नीट बसवलेली पांढऱ्या शुभ्र शर्टाची पोलोकॉलर, तांबूस कृष्ण वर्ण, मुद्रेवरचे भाव कवितेतल्या भावानुरूप बदलणारे–पण उगीचच नाटकी नव्हेत–एकूण व्यक्तिमत्त्व शाळेतल्या इंग्रजीच्या मास्तरांसारखं–माफक अपटुडेट् आणि गंभीर! त्या वेळचे त्यांचे ते दर्शन आणि सुबोध कवितागायन 'आपणही कविता केली पाहिजे' असे वाटायला लावणारे होते. रविकिरणमंडळातल्या यशवंत, गिरीश, वाटे, माधवराव पटवर्धन ह्या कवींचे काव्यगायन मी ऐकले आहे. त्या सर्वांत यशवंत आणि गिरीश बाजी जिंकून जात असत. श्री. बा. रानड्यांशी मी कॉलेजात गेल्यानंतर चांगला परिचय जमण्याचा योग आला. पण त्या वेळी ते बाळगोपाळांचे 'नाना' झाले होते. त्यांनी कविता गाऊन दाखवलेली मला आठवत नाही. माधव ज्यूलियनांना गळा नसल्यामुळे इतक्या चांगल्या गझला लिहिता येणाऱ्याला त्या गाता येऊ नये याचे दुःखच मनाला अधिक वाटे. गाण्याची समज वाढू लागल्यानंतर मात्र माधवरावांचे काव्यवाचनच मला इतरांच्या काव्यगायनापेक्षा अधिक चांगले वाटायला लागले. कविता आणि गीत ह्यातला फरक कळायला लागला. सुरावर गाणाऱ्या कवींच्या गायनातली सुरांची जागा सानुनासिकांच्या पादपूरणाने भरण्याच्या लकबीचे हसूही यायला लागले. अभिनयाची गोडी वाढू लागल्यावर बऱ्याचशा शोकगीतांच्या गायनाच्या वेळचा हुकमी करुण चेहरा 'कॉमिक' वाटायला लागला. गहिवरही नाटकातल्या नटासारखे हुकमी असावेत अशी शंका यायला लागली आणि त्याच सुमाराला अत्र्यांची 'झेंडूची फुले' हाती आली.

वास्तविक अत्र्यांचा ' गीतगंगा ' हा काव्यसंग्रह रविकिरणमंडळाच्या प्रकाशनात शोभून दिसला असता. पहिल्या नंबराने पास होणाऱ्या, पण एरवी वांड असणाऱ्या कारट्याने इकडून इतिहासाच्या पेपरात पहिला नंबर मिळवावा आणि तिकडून व्हिक्टोरिया महाराणीला पेन्सिलीने मिश्या काढून इतिहासाचे पुस्तक चिताडावे तसे अत्र्यांचे झाले होते. त्यांना चांगल्या काव्याची ओढ आणि उत्तम विडंबने करण्याची हातोटी होती. त्यामुळे झेंडूच्या फुलांनाही गिरीश-यशवंतांच्या काव्याइतकीच अफाट लोकप्रियता लाभली! दुसरे महायुद्ध सुरू होण्याच्या काळापर्यंत ह्या दोन्ही परस्पर विरोधी वाटणाऱ्या कार्यक्रमांनी मध्यमवर्गीय समाजात खूप रंगत आणली होती. त्या सुमाराच्या कॉलेजमधल्या मुलांच्या अभिरुचीबद्दल मला वाटतं चं. ग. दीक्षित ह्या विनोदी कवींनी म्हटले होते,

> अन् म्हणता माधव ज्युलीयन्<br>
> ' सान ' शब्द दे काव्य आंचके<br>
> मायदेव कवि म्हणुनि ओळखे<br>
> परि वरती प्रिय अत्रे पी. के.<br>
> बी. ए. बी. टी. टी. डी. ( लंडन् ) !

त्यामुळे आज पन्नाशी ओलांडलेल्या माझ्यासारख्याला आमच्या तत्कालीन कुमार-वयात रंगत आणणाऱ्या गिरीश, यशवंतांविषयी वाटणारी आपुलकी विसरता येत नाही.

मग दुसरे महायुद्ध आले. स्वातंत्र्याच्या चळवळींना गती आली. सारी मूल्ये, सारी गृहीतेच ढवळून निघाली. आता ती कविता पाहताना काळाच्या आणि अनेक नव्या विचारांच्या संस्कारांमुळे निराळीच मौज वाटते. तो काळ पुन्हा नीट आठवला की, रविकिरणमंडळातल्या कवींच्या धिटाईचे कौतुकही वाटते. गिरीश म्हणजे केशवसुत नव्हेत की मर्ढेकरही नव्हेत. पण गिरीश हे तत्कालीन शिक्षित मध्यमवर्गाच्या अभिरुचीचे जीवनविषयक कल्पनांचे एक लक्षणीय प्रतिनिधी वाटतात. तांब्यांच्या कवितेत जसे ओसरत्या सरंजामशाहीतले पुसट आलेख आढळतात तशीच गिरीशांच्या कवितेतील रोमँटिसिझम्‌मध्ये त्या काळातल्या मध्यमवर्गीयांच्या स्वप्नातल्या खुणा दिसतात.

इंग्रजीतल्या ' लव्ह् ' ह्या शब्दाला मराठीत प्रतिशब्द नाही असे एकदा विन्दा करंदीकर म्हणाले होते. अविवाहित तरुण स्त्रीपुरुषांच्या भेटीगाठीचे प्रसंगच दुर्मिळ. एका शाळेत शिकणारी बहिणभावंडेदेखील शाळेच्या आवारात एकमेकांशी बोलत नसत. पाश्चात्त्य समाजात नृत्यप्रसंगाच्या निमित्ताने, सहलींच्यामुळे किंवा टेनिस बॅड्मिंटन् सारख्या संमिश्र खेळामुळे तरुण स्त्रीपुरुषांना सहजपणे भेटता बोलता येई. आपले मन उघडे करणारे ' लव्ह् लेटर ' ही देखील आपल्याला साहेबाकडून मिळालेली देणगी! त्यामुळे खऱ्याखुऱ्या तरुणीविषयी वाटणारी ओढ कवितेतून व्यक्त करणे ही

गोष्टदेखील धक्का देणारी होती. इंग्रजी कथाकादंबऱ्यांतून दिसणाऱ्या तिकडल्या 'स्त्री'च्या तुलनेने आपल्या समाजातली 'स्त्री' अगदीच अळणी वाटत होती. त्या 'स्त्री'ला मिळणारी वागणूक गुलामांसारखी आहे असे वाटत होते. (आजही दोन-अडीच टक्के समाज वगळला तर हीच परिस्थिती आहे.) समाजसुधारकांच्या लेखांमुळे विधवांच्या दैन्यावस्थेकडे अधिक लक्ष गेले होते. भारतमाता, विधवा आणि संक्रान्त हे तत्कालीन कवींचे लाडके विषय होते. समाजाच्या भीतीने वागणाऱ्या पण नवशिक्षित कौटुंबिकांना घरातल्या विधवा माता, लेकीसुना ह्यांचा होत असलेला कोंडमारा पाहून मनातल्या मनात अपराध्यासारखे वाटत असणारच! त्या अपराधाचे प्रायश्चित्त कवितांतून घेतले जात होते. कथा-कादंबऱ्या-नाटकांतूनही विधवांच्या हालांचे दर्शन घडविले जात होते. पण तिथेही मध्यमवर्गीय सावधगिरी होतीच. ह्या कथा-कवितांचा शेवट त्या दुर्दैवी स्त्रीच्या आत्महत्येतून किंवा झुरून मरण्यातूनच व्हायचा. त्या दुर्भाग्याची जाणीव झालेला नायकही हरिभाऊ आपट्यांच्या 'भावानंदा'चा आदर्श ठेवून आखलेला. कळत न कळत हे छापाचे गणपती साहित्यात तयार होत होते. स्त्रीपुरुष संबंध शक्य तितक्या लवकर उदात्त करून टाकण्याची घाई होती. कारण प्रेमाची एकदा उदात्ताच्या उपरण्याशी गाठ मारून टाकली की वैषयिकतेच्या आरोपातून सुटका व्हायची. मग पूर्वी जशी स्त्रीदेहाच्या वर्णनाची हौस पुराणातल्या कथा किंवा राधाकृष्ण यांच्या आश्रयाला उभे राहून भागवली जायची तशी 'कविता सुंदरी' नावाच्या काल्पनिक सुंदरीवर प्रेम कविता लिहिली जाऊ लागली. तत्कालीन कवींचा हा आटापाट्यांचा खेळ आजच्या परिस्थितीत जरी हास्यास्पद आणि जरासा केविलवाणा वाटला तरी रविकिरणमंडळातल्या ह्या कवींना त्या काळात 'नवे तमासगीर', 'प्रणयपंढरीचे वारकरी' — वगैरे म्हणण्यात आले. विद्यार्थिनींबरोबर साधा स्नेह जमवल्यावर त्याबद्दल प्रचंड काहूर माजवून त्यांच्यातल्या माधवराव पटवर्धनांना नोकरी गमवावी लागली. ह्या समाजातच आपल्या कुटुंबाचे पालनपोषण करीत जगणाऱ्या सर्वच कवींना समाजातल्या असहिष्णू प्रवृत्तींशी आणि मातबर शत्रूंशी झगडा देण्याचे सामर्थ्य नव्हते. लग्नाच्या बायकोखेरीज इतर स्त्रियांशी साधा परिचय होण्यामध्ये देखील असंख्य अडसर. त्या परिचयावर कोणत्या क्षणी 'लफडे' ही तप्तमुद्रा बसेल हे सांगणे अवघड. अशा वेळी नित्याच्या व्यवहाराप्रमाणेच कलानिर्मितीच्या बाबतीतही मध्यमवर्गातून आलेले बहुतांश लेखक सावधगिरीनेच वागत आले आहेत.

"संगीत हा माझ्या जीवनवीणेवरील प्राणसूर आहे. चित्रकलेनेही माझे मन असेच एका काळी आकर्षित केले होते. पण फाटक्या परिस्थितीत शेवटी थोडेसे काव्यच माझ्या हाती राहिले." असे त्यांनी स्वतःसंबंधी म्हटले आहे. स्वतःच्या 'फाटक्या परि-स्थिती'चा एवढा उल्लेख सोडला तर गिरीशांच्या कवितेत वैयक्तिक निराशेचा सूर मात्र कुठेही नाही. नेटका प्रपंच करून त्यांनी काव्यातली परमार्थ साधना केली आहे. एकत्र

कुटुंबात अचानक वडिलांचा आधार तुटला की ऐन उमेदीच्या आणि थोडीफार धाडसे करणे शक्य असलेल्या वयात, वडिल मुलगा म्हणून जन्माला आलेल्या माणसाला घाण्याचा बैल होऊन जगावे लागे. गिरिशांना अवेळी आलेल्या वडीलकीची सारी दुःखे भोगावी लागली. ती केवळ आर्थिक जबाबदारीच होती असे नव्हे. अशा प्रसंगी विशीतल्या तरुणाला साठीतल्या माणसाच्या वृत्तीने स्वतःची सारी सुखे, आशा अकांक्षा बाजूला ठेवून वागावे लागे. कसलेही साहस करताना 'कुटुंबाचे काय होईल?' हा विचार भेडसावायला लागे. अशा परिस्थितीत गुणी तरुण पिचून जात. ती निराशा कवितेतून उमटत असे. गिरीशांनी असली खाजगी तक्रार आपल्या कवितेतून मांडली नाही. 'चित्ती असो द्यावे समाधान' अशा वृत्तीने जगण्याची असल्या परिस्थितीत सक्ती असते. गिरीशांनी ती सक्ती खुषीने स्वीकारलेली त्यांच्या कवितेतून दिसते. हवे तर त्या कवितांच्या रचनेला विरंगुळा म्हणावे, हवे तर संसृतीच्या उन्हाळ्यात शोधलेला काल्पनिक गारवा म्हणावे. पण काव्यरचना हा त्यांना सुखवणारा उद्योग होता. ते रचताना आणि म्हणून दाखवताना त्यांना प्रसन्नता लाभत होती. शिक्षकाच्या आर्थिक उत्पन्नात ओढगस्तीचा संसार करताना समुदायाकडून मिळणारी 'वाहवा', 'गाण्याने श्रम वाटतात हलके' ह्या केशवसुतांच्या उक्तीचा जरा निराळ्या अर्थाने प्रत्यय आणून देत होती. हे काव्यगायक आणि ते ऐकणारा समुदाय थोड्याफार फरकाने अब्रूने दिवस काढायची जोखीम घेऊन जगणारा मध्यमवर्गीयच होता. हल्ली जशी 'कौटुंबिक' हे विशेषण धारण करणारी आणि मुलीबाळी लेकीसुनासह निर्धास्तपणाने पाहण्यास योग्य अशी नाटके केली आणि पाहिली जातात तशीच कुटुंबातल्या सर्वांनी एकत्र बसून ऐकण्यासारखी ही काव्यगायने होती. 'सोड सोड आता अपुल्या गोड मोहिनीला', 'मन गेलं तुझ्यावर जडून रामा मन गेलं तुझ्यावर जडून', 'ठेविले पाऊल दारी जो न तुझ्या मंजुले......' 'बाळ जातो दूर देशा मन गेलं वेडावून......' अशी ही सोपी आणि तानाबिनांचा फार घोळ न घालता साधी 'गळ्यावर' म्हटलेली गाणी. त्यांतल्या कांहींची जात तर थेट जुन्या स्त्रीगीतां-सारखी! समाजाला फार मोठा धक्का वगैरे द्यायची गिरीशांची प्रतिज्ञाही नव्हती आणि पिंडही नव्हता. त्यांच्या श्रोत्यालाही ते नको होते. मध्यमवर्गीय कुटुंबे त्या वेळी नुकतीच कुठे रविवर्म्याच्या सीता, तिलोत्तमा, शकुंतला ह्यांच्या चित्रातून सौंदर्य पाहायला लागली होती. बालगंधर्वांच्या नाटकातून नेसण्यासवरण्यातला नीट नेटकेपणा, थोडेफार ललित विभ्रम वगैरे बघत होती. त्यामुळे कवितेतला शृंगार, प्रेम वगैरे सुंदर पण सोज्ज्वळ असलेले बरे असेच धोरण होते. या काव्यगायनात 'कौटुंबिक जिव्हाळ्याच्या' नाटकांप्रमाणे मधूनच थोडाफार हुकमी अश्रुपात घडवणाऱ्या कवितांची पेरणी असायची. ह्या सगळ्या प्रकाराला हवे तर भाबडेपणा म्हणावे, भित्रेपणाही म्हणावे, पण अप्रामाणिकपणाचा आरोप करू नये. इतक्या जपून लिहिलेल्या कवितांवर देखील चावटपणाचा आरोप करणारी आणि रविकिरणमंडळाला अगदी वाळीत टाकायच

प्रयत्न करणारी मंडळीही त्या काळी मौजूद होती याची मौज वाटते. माधवराव पटवर्धनांना तर फारच ताप सहन करावे लागले. अर्थात रविकिरणमंडळातल्या इतर कवींपेक्षा त्यांचा पिंड खूपच निराळा होता. लहानपणापासून ते निराळ्या वातावरणात वाढले होते. घरच्या माणसांच्या जवळिकीला पारखे होते. आप्तांचे अनुभव दुःखदायक होते. मध्यमवर्गीय कुटुंबातल्या ठराविक मुशीतून ते घडले नव्हते. आपल्या रामभाऊ मराठे ह्या मित्राला लिहिलेल्या एका पत्रात त्यांनी म्हटले आहे, " मी स्वभावाने तरी कुठे अस्सल स्वदेशी महाराष्ट्रीय–पुणेरी आहे ! " गिरीश त्या मानाने सर्वार्थाने देशी. सुरुवातीपासून अखेरपर्यंत देशीच राहिले आणि माधवराव उत्तरायुष्यात मराठी भाषेच्या शुद्धीकरणापर्यंत जाऊन पोहोचले. माधवरावांच्या आयुष्यासारखीच त्यांच्या कवितांची वहिवाट विकत वाटेवरची. व्यासपीठावरून म्हणताना समुदायाला सहज समजणारी नव्हे, '......ज्यास चाटूनी गेला पावक जितेपणी क्रव्याद्' वगैरे ओळीतले पावक, 'क्रव्याद्' शोधायला नक्की कुठला कोश उघडावा हे कळत नसे. फारसी शब्द तर डोक्यावरून जात पण 'किती स्तुत्यर्ह मोठाई' सारख्या ठिकाणी जीव कासावीस व्हायचा. ती कविता ऐकायची नसून वाचायची आहे आणि अर्थ लावून वाचायची आहे एवढाच बोध होत असे. वाचताना देखील उदासीन्, शालीन्, दीन् असले अकारण लंगडे केलेले शब्द आणि गण्णण, शङ्कर, साञ्ज वगैरे प्रकार रुचत नसत. 'तेंव्हा शेक्स्पियरप्रणीत मग मी वाची सुनीतावली' ही ओळ वाचून, झेंडूची फुले ह्या आमच्या तत्कालीन झेंद अवेस्त्याला स्मरून, 'युक्लीडप्रणिते अगम्य गणिते सोड्वून दे बोल्ली। आल्जिब्र्यातिल क्वाड्रिलॅटरल तिने इक्वेशने घातली।...... असली एक विडंबनाची पहिली पुस्ती मी गिरवल्याचे मला आठवते. त्या पेक्षा 'चला रायगडा शिवरायाचं दरसन् घेऊ......' किंवा 'तुझ्या विच्छिन्न रूपाला बघूनी फाटतो ऊर' हा मामला सोपा होता. किशोर वयाची सरहद्द ओलांडल्यावर देखील,

वरती आली कुठे उसाची तरवारांची पाती
हिरव्या रुन्द पानी शोभे हळदीवरची कान्ती
कुठे बाजरी कोठे अरगड फुलोऱ्यात तो आली
भुईमुग बांधावरती लवल्या फळभाज्यांच्या वेली;......

यासारखी सोप्या सोप्या शब्दात काढलेली चित्रे आवडली होती. फुरसदीच्या क्षणी सहज गुणगुणायला चार ओळी लाभाव्या एवढीच ज्या वयात कवितेकडून अपेक्षा होती त्या वेळी भेटलेल्या ह्या कविता आहेत. त्यानंतर मध्यंतरीचा इतका काळ लोटून गेल्यावर आता त्या ओळी एखाद्या बालमित्राच्या अचानक आलेल्या आठवणीसारख्या वाटतात. आणि त्या कवितेशी तसा प्रत्यक्ष संदर्भ नसलेल्या तत्कालीन इतरच गोष्टींचे स्मरण करून देतात. त्या कविता ज्या काळात रचल्या गेल्या होत्या आणि गायिल्या गेल्या होत्या त्या काळी समुदायाची दाद घेऊन गेल्या होत्या. ती गीते लोकांच्या

ओठावर खेळू लागली होती. गिरीशही ' एवढे यश मला रगड ' ह्या समाधानाने जगत होते.

अनेक वर्षांपूर्वी त्यांनी देवापाशी एक मागणे मागितले होते. ' उदयास्त नको देवा ! देशी की तरि दे जिणे । असून अस्त आरंभी उदया मग पाहणे... ' त्यांच्या जीवनाच्या उत्तरार्धात त्यांचा आणि माझा अधिक जवळचा संबंध आला, त्या वेळी देवाने त्यांची ही प्रार्थना ऐकलेली दिसत होती. ज्या प्रापंचिक जीवनाला त्यांनी अग्रहक्क दिला होता ते सफल झाल्याच्या खुणा आसपास दिसत होत्या. त्या जीवनाला तडा पडावे असे त्यांच्या हातून काहीही घडले नव्हते. कोंड्याचा मांडा करून संसार करणारी माईसारखी गृहिणी त्यांना लाभली होती. माईंची पुण्याई केवढी मोठी आहे हे मी गिरीशांच्या एका कौटुंबिक सत्कार समारंभाच्या वेळी सांगलीला पाहिले होते. दादा साधे शाळा-मास्तर असल्यापासून त्यांनी आपल्या मुलांबरोबर आणखी एखाद्या गरीब विद्यार्थ्याला घरी ठेवून त्याच्या शिक्षणाची व्यवस्था केली आहे. अशा अनेक गरीब विद्यार्थ्यांचे माईंनी पालनपोषण केले आहे, पुढे संसाराला लागलेले आणि जीवनात उत्तम यश मिळवलेले हे विद्यार्थी मुद्दाम कुठून कुठून त्या समारंभाला आले होते. आश्रयदात्याच्या घरी राहिलेला गरीब विद्यार्थी पुष्कळदा तो आसरा सोडताना कडवट आठवणीच घेऊन गेलेला आढळतो. इथे मात्र वयाची चाळिशी गाठलेले ते पूर्वीचे विद्यार्थी दादा आणि माईंच्या सहवासात बऱ्याच दिवसांनी घरी आलेल्या माहेरवासिनींसारखे वागत होते. जे येऊ शकले नव्हते त्यांनी आपल्या निराधार विद्यार्थिदशेत लाभलेल्या दादा आणि माईंच्या—विशेषतः माईंच्या प्रेमळ आधाराचा आणि वात्सल्याचा कमालीच्या कृतज्ञतेने उल्लेख केला होता. दादा आणि माईंना लाभलेला हा कृतज्ञतेचा अहेर फार मोलाचा होता. दादांची मधू, वसंता, शरद वगैरे मुले सुप्रसिद्ध आणि सुस्थित झाली होती. जीवनात मावळतीच्या दिशेला झालेला हा ' उदय ' दादाही तृप्त मनाने पाहात होते.

बदलत्या काळाबरोबर काव्यप्रवाहही बदलत चालले आहेत याची त्यांना चांगली जाणीव होती. रविकिरणमंडळाचा उल्लेख आता मराठी कवितेच्या वाटेवरचा एक जुना टप्पा म्हणून व्हायला लागला होता. हजारोंच्या समुदायापुढे गायिलेल्या गीतांची आता जवळ स्मरणेच काय ती शिल्लक होती. नवे कवी फड गाजवीत होते. त्यांच्याबरोबर गप्पा मारताना बदलत्या अभिरुचीबरोबर साहित्यिक जीवनात अपरिहार्यपणाने पदरी पडणाऱ्या उपेक्षेविषयीची कुरकूर चुकूनही मला ऐकायला मिळाली नाही. त्याबरोबरच पूर्वायुष्यात लाभलेल्या हारतुऱ्यांचे कौतुकही त्यांनी कधी चघळून सांगितले नाही. नवी कविता त्यांना गोंधळात टाकीत होती. अनिलांचा मुक्तछंद आल्यावर त्यांना धक्का बसला होता. मर्ढेकरही मनाला पटत नव्हता, त्याबद्दलची नापसंतीही त्यांनी व्यक्त केली होती. रविकिरणमंडळ, त्या मंडळातल्या सदस्यांची कविता – हे सर्व कवी यांचे नव्या पिढीला आता फारसे सोयरसुतक उरलेले नव्हते. खुद्द त्यांचा उल्लेखदेखील नाटककार

वसंत कानेटकरांचे वडील असा झालेला त्यांनी ऐकला असेल. गृहस्थ गिरीशांना त्याचा अभिमानच वाटला असेल.

काव्याच्या संदर्भात सौंदर्य, भावना, भावजीवन वगैरे शब्द प्रत्येक कालखंडात निरनिराळा आशय व्यक्त करीत असतात. 'कवि' नामक मनुष्य प्राण्याबद्दलच्या प्रत्येक जमान्यांत निरनिराळ्या प्रतिमा असतात. कवितेच्या प्रयोजनाविषयीच्या कल्पना बदलत असतात. काव्यविषयक कल्पनांच्या जोडीने कविविषयक कल्पना तयार होत असतात. अशाच कल्पनांतून कविहृदयावर एके काळी कोमलतेचा शिक्का बसला. त्यामुळे त्याचशावर विरघळण्याची जबाबदारी आली. काही राष्ट्रीय उत्सवांचे प्रसंग आले की तेजस्वी होण्याची जोखीम आली. कौटुंबिक जबाबदाऱ्यांसारख्याच ह्या देखील रूढीने पडलेल्या जबाबदाऱ्या! त्यांतूनच ठराविक विषयावरच्या कविता रचल्या गेल्या. होतकरू कवी प्रसिद्ध कवींची अनुकरणे करून त्याच विषयावर कर्तव्यबुद्धीने यमके जुळवीत होते. यशवन्त कवींच्या "आई" ह्या कवितेचा समुदायावर होणारा परिणाम पाहिल्यावर त्या काळी असंख्य कवींनी आईला धारेवर (अश्रूंच्या?) धरले होते. नवकवितेचे सर्वांत मोठे व्यवच्छेदक लक्षण म्हणजे तिने ह्या प्रासंगिक जबाबदारीतून स्वतःची मुक्तता केली. अर्थात आजही सर्व मराठी कवी त्यातून मुक्त झाले आहेत असे म्हणता येणार नाही. यंदा शिवाजीमहाराजांच्या राज्याभिषेकाच्या त्रिशतसांवत्सरिक महोत्सवात अनेक आधुनिक कवींनी आपापल्या कवितांची अभिषेकपात्रे हाती धरली आहेतच. मग गिरीशांसारखे कवी प्रासंगिक कविता लिहीत होते म्हणून त्यांचा उपहास करण्यात काय अर्थ आहे? आयुष्यभर ते ज्या भूमिकेतून लिहीत आले त्यातले प्रासंगिकता हे अपरिहार्य अंग होते. त्यातून फुटून निघालेल्या नवीन कवितेचे गोत्रच निराळे होते.

१९५० ते ६० ह्या कालखंडात मर्ढेकर, रेगे ह्यांच्यासारख्या कवींनी मराठी काव्याच्या सृष्टीत नवे चमत्कार घडवले होते. अनिलांचा मुक्तछंद हा केवळ कवितेने घेतलेला निराळा आकार नव्हता. तो एक अंतर्बाह्य जुळून आलेला नवा काव्याविष्कार होता. ह्या काळात लिहिलेल्या गिरीशांच्या कवितांचे मथळे वाचले तरी त्यांच्या भूमिकेचा खुलासा होतो. 'विमामहर्षी', शारदेच्या दरबारात पं. नेहरू, देवलांच्या मळ्यातील कल्पवृक्षास, श्रेष्ठ कलावन्त गोविन्दराव टेम्बे यास, भिलईच्या यंत्रविशारदास, प्रिय मित्र कवि यशवन्त यांस, श्रेष्ठ कलावंत प्रा. ना. सी. फडके यास ... इ. इ. नातवाचा सातवा वाढदिवस, गृहप्रवेश, भाऊबीज हे कौटुंबिक प्रसंग त्यांची कविता साजरे करीत होती. एक गृहस्थ, मित्र, आप्त, शिक्षक, पिता, आजोबा अशा भूमिकांवरून जगणाऱ्या गिरीशांनी कवितेतून आचरिलेला हा गृहस्थधर्म होता. ती गीते एका फार निराळ्या अर्थाने स्वान्तः सुखाय होती. मराठी काव्याच्या समीक्षेच्या इतिहासाच्या किंवा समृद्धीच्या दृष्टीने त्यांचे मोल फार नाही पण एक समाधानाने वार्धक्यात शिरलेले मध्यमवर्गीय गृहस्थ म्हणून गिरीशांना ओळखायला ह्या खुणा फार छान आहेत.

आता ते नव्या लेखकांचे स्वागत आपले खेळायचे दिवस संपवून तंबूतून नव्या गड्यांचा खेळ कौतुकाने पाहणाऱ्या वृद्ध खेळाडूसारखे करीत होते. नव्यांची दांडगाई समजून घेण्याचा त्यांचा प्रयत्न असे. मोठ्या समाधानाने ते निवृत्त झाले होते. म्हातारपणाबरोबर पुष्कळांना जडणाऱ्या किरकिरेपणाचा त्यांना स्पर्श झाला नव्हता. अखेरच्या काळात नव्या पिढीने देखील रविकिरणमंडळाच्या कार्याबद्दल कृतज्ञता दाखवून त्यातल्या हयात सदस्यांचा गौरव समारंभ साजरा केला होता. पाचपन्नास वर्षा-पूर्वीची वादळे, थट्टाकुचेष्टा यांतून समाजाची कृतज्ञताही टिकून राहिली होती. अशा समाधानाने जगत असताना त्यांना पक्षाघातासारख्या दुष्ट विकाराने छळायला सुरुवात केली. आणि एके दिवशी कुणालाही न चुकवता येणारा शेवटचा दीस आला. ज्या पुण्यांत त्यांनी आपल्या सुरवातीच्या आयुष्यातले चढउतार पाहिले, आपली 'फाटकी परिस्थिती' उगीचच चारचौघांपुढे उघडी न करता गृहस्थपणाने पदरी पडेल ते स्वीकारीत अखेर 'उदय' होणार ह्या श्रद्धेने जीवनाची वाटचाल केली, त्याच पुण्यात त्यांची जीवनयात्रा संपली.

एकदा दादांना भेटायला हवे असे अनेकदा वाटे. काहीना काही कारणाने राहून जायचे. दुर्दैवाने त्यांच्या निधनाची बातमी अचानकपणाने कळली आणि त्यांचे अंत्यदर्शन घडले. माझ्या डोळ्यापुढे विश्रामबागेच्या त्या चिमुकल्या स्टेशनाच्या फलाटावर माझ्या स्वागताला उभे असलेले 'दादा' येत होते. त्यांचे ते 'याऽऽ' कानात पडत होते. आता दादाहि गेले आणि विश्रामबाग नावाचे ते चिमुकले स्टेशनही रूळ बदलल्यामुळे नष्ट झाले. लोकाभिरुचीही असेच रूळ बदलते आणि जुनी थांब्याची ठिकाणे नाहीशी होतात. उरतात त्या प्रवासाच्या आणि विसाव्याच्या जागांच्या आठवणी! त्या आठवणींचे मोल खरे तर आपले आपल्याला! माझ्या वयाच्या नवव्या दहाव्या वर्षी उंच मान करून मी व्यासपीठावर बसलेल्या कवी गिरीशांना प्रथम पाहिले होते. ते 'दादा' म्हणून माझ्या मनातली कृतज्ञता जागवणाऱ्या आठवणीच्या माळेत बसतील हे मला तरी कुठे ठाऊक होते!



अनुक्रमणिका

# नाना



प्रा. सौ. विद्युत् भागवत

" बुधवारी शिवरात्रीच्या दिवशी दोनतीन तास नानांजवळ बसायला तू ये. त्यांचाच तसा निरोप आहे. " ताईंची थरथरत्या अक्षरातली चिठ्ठी येते. सहा आठ महिने अनेक रोगांनी नानांना घेरूनच टाकलेलं होतं. तीव्र चढ उतारानंतर ते बरे झाले होते. आता थोड्या दिवसांची विश्रांती घेतली की सगळं ठीक होणार होतं. मी घरी पोचते तर " आज सकाळी ब्लड दिलं ते गोठलं. पुनः द्यावं लागणार. मी बाहेर जात नाही. "... ताईंचं बोलणं ऐकून घाईघाईनं तीन तीन पायऱ्या चढून मी नानांपाशी जाते. ते अगदी नॉर्मल. " काही झालं नाही. पुनः ब्लड द्यावं लागेल इतकंच. " मग गप्पा सुरू होतात. बरोबर बारा वाजता जेवण येतं स्वतःच्याच हातांनी जेवण्याचा हट्ट, मध्येच सुपाचा थेंब हनुवटीवरून घरंगळतो, मी तत्परतेनं पुसते पण अशी सेवा त्यांना नको असते. लवकरात लवकर बरं होण्यासाठी सर्व सोपस्कर मनापासून करून घेणारे नाना नेहमीचं आयुष्य जगायला उत्सुक होते. पण बिछान्यावर पडूनसुद्धा ते चिडचिडे तुसडे झाले नव्हते. जेवल्यानंतर थोड्या वेळानं घशात किंचित खरखर जाणवते. बूट-मोजे घालून काठी घेऊन चालत ते बेसीनपाशी थुंकायला जातात. असं दोन तीन वेळा होतं, अस्वस्थता वाढत असते. एक रक्ताची उलटी होते, नाना शांतपणे म्हणतात, " तू जा, तुला पाहावणार नाही. " पुढच्या घटना काही मिनिटातच घडतात. रंग पिवळा होतो, श्वासाची धाप, घशातली खरखर सगळंच थंडावतं, नातेवाईकांना फोन, डॉक्टरांचं सर्टिफिकेट, ताईंचं सांत्वन. घर गजबजून जातं. काही मिनिटांपूर्वी " आता दोन तीन वर्षं मला काही व्हायचं नाही, तेवढ्यात बरंच लिहायचं आहे.

अशोक आला आणि माझं निम्मं दुखणं पळालं.

मासे मिळतात का ? एकदा करून आण. सध्या अगदी खाणं, झोपणं ह्या पातळीवर जगतोय.

मला थोडं बरं वाटलं की सकाळचं फिरायला जाणं पुनः सुरू करणार आहे. " हे सगळं बोलणारे नाना गेले होते. मृत्यू हे ' गूढ ' वाटू नये इतक्या सहजपणे, यांत्रिक पद्धतीने नानांचं शरीर निश्चेष्ट झालं होतं. हॉस्पिटलमध्ये रक्त, ऑक्सिजनच्या नळयांच्या

अनुक्रमणिका

जाळ्यात पडलेले नाना करारी डोळ्यांनी शांतपणे सारं सहन करायचे. मृत्यूला तेंव्हा त्यांच्यावर झडप घालता आली नाही. आयुष्यभर लोकापवादाची, लोकसंग्रहाची, मानाच्या स्थानाची जशी त्यांनी पर्वा केली नाही तशीच मृत्यूचीही. तो न्यायला आला तेंव्हाही सकाळचं फिरणं, गप्पा, स्वच्छ शरीर, भरपूर जेवण असे टवटवीत प्रसन्न मनाने ते गेले.

"कै. नारायण काळे" ह्या व्यक्तीचं आणि आमचं तसं अगदी लांबचं नातं. रंगभूमी, चित्रपटसृष्टी ह्या क्षेत्रातली त्यांची कामगिरी पुसटशी सुद्धा न पाहिलेली मी! मला ओळख झाल्यापासून माहिती असलेले नाना म्हणजे अडखळत बोलणारे, आग्रहाने आपली मतं सांगणारे. पण नको असलेला माणूस तासभर जरी समोर बसला तरी एक शब्दही न काढणारे! पुस्तकामध्ये बुडून जाणारे, आपल्या देखण्या व्यक्तिमत्वाची पुरेपूर जाण असणारे नाना विलक्षण वेगळे होते. काही वेळा त्यांचं थंड कठोर, विश्लेषण अमानवी वाटायचं. आयुष्य "कपार्टमेंट्स" करून ते जगले. त्यांच्या अभ्यासाच्या, वाचनाच्या मानाने त्यांनी कमी लेखन केले, बरोबरीच्या माणसांच्या मानाने बाहेरच्या जगात कमी मान्यता मिळाली, असल्या छोट्या काळज्या त्यांनी कधीच केल्या नाहीत. अत्यंत सहजपणे, विश्वासाने ते जगत होते. आपली पुस्तक वाचन आणि आपलं छोटसं फारच थोड्या माणसांचं वर्तुळ ह्यात असणारे नाना संकुचित मात्र जगत नव्हते. बाहेरच्या जगात घडणाऱ्या प्रत्येक घटनेला त्यांचा उत्स्फूर्त प्रतिसाद असायचा. बऱ्याच वेळा अतिगंभीर भासणारे नाना, आमच्या छोट्या मुलीशी खेळताना दुखऱ्या गुडघ्यांची पर्वा न करता खाली जमिनीवर बसून लहान मुलासारखे खेळायचे. आणि एकदा तर आपल्या जुन्या दिवसांच्या दाट जंगलात हरवलेले नानाही मी पाहिलेत. मला सक्तीने कोचावर बसवून नाना "कर्ण कुंती" संवाद म्हणून दाखवू लागले. त्यावेळची त्यांची तन्मयता, उत्साह अजून विसरता येत नाही. सखाराम बाइंडर नाटकावर उलटसुलट प्रतिक्रिया येत होत्या, तेंव्हा "हे नाटक पूर्णपणे नैतिक आहे. विवाहसंस्था बळकट करणारं आहे. एकच प्यालयातल्या सिंधू, सुधाकर, गीता, तळीराम ह्या व्यक्तिमत्त्वाचं लक्ष्मी, सखाराम, चंपा, दाउद ह्यांच्याशी सरळसरळ नातं आहे." हे सर्व तुम्ही लिहीत का नाही ह्या प्रश्नाला मात्र ते उत्तर देत नसत. तरुण धडपडणाऱ्या मुलासाठी अभिनयाचे वर्ग चालवावेत ही कल्पना त्यांच्या मनात फार दिवस घर करून होती. नाटक हे शिल्प उभारण्यासाठी लेखकाचे शब्द अनेक घटकांपैकी एक असतात. भाषांतरित नाटक ही एक नवनिर्मितीच असते. असे अनेक सिद्धान्त आग्रहपूर्वक मांडताना काही वेळा त्यांचा तोल जायचा. नवीन मुलं विशेष अभ्यास न करता प्रतिक्रियात्मक टीकाची मतं देतात ह्याची त्यांना विलक्षण चीड होती. एका दिवाळी अंकाचं संपादन करण्याची जबाबदारी मी स्वीकारली तेंव्हा आपल्या धंदेवाईक उपक्रमातून काही निर्मितिक्षम घडेल हा विचार सोडूनच मी हे काम घ्यावं असं त्यांनी बजावलं

होतं. सेंटर फॉर इंडियन रायटर्स ह्या संस्थेच्या वतीने "creativity in arts" ह्या विषयावर तीन दिवस सेमिनार होता. त्यावेळची त्यांची धडपड, उत्साह आठवला की ते किती जिवंत होते त्याची साक्ष मिळते. आठ दिवस आधी अव्याहत वाचन चालू होतं. creativity ह्या शब्दाला पिंजून टाकलं होतं. त्या दिवसांत सकाळी उठून लकीमध्ये त्यांच्याबरोबर घेतलेला ब्रेकफास्ट आणि मग दिवसभर सेमिनारमध्ये केलेली चर्चा विसरता येत नाही. संध्याकाळी त्यांच्याबरोबर चालत घरी येताना आपण ग्रप काही मिळवलंय असं वाटायचं. प्रभाकर पाध्ये ह्यांचं न्युरॉलॉजीच्या सहाय्याने केलेलं रेप्टाइल ब्रेनचं विश्लेषण, दि. के. बेडेकरांनी त्यावेळी व्यक्ती आणि समाज ह्या संदर्भात केलेली मीमांसा. प्रा. श्यामला वनारसे ह्यांनी तावातावाने केलेले शाब्दिक हल्ले. मला तो सेमिनार ऐकताना, पाहताना, ही ध्यासात जाणारी अभ्यासपूर्वक चिंतन करणारी माणसं पाहायला नानांनी शिकवलं. रोजच्या आयुष्यातल्या सामान्य प्रश्नापलीकडे किती सहजपणे जाता येतं ह्याची दीक्षा मिळाली.

कुणाच्या खाजगी आयुष्याची चर्चा, वैयक्तिक हेवेदावे; मत्सर ह्यात गुंतण्याइतका वेळच ह्या माणसापाशी नव्हता. म्हातारपणी जाणवणारा 'एकटे' पणा थकत चालल्याची जाणीवही त्यांच्यापाशी नव्हती. दोन्ही मुलं आपल्या व्यवसायांमुळे दूर होती, त्यांच्या पत्रांची वाट पहाणारे नाना कधी त्यांच्या आठवणींनी विकल वगैरे झाले नाहीत. आजारी पडल्यावर ह्यांना भेटायला सात-आठ दिवसांत जाणं जमलं नाही की अपराधी चेहऱ्यानं त्यांच्यापाशी जावं तर मधल्याकाळातलं न जाणं त्यांनी आधीच समजून घेतलेलं असायचं. स्वतःच्या प्रकृतीबद्दल सतत बोलायला त्यांना आवडायचं नाही. विद्युत् दाहिनीमधे त्यांचा देह ठेवला जाताना, माझ्या मनात आलं होतं, नानांचा चेहराही झाकून टाकला आता पुनः दिसायचे नाहीत. दुसऱ्या क्षणीच लक्षात आलं असले भावनिक विचार त्यांना आवडले नसते. ते असते तर म्हणाले असते किंचित् हसून, खांदे उडवून "हॅं, मेल्यानंतर काय उरतं ? नुसती हाडं ! अन् राख !"



अनुक्रमणिका

# विष्णुशास्त्री चिपळूणकर
# आक्षेपक–दूषकांची मालिका



श्री. ना. वनहट्टी

### चिपळूणकर

फाल्गुन वद्य १३ शके १८०३, १७ मार्च १८८२ या दिवशी वयाच्या ३२ व्या वर्षी वारले. निधनानंतर त्यांच्यावर स्तुतिसुमनांच्या वर्षावाची गर्दी उसळली. कदाचित बाळशास्त्री जांभेकर वगळल्यास याच्या पूर्वी कोणाच्याही संबंधाने इतक्या उत्कटतेने आणि भरघोसपणाने शोकप्रदर्शन आणि गुणस्तवन झाले नव्हते. चिपळूणकरांसंबंधी विशेष असा की स्तुतिसुमनांबरोबर निंदापुष्पांच्या अंजुळीही त्यांच्यावर वाहण्यात येऊ लागल्या. त्यांपैकी काही इथे देण्यात येत आहेत.

## १

### लोकहितवादी

लोकहितवादींच्या वर चिपळूणकरांनी सबंध वर्षभर लेख लिहून जो एवढा भडिमार केला त्यावर त्यांची प्रतिक्रिया काय झाली असे कुतूहल वाटणे साहजिक आहे. त्यांचे धर्मगुरू जे स्वामी दयानंद त्यांची मनमुराद कुचेष्टा चिपळूणकरांनी केली, तिजबद्दल त्यांना काय वाटत होते असाही प्रश्न उद्‌भवतो. लोकहितवादींनी याच नावाने एक मासिक–त्रैमासिक १८८३, ८४, ८५ या वर्षी चालविले होते. त्यात दयानंदांवर लिहिलेल्या लेखांमध्ये पुढील मजकूर आलेला दृष्टीस पडतो. याखेरीज आणखी काही प्रतिक्रियात्मक मजकूर त्यांनी लिहिलेला आमच्या पाहण्यात नाही.

[ लोकहितवादी वर्ष २; अंक ४, ५ जानेवारी व फेब्रुवारी १८८४ ]

### पंडित स्वामी श्रीमद्दयानंद सरस्वती

...एतावता दयानंदजींच्या महाराष्ट्रीय आक्षेपक प्रसिद्ध लोकांपैकीं आतां एक

कै. वा. विष्णुशास्त्री चिपळूणकर म्हणजे, माजी निबंधमालेचे कर्ते, हे मात्र राहिले. यांचा दयानंदजींवर शेवटपर्यंत अत्यंत कटाक्ष होता असे त्यांच्या वारंवार प्रसिद्ध झालेल्या दुष्टोद्गारपूर्वक लेखांवरून समजण्यास हरकत नाहीं. चिपळूणकर हे आज अस्तित्वांत नाहींत, तेव्हां त्यांचे पश्चात् त्यांच्या लेखांवर टीका करण्याचा आमचा बिलकुल इरादा नाहीं... चिपळूणकर यांणीं खुद्द आमच्या लेखांवर अत्यंत श्रमपूर्वक सुमारें दीड वर्षेपर्यंत जी समालोचना लिहिली ती जरी सर्वांशीं आमच्या मताला प्रतिकूल असून तिच्यावर उलट उत्तरे लिहिण्यास आम्ही असमर्थ आहों असें नाही तरी हें काम, ईश्वरकृपें ज्या विचारी व विद्वान् लोकांस आमच्या व चिपळूणकर यांच्या लेखांतील सत्यासत्य विवेचनाची शक्ति व बुद्धि आहे त्यांजकडेच सोंपविणें आम्हांस प्रशस्त दिसतें.

...परंतु ह्या सर्व अनिष्ट गोष्टींबद्दल ( स्वामीजींच्या पुण्यांतील मिरवणुकीबरोबरच शृंगारलेल्या गाढवाची मिरवणूक काढणें इ. ) आमच्या निबंधमालाकारास यत्किंचितहि विषाद किंवा खेद वाटला नाही, ही फार आश्चर्याची आणि दुःखाची गोष्ट होय. मालाकारांना मालेमध्यें आपल्या 'वक्तृत्व' या निबंधांत वक्त्यांचे मालिकेंत श्रीमद्दयानंदर्जीना निरुपायानें गोंवण्याचा प्रसंग आला व ही गोष्ट निखालस त्यांचे मताविरुद्ध होती, असें त्यांणीं स्वामीर्जीविषयीं जो एकंदर आपला अभिप्राय दर्शविला आहे, त्यावरून खास अनुमान होतें. स्वामीर्जीच्या गुणावगुणांचें किंवा मतभेदांचें पृथक्करण करण्याचें मालाकारांस सामर्थ्य नव्हतें अथवा तसें करणें त्यांस इष्ट वाटलें नसावें. कारण, तसें केलें असतें तर कदाचित् त्यांचे अंगावरच मसलत आली असती! ज्या विद्वान् पुरुषाची येथें सव्वा डझनावर व्याख्यानें झालीं, तीं सर्व ऐकून त्या व्याख्यात्यामध्यें मालाकारांस 'दुधाची चरवी' रिचविण्यापेक्षां कांहींच गुण दिसला नाहीं, ही किती सखेदाश्चर्याची गोष्ट आहे! अथवा, यांत आश्चर्य तें कसलें? मत्सर आणि पोक्त विचाराचा अभाव या दोन दुष्ट गुणांनीं तरुण मालाकारांचे न्यायदृष्टीवर झांपड घालून त्यांच्या गुणावगुण-विवेचक सद्बुद्धीस अत्यंत मांद्य आणिलें होतें. त्यामुळें त्यांस स्वामी दयानंदर्जीमध्यें गुणलेश सुद्धा आढळला नाहीं! मालाकार जर स्वामीजींच्या देहावसान समयीं जीवमान असते व स्वामीर्जीची जी अलीकडे पांच सात वर्षांत सर्वत्र कीर्ति पसरून सहस्त्रावधी लोक त्यांच्या भजनीं लागले होते, तें त्यांणीं पाहिलें असतें तर त्यावरून तरी त्यांचीं पूर्वीचीं स्वामीर्जीविषयींचीं सर्व कुत्सित मतें दरोबस्त फिरून मालाकारांनींच स्वतः त्यांचे गुणानुवाद गाइलें असते, अशी आमची खात्री आहे. परंतु दुःखाची गोष्ट ही झाली कीं, मालाकारांस आयुर्मान थोडें होऊन ते स्वामीजींच्या अगोदरच तीन वर्षें निष्करुण काळाचे दाढेंत पडले...

...सारांश, दयानंद सरस्वतींच्या महाराष्ट्रीय आक्षेपकांपैकीं जे चिपळूणकर हे प्रमुख होते म्हणून म्हटलें आहे, त्यांचे आक्षेप आणि त्यांच्या आक्षेपाप्रमाणे त्यांचे लेख हे किती सदोष आणि कुत्सित, मात्सर्यप्रपूरित व बालिश होते याचें थोडक्यात स्पष्टीकरण

केलें. मनुष्य अभिमानाला पेटून त्याजकडून कधीं कधीं किती अश्लाघ्य वर्तन घडतें याचें प्रत्यक्ष उदाहरण आमच्या मराठी लेखकांत ह्या प्रसिद्ध मालाकारांचें आहे.

' त्यांचे ( चिपळूणकरांचे ) पश्चात् त्यांच्या लेखांवर टीका करण्याचा आमचा बिलकुल इरादा नाहीं ' असे म्हणत म्हणत लोकहितवादींनी कुत्सित, मात्सर्यप्रपूरित, बालिश इत्यादी विशेषणांचा जो वर्षाव केला आहे तो पाहण्याजोगा आहे.

## २

## गोपाळ गणेश आगरकर

चिपळूणकरांच्या प्रखर टीकेचा विषय झालेल्या लोकहितवादींची प्रतिक्रिया एकापरी स्वाभाविक होती. विस्मय वाटतो तो आगरकरांचा. चिपळूणकरांचा ' केसरी'तील मृत्युलेख आगरकरांनी लिहिला अशी समजूत आहे. तो सुंदर असून चिपळूणकरांचे यथातथ्य गौरव करणारा आहे. पण त्यानंतर त्याच वर्षी केसरीमध्ये संपादकीय नात्याने एक लेख आला होता त्यात म्हटले होते :

" शास्त्रीबुवांचे विचार फारच एककल्ली होते. दयानंद, मि. जोतिबा, मि. कुंटे, लोकहितवादी, प्रार्थना समाज व खिस्ती धर्म इ. विषयांवरच्या लेखांत त्यांची बरीच अनुदारता व्यक्त होते. नवीन पंथांच्या वर्तनावर, विचारांवर व लोकांवर खरपूस टीका करून त्यांनी जुन्या लोकांकडून आपणास वाहवा म्हणून घेतले. " हे लिहिणे आगरकरांखेरीज दुसऱ्या कुणाचे असणे संभवत नाही. मतांचा प्रश्न निराळा; पण ज्याला आपण उघड्या डोळ्यांनी पुढारी म्हणून स्वीकारून ज्याच्या संस्थेत सामील झालो, त्याच्याविषयी त्याला मरून वर्षदेखील पुरे होण्याच्या आत असे उद्गार काढणे हे कसे काय ? निबंधमालेनंतर तिच्या स्मरणार्थ निघालेल्या ' निबंध-चंद्रिका ' मासिकात यासंबंधाने टीका आली होती.

पुढे ' सुधारका 'मध्ये आगरकरांनी न्यू . इं. स्कूलच्या स्थापनेसंबंधाने जे लिहिले ते याहीपेक्षा विलक्षण म्हटले पाहिजे. ' फर्ग्युसन कॉलेज ' स्थापनेच्या समारंभाविषयी लिहिताना आगरकर सुधारकात म्हणतात ( १-४-१८९५ ) :— " १८८०चे जानेवारी महिन्यांत ज्या तिघांनीं मोरोबादादांच्या वाड्यांत न्यू इंग्लिश स्कूल काढलें. त्यांपैकीं निदान दोघांना तरी आज आपण जें बीं लावीत आहों त्यापासून पंधरा वर्षांनीं असा वृक्ष निपजेल अशी कल्पनाही कधीं आली नसेल. कारण कै. विष्णु कृष्ण चिपळूणकर नोकरी सोडून घरी बसले व खासगी शाळा काढण्याचा विचार करूं लागले तेव्हां महागांवकर, नातू, बाबा गोखले व भावे यांच्या खासगी शाळेहून विशेष निराळ्या तऱ्हेची खासगी शाळा काढण्याचा त्यांचा हेतु होता असे आम्हास वाटत नाहीं. "

## ' न्यू इंग्लिश स्कूल 'चे खरे संस्थापक कोण ?

" न्यू इंग्लिश स्कूल हें तिघांनीं काढलें नाहीं. न्यू इंग्लिश स्कूल काढण्याची कल्पना एकट्या शास्त्रीबोवांची होती. टिळक आपल्या राजीनाम्यांत म्हणतात, ' ता. १ जानेवारी १८८० रोजीं शाळा उघडण्याचे वेळीं या प्रकारे विष्णुशास्त्री आणि मी असे आम्ही दोघेच होतों. ' शाळा उघडणें याचा अर्थ शाळा स्थापणें असा केला तरी त्यावेळी तिघेजण नव्हते, दोघेच जण होते......

" पण शास्त्रीबुवा, टिळक, आगरकर प्रभृतींना तोफांची उपमा देत होते आणि आगरकर शास्त्रीबुवांविषयी सुधारकांत लिहितात कीं, शास्त्रीबुवांचा हेतु ही शाळा काढण्यांत पोटभरूपणाचा होता ! आगरकर टिळकांबरोबर शास्त्रीबुवांकडे जे गेले आणि त्यांनीं त्यांना ' पुढाकार ' घेण्याबद्दल जें सांगितलें तें ही पोटभरू शाळा काढण्याकरता कां ?

" विष्णुशास्त्री हे ' पोटभरू ' शाळा काढण्याकरतां उद्युक्त झाले होते असें म्हणणें म्हणजे शास्त्रीबुवांचा अपमान करणें आहे. जो गृहस्थ स्वतःच्या कल्पनासाम्राज्यात अनेक वर्षें रममाण होत होता व केव्हां हा सरकारी नोकरीचा पाश आपण तोडून टाकूं असें म्हणत होता, तो काय पोटभरू होता ? "

वरील उतारा श्री त्र्यं. र. देवगिरीकर यांच्या ' वासुकाका जोशी व त्यांचा काल ' या ग्रंथातून घेतला आहे. (पान १२०–१२३). त्यासंबंधाने अधिक लिहिण्याची जरुरी नाही.

## ३

### बाळकृष्ण नारायण देव :

हे चिपळूणकरांचे दांडगे निंदक. ग्रंथमाला मासिकाच्या ७५ व्या (जून १९००) अंकात ' विष्णुशास्त्री चिपळूणकर यांचें चरित्र ' या नावाचा ४४ पानांचा लेख लिहून यांनी विरोधभक्ती गाजविली. लक्ष्मणराव चिपळूणकरांनी विष्णुशास्त्र्यांचे चरित्र लिहिले, त्यावर टीका करण्याच्या निमित्ताने लेख लिहून त्यांनी विष्णुशास्त्र्यांच्या जीवनावर भाष्य केले आहे ते फार गमतीदार आहे. पण, परंतु, जरी, तरी इत्यादी अव्ययांचा वापर करून लेखकाने विलक्षण कसरत केली आहे. ती प्रेक्षणीय आहे.

चिपळूणकरांच्या धार्मिक आचारासंबंधाने देवांनी त्यांना दांभिक म्हटले असून " एकंदरीत आचार विषयात चरित्रनायकास जनसमूहाचे मार्गदर्शक म्हणण्यापेक्षा रूढमार्गानुयायी म्हणणे अधिक योग्य आहे; किंबहुना ते सामान्यजनस्तुत्यभिलाषी होते असे देखील म्हणता येईल " अशी मीमांसा केली आहे. घराच्या आत देवघरामध्ये बसून

संध्या पूजा करणारा मनुष्य लोकांच्या स्तुतीचा अभिलाष करणारा कसा काय ठरतो हे कोडेच आहे !

शास्त्रीबुवांच्या देशाभिमानासंबंधी देवांनी लिहिले आहे त्यात पण, परंतुचा उपयोग केला आहे तो पाहण्याजोगा आहे :—

मालाकारांच्या देशाभिमानासंबंधी लक्ष्मणरावांनी एकांगी विवेचन केले आहे त्याचाही विचार आम्ही मागे केला असून सत्य काय होते हे दाखवून दिले आहे. देवांनी अर्थात लक्ष्मणरावांच्या एकांगी विधानाचा फायदा घेतला आहे आणि त्याच्यासंबंधाने लिहिताना विलक्षण कोलांट्या उड्या घेतल्या आहेत. "एका दृष्टीने हा देशाभिमान प्रशंसनीय आहे यात शंका नाही. परंतु वाढत्या ज्ञानाने व शिक्षणपद्धतीने त्यास जे वळण लागले पाहिजे व त्यात जे रूपांतर झाले पाहिजे होते ते मात्र घडल्याचा बोध या लेखावरून होत नाही...... आमची पहिली राज्यपद्धती पुष्कळ प्रकारांनी चांगली होती याचा अभिमान धरणे रास्त आहे. पण तिच्यात काही उन्नत, उदात्त व चिरस्थायी राज्यतत्त्वांची उणीव होती......आता हे दोष स्वाभाविक आहेत, ते थोडे बहुत सर्वत्र वसत आहेत, हे खरे; तथापि या राज्यपद्धतीस सांप्रतच्या राज्यपद्धतीपासून पुष्कळ गोष्टी शिकण्यासारख्या आहेत......" पण, परंतु, तथापि या शब्दांचे हे नाट्य प्रेक्षणीय नाही असे कोण म्हणेल !

नवीन धर्मपंथांविषयी देवांनी जे लिहिले आहे त्यातही पण परंतुचे नर्तन पुष्कळच आहे. "या ( प्रार्थनासमाजादि ) धर्मसंस्थांतही दोष नाहीत असे माझे म्हणणे नाही. त्या अद्यापि प्रायः निर्जीव आहेत हेही नाकबूल करता येत नाही. परंतु त्या नवीन धर्म-स्थापनेची हाव धरणाऱ्या आहेत इतक्या मोठ्या संभावनेस योग्य नाहीत." "आता या मार्गात मतांतरांस पुष्कळ अवकाश आहे हे उघड आहे. त्यांचे सर्व मार्ग सर्वांस सारखेच मान्य होणे संभवनीय नाही. परंतु त्यांचा उदयच अपायकारक आहे,...हे म्हणणे कोणाही सुज्ञ सुशिक्षितांस रास्त वाटणार नाही." "आता त्यांची रचना कांहींशी इंग्रजी तऱ्हेवर आहे हे खरे...पण केवळ नवीन म्हणूनच ते वाईट किंवा त्याज्य असलेच पाहिजेत असा नियम नाहीं." "त्या ( धर्मसंस्था ) निर्जीव आहेत, त्यांच्या प्रवर्तकांत व अनुयायांत एकनिष्ठा, कार्यैकतत्परता, स्वार्थविमुखता हीं फार कमी म्हणून त्यांचा प्रसार होत नाही हे खरे. पण आपल्या इतर बहुतेक संस्थांचीही हीच दशा आहे."

मालाकाराचे लोकनायकत्व देवांना खुपते आहे "कदाचित् लोकनायक हे पद अप्रत्यक्षरीतीने त्यांस लागण्यासारखे आहे असे म्हणता येईल; परंतु प्रत्यक्षरीतीने लोक सुधारणेच्या कोणत्याही कामात त्यांनी कोणताही कार्यभाग उचलिला होता असे दिसत नाही. किंवा त्यात त्यांचा हात तरी होता असे म्हणता येत नाही...म्हणून पहिल्याची बरोबरी दुसऱ्याशी करता येणार नाही. परंतु सुधारकापेक्षा टीकाकाराची वाहवा आणि

जयजयकार ही फार होतात... लोकप्रियतेस दुसरे मोठे कारण, अति प्रखर व तीव्र लेख व विनोदास्त्र यांचा प्रयोग बऱ्याच पुढारी व प्रमुख व्यक्तींवर केलेला, हे होय... परंतु लोकनायक ही पदवी पहिल्या फळीतल्याच महाजनास योग्य आहे. टीकाकार कितीही लोकप्रिय झाला तरी त्यास ती देणे न्याय्य होणार नाही. या न्यायाने मालाकारांचा लोकनायकत्वावर फारसा हक्क पोचतो असे दिसत नाही. "

मालाकारांचे लोकनायकत्व विशेष बोचत असल्यामुळे देवांनी अशा सुरात आणखी बरेच लिहिले आहे. " यारीतीने सामाजिक, धार्मिक किंवा राजकीय इत्यादि बाबतीत मालाकारांनी उघड असा कोणताच कार्यभाग पत्करला नव्हता. त्या संबंधाच्या ज्या संस्था चालल्या होत्या... त्यात त्यांच्या गुणापेक्षा दोषावरच त्यांचा विशेष रोख होता. कदाचित् या संस्थांत वर्णन करण्यासारखे गुण प्रगट झाले नसतील. परंतु वस्तुस्थितीकडे त्यांचे नीट लक्ष पोहोचलेले दिसत नाही. " मालाकारांनी काढलेल्या संस्थांनाही वादात ओढून इतर संस्थांप्रमाणे त्यांच्यातही 'दोष कमी प्रमाणाने प्रगट झाले असे म्हणता येणार नाही' असे आडवळणी विधान देवांनी केले आहे. किताबखाना, चित्रशाळा यांना तुच्छ केले आहे. प्रारंभी शाळेत चळवळ दिसली पण नंतर तशा प्रकारच्या इतर संस्थांत आणि तिच्यात 'कांहीं विशेष फरक निदान तिऱ्हाइतांस तरी दिसत नाही' असे म्हणून त्या संस्थेत पुढे झालेल्या भांडणांचा अप्रत्यक्ष उल्लेख केला आहे.

"मालाकारांस इतर पुढाऱ्याप्रमाणे अस्थिरबुद्धीचे दूषण लागले नाही" हे चरित्रकारांचे विधान अर्थातच देवांना सहन झाले नाही. " अस्थिर बुद्धि होण्याजोग्या कोणत्याही कामातच ते पडले नाहीत, मग दूषण कशाने लागणार?" असा त्यांचा त्याच्यावर शेरा आहे. त्यांच्या स्वार्थत्यागासंबंधाने 'त्यांच्यावर मिथ्यास्तुतीचा वर्षाव होत आहे' असे त्यांच्या 'मर्मज्ञ' दृष्टीला दिसते; त्यामुळे त्यांची होत असलेली घालमेल पुनःपुन्हा बाहेर पडते आहे. चरित्रकारांनी त्यांना 'लोकनायक' म्हटले तेही देवांना सलत असल्यामुळे त्याच्यावर आघात करून त्यांना 'लोकच्छंदानुवर्ती ग्रंथकार' ही लांबलचक पदवी प्रदान केली आहे आणि 'लोकभ्रमपोषण, पूर्वकालीन स्तौत्य आणि नूतन प्रगतिसाधक पंथांचा उपहास या तिहींचा प्रादुर्भाव त्यांच्या टीकालेखात प्रगट होतो' असे गुणवर्णन केले आहे.

मुद्दे निरनिराळे असले तरी देवांचा रोख आणि अंतिम साध्य एकच आहे. त्यामुळे त्यांना पण – परंतुची कसरत करावी लागली आहे आणि एकच पालुपद वारंवार आळवावे लागले आहे. " या ( चिपळूणकरांच्या ) टीकालेखांचा एकंदर रोख पाहिला तर तो उदार मतांस......आणि सुधारणेस प्रतिकूल होता असे म्हणता येत नाही ... परंतु या लेखांचा एकंदर परिणाम पाहिला तर मात्र तो तसा दिसत नाही. उदाहरणार्थ, पुनर्विवाह पक्षावरची त्यांची टीका घेऊ, या पक्षाच्या प्रवर्तकांची मालाकारांनी जी फटफजिती उडवून दिली आहे, ती पुढाऱ्यांच्या त्या वेळच्या धरसोडीच्या वर्तनास,

[ पृष्ठ १३१ पाहा ]

# राष्ट्रांचा उत्कर्षापकर्ष : चिपळूणकरांचे विचार



**श्री. ना. बनहट्टी**

विष्णुशास्त्री चिपळूणकरांनी आठ वर्षे निबंधमाला चालविली. अंक ८४ निघाले तरी वर्षे आठ झाली हे सुप्रसिद्ध आहे. मालेचे एकंदर आयुष्य वादळी ठरले. तिच्या कर्त्याने अनेक मते मांडली; इतरांच्या अनेक मतांचे खंडन केले आणि ते करिताना आपले स्वतःचे अनेक सिद्धान्त मांडले. त्यांपैकी काही सिद्धान्तांचा येथे विचार करावा या हेतूने हा लेख लिहिला जात आहे.

मालाकारांचे व्यक्तिमत्त्व वादळी होते, तसेच त्यांनी मांडलेले सिद्धान्त वादग्रस्त ठरले. त्यांच्यानंतर अनेकांनी त्यांची मते खोडून काढली, निदान तसा यत्न केला; अनेकांनी त्यांचे समर्थन केले. म्हणजे त्यांनी एके ठिकाणी म्हटल्याप्रमाणे काहीजणांनी 'काळी बाजू' दाखविली, तर काहीजण 'पांढरी बाजू' दाखविणारे निघाले. आपणाला येथे जो विचार करावयाचा आहे तो त्यांच्या ज्या मतांविषयी आवेशाने उत्तर-प्रत्युत्तरे करण्यात आली किंवा चिरडीने हमरीतुमरी करण्यात आली त्यांच्याविषयी नव्हे. ज्यांच्या संबंधाने शांत मनाने, समतोल दृष्टीने विचार व्हावा अशा आपल्या देशाच्या इतिहासासंबंधी त्यांनी मांडलेल्या काही सिद्धान्तांविषयी विचार करावयाचा आहे. त्यात जगातील इतर राष्ट्रांच्या इतिहासाचाही संबंध येणार आहे.

मालेच्या ८३ व्या अंकामध्ये आपल्या देशाला प्राप्त झालेल्या दैन्यावस्थेची उपपत्ती करताना ते म्हणतात : "प्रथमतः आमच्या प्रस्तुतच्या ऱ्हासस्थितीची उपपत्ति. प्रस्तुत विषयावर आमच्या आजपर्यंत काय समजुती झाल्या आहेत त्या नुकत्याच आम्हीं प्रदर्शित केल्या आहेत, यास्तव त्या पुनः येथें दाखल करण्याची जरूर नाहीं. आमचा ठरलेला सिद्धान्त आम्हीं मागेंच नमूद केला आहे, कीं आमच्या देशास कांहीं एक झालें नाहीं. त्याची नाडी अद्याप साफ चालत असून शरीरप्रकृतीस म्हणण्यासारखा कांहीं-एक विकार नाहीं. ...साधारण पौष्टिकाचे उपचार त्याजवर सुरू झाले असतां तो लवकरच पुनः पहिल्यासारखा सशक्त व तेजस्वी होईल याविषयीं आम्हांस बिलकुल संशय नाहीं. हल्लीं जी आमच्या राष्ट्रास विपत्तीची स्थिति प्राप्त झाली आहे ती आमच्या अंगच्या कांहीं अनिवार्य दोषांमुळें आली नसून ती यदृच्छेनें कोणत्याही देशास येण्या-खी आहे व आजपर्यंत आलीही आहे."

अनुक्रमणिका

या उपपत्तीबद्दल कित्येक विचारवंतांनी चिपळूणकरांना दोष दिला आहे. त्या काळी देशाची भयंकर दुर्धर स्थिती झाली असता हा म्हणतो की, 'आमच्या देशास कांहीं-एक झालें नाहीं.' केवढा हा अभिमानातिरेक !

इथे असे दिसते की, आमच्या देशास काहीएक झाले नाही, हे चिपळूणकरांचे उद्गार मागच्या पुढच्या संदर्भात घ्यावयाचे आहेत. जर काहीएक झाले नाही तर साधारण पौष्टिकाचे उपचार तरी त्याच्यावर कशाकरिता करावयाचे ? आणि पुढे राष्ट्राच्या विपत्तीच्या स्थितीचा उल्लेख केला आहे त्यांची संगती कशी जुळवावयाची ? या उताऱ्यातच ही परस्पर विसंगती. पण मागे ८१ व्या अंकात आपल्या राष्ट्राची जी भयंकर दैन्यावस्था वर्णिली आहे, 'की आम्ही केवळ प्रेतवत होऊन राहिलों आहों,' त्या वर्णनाची व्यवस्था काय लावावयाची ? ते वर्णन खरे की हे खरे, की दोन्ही खोटी ? केवळ भावनेच्या भरात ज्या वेळेस जसे वाटेल तशी ठोकून दिलेली ही विधाने समजावयाची ?

लोकप्रियतेच्या हव्यासाने आणि विकारवशतेने वाटेल तशी विधाने ठोकून देणारा लेखक असा ज्यांना चिपळूणकरांच्यावर छाप मारावयाचा आहे त्यांना हा निष्कर्ष योग्य वाटेल. पण आपण थोडा विचार करून पाहू. देशाला काहीएक झाले नाही असे म्हणणारे चिपळूणकर लगेच पौष्टिकाचे उपचार करण्याच्या गोष्टी करतात आणि राष्ट्राला विपत्ती प्राप्त झाली आहे असेही म्हणतात. तेव्हा एक तर ते वेडेपणाने बरळत असले पाहिजेत किंवा त्यांचा अंतर्गत भाव काही निराळा असला पाहिजे. यांपैकी दुसरा विकल्प खरा मानून जरा विचार करू. आणि तो जर जुळला नाही तर मग वेडेपणाने बरळल्याचे अनुमान पतकरू.

चिपळूणकरांनी हा जो विचार मांडला आहे तो प्रतिक्रियेच्या स्वरूपाचा आहे. वरच्या उताऱ्यात जो भाग आम्ही गाळला आहे त्यात असे म्हटले आहे की, "अर्वाचीन पंडित मंडळींनें एकावर एक जालीम दवे सुरू करून व शस्त्रक्रियेचे तीव्र प्रयोग करून देशाची जी हलाखी मांडली आहे ती सर्व सोडून दिली पाहिजे." म्हणजे सुधारणा पक्षातील विद्वानांनी आमचा धर्म खराब आहे तेव्हा त्याचा उच्छेद करून दुसरा धर्म स्थापा, जातिभेद नष्ट करा, बालविवाहाची रूढी फेकून द्या, पुनर्विवाह चालू करा इत्यादी एकापेक्षा एक जालीम औषधांचे प्रयोग करण्याचा जो आटापिटा चालविला होता त्याची देशोद्धाराला काही आवश्यकता नाही, असे चिपळूणकरांचे म्हणणे असल्याचे निष्पन्न होते. म्हणूनच राष्ट्राची विपत्तीची स्थिती अनिवार्य दोषामुळे आलेली नाही असे त्यांनी म्हटले. ज्या दोषांमुळे ती आली आहे ते निवार्य म्हणजे नाहीसे करण्याजोगे आहेत, असा अर्थ यातून प्राप्त होतो. आणि त्यानंतरचा आपल्या देशाचा ९२ वर्षांचा इतिहास हेच सांगत नाही काय ? आमच्या दैन्याचे मुख्य कारण परकी अंमल हे होय, हा महासिद्धान्त चिपळूणकरांनी सांगितला तोच वारसा घेऊन

लोकमान्य टिळकांनी आणि अनेक देशभक्तांनी तो अंमल झुगारण्यासाठी कडोविकडीचे प्रयत्न केले. तीच मशाल गांधीजींच्या हाती जाऊन त्यांच्या आणि इतर क्रांतिकारकांच्या प्रयत्नांनी परकी अंमल दूर झाला हे आपण पाहिले आहे, अनुभविले आहे. तेव्हा आमच्यात जे दोष होते ते अनिवार्य नव्हते हे सिद्ध झाले आहे.

आमच्या दैन्याचे मुख्य कारण परकी अंमल होय हे चिपळूणकरांनी अनेकवार आवर्जून सांगितले आहे. हा अंमल दूर करण्याचे इतिहासप्रसिद्ध मोठे साधन म्हणजे राज्यकर्त्यांशी लढाईला उभे राहून त्यांचा पराजय करणे. पण ते आज आपणाला शक्य नाही, म्हणून ज्ञानप्रसार आणि राष्ट्रजागृती ही साधने त्यांनी सांगितली आहेत. लोकहितवादीप्रभृती सुधारणावाद्यांनी केलेल्या निदानापेक्षा यांचे हे निदान निराळे आहे. हा मतभेद कदाचित जमीन-अस्मानाएवढा मोठा असेल पण त्यामुळे हा भ्रांत प्रारब्धवाद किंवा भाबडा आशावाद आहे असे म्हणणे तर्कसंगत ठरणार नाही.

वर जो उतारा दिला आहे त्यात यदृच्छेचा उल्लेख केला आहे आणि पुढे देखील चिपळूणकरांनी 'आमचें दैव फिरल्यामुळें हल्लींच्या अवस्थेंत आम्ही येऊन पडलों आहों.' असे म्हटले आहे. आणखी त्याच्या पुढे 'कालगति विचित्र आहे' असेही ते म्हणतात. हा दैवाचा आणि योगायोगाचा मुद्दा 'लोकहितवादी'वरील निबंधातही त्यांनी मांडला आहे. बऱ्याच टीकाकारांनी याबद्दल नाराजी व्यक्त केली आहे. राष्ट्राच्या सुधारणेचा म्हणा किंवा स्वातंत्र्याचा म्हणा विचार करीत असता दैवाचा मुद्दा पुढे आणणे वेडगळपणाचे नाही काय? आमच्या वाईट स्थितीला दैव कारण आहे असे म्हटले म्हणजे आटपले. काही प्रयत्न करावयास नको, कारणे शोधून काढून त्यावर इलाज करावयास नको; दैव अनुकूल झाले की होईल सुधारणा, येईल स्वातंत्र्य आपल्या पायांनी चालत. दैववाद प्रयत्नवादाच्या सर्वस्वी विरुद्ध; आणि आपण दैव मानू लागलो की मनाला दुबळेपणा येतो; तर्काला पटणार नाहीत अशा तऱ्हेचे तोडगे करण्याची प्रवृत्ती होऊ लागते, इत्यादी इत्यादी.

इथे आपण थोडासा विवेक करण्याचा प्रयत्न करू या. एखाद्या गोष्टीला इतर कारणांबरोबर दैव किंवा प्राक्तन हेही कारण आहे असे म्हणणे निराळे आणि दैववाद निराळा. चिपळूणकर दैववादी नव्हते. ते जबरदस्त प्रयत्नवादी होते. अगोदर हे सांगितले पाहिजे की, चिपळूणकरांनी दैव शब्द वापरला आहे, प्राक्तन नव्हे. आणि त्यांचे ८३ व्या अंकातील वाक्य असे आहे : 'इंग्रेज लोक हे आम्हांहून अनेक प्रकारांनीं बलिष्ठ असल्यामुळें व आमचें दैव फिरल्यामुळें हल्लींच्या अवस्थेंत आम्ही येऊन पडलों आहों.' येथे हल्लीच्या अवस्थेला म्हणजे पारतंत्र्याला इंग्रजांचा अनेक प्रकारांनी बलिष्ठपणा हे पहिले कारण दिले आहे आणि दैव हे त्यानंतर सांगितले आहे. यात खरोखरी चूक काय आहे? ह्या विश्वामध्ये ज्या असंख्य घटना निरंतर घडत असतात त्या सर्वांशी मानवी प्रयत्नांनीच घडत असतात काय? गीतेमध्ये म्हटले आहे :

अधिष्ठानं तथा कर्ता करणं च पृथग्विधम् ।
विविधाश्च पृथक्चेष्टा दैवं चैवात्र पञ्चमम् ॥ १८·१४.

कोणतीही गोष्ट घडून येण्याला जी पाच कारणे असतात, त्यांत दैव हे एक कारण असते असे येथे म्हटले असून हे न जाणता जो आपणच केवळ कर्ता आहोत असे मानतो तो ' दुर्मति ' होय, असे पुढे म्हटले आहे. तेव्हा कोणत्याही एखाद्या घटनेला इतर कारणांबरोबर दैव हेही कारण सांगितले की तो जर भाबडा, अशास्त्रीय, अनैतिहासिक ठरत असेल तर श्रीकृष्ण, अर्जुन आणि गीतेचे तत्त्वज्ञान हेही तसेच ठरतात असे मानावे लागेल. आणि हे निष्क्रिय, निष्प्रभ विचारसरणीचे धुरंधर पुढारी होते असे ठरेल.

या सिद्धान्ताची इतिहासातली उदाहरणे देताना चिपळूणकर म्हणतात : ' ज्या प्रबलतेमुळें व ज्या सद्दीमुळें स्कॉटलंडसारखा वीर्यपरिप्लुत देश आमच्या राज्यकर्त्यांच्या सत्तेखालीं आला आणि फिलीप व नेपोलियनसारखे मी मी म्हणत त्यांच्यावर चढाई करून गेले असतां ते हतवीर्य होऊन माघारी आले त्याच दोन कारणांचा येथेंही प्रभाव गाजला आहे. ' या वाक्यात इतिहासातली तीन उदाहरणे दिली आहेत. या तिन्ही उदाहरणांमध्ये प्रबलतेबरोबर सद्दी म्हणजे अनुकूल दैव इंग्लंडच्या उपयोगी पडले, हे स्पष्ट आहे. विस्तारभयास्तव आपण या तिन्हींपैकी एक स्कॉटलंडचेच उदाहरण घेऊन पाहू. इंग्लंडची राणी पहिली एलिझाबेथ मेली. ती अविवाहित असल्यामुळे राज्याला वारस कोण असा प्रश्न उपस्थित झाला असता आनुवंशिकतेच्या तत्त्वानुसार जेम्स हा राजा ठरला. वास्तविक तो स्कॉटलंडच्या राजवंशातला, तेथे पूर्वीपासून राज्य करीत होता. एलिझाबेथनंतर इंग्लंडच्या गादीचा तो वारस ठरल्यामुळे लंडनास येऊन तो इंग्लंडच्या गादीवर बसला. आणि तो स्कॉटलंडचाही राजा असल्यामुळे दोन्ही राज्ये त्याच्या अमलाखाली आली. पण दोहोंमध्ये इंग्लंड अधिक मोठे व प्रबळ म्हणून एव्हा-पासून स्कॉटलंड इंग्लंडच्या अंकित झाल्याप्रमाणे त्याची स्थिती झाली. म्हणजे येथे इंग्लंडची प्रबळता आणि दैव ही दोन्ही स्कॉटलंडला त्याच्या सत्तेखाली आणण्यास कारणीभूत झाली.

चिपळूणकरांच्या दुसऱ्या एका विधानासंबंधाने असाच आक्षेप घेण्यात आला आहे. मालेच्या ८ व्या अंकामध्ये ' इतिहास ' या निबंधात चिपळूणकर पुढील विधान करून जातात : " ' नीचैर्गच्छत्युपरि च दशा चक्रनेमिक्रमेण ' या न्यायानेंच एकंदर जगाची राहटी चालली आहे. " याच्यापुढे त्यांनी ग्रीस आणि रोम यांची उदाहरणे दिली आहेत. एका काळी हे दोन्ही देश भाग्याच्या परम शिखरावर चढलेले होते. ही उन्नतावस्था काही शतके भोगल्यानंतर त्यांची अशी घसरगुंडी झाली की अवनतीच्या नीचतम अवस्थेला ते जाऊन पोचले. एवढेच विवेचन ८ व्या अंकात आहे.

आता ' नीचैर्गच्छत्युपरि च दशा चक्रनेमिक्रमेण ' हे जे कालिदासाचे वचन आहे

त्याचा अर्थ काय होतो हे पाहू. मेघदूतामध्ये यक्ष आपल्या विरहदुःखित पत्नीला जे आश्वासन देतो त्यात हे वचन आलेले आहे. ज्या श्लोकार्धात हा सिद्धान्त सांगितला ते श्लोकार्ध आणि त्याचा अर्थ असा :

कस्यात्यन्तं सुखमुपनतं दुःखमेकान्ततो वा
नीचैर्गच्छत्युपरि च दशा चक्रनेमिक्रमेण ।।
—उत्तरमेघ ४६.

पूर्णांशाने सतत सुखि वा दुःखि वा कोण सांग
खाली गेला फिरत वरती येतसे चक्रभाग ।।

म्हणजे यक्ष इथे आपल्या प्रिय पत्नीला धीर धरायला सांगत आहे. ' हे कल्याणी, तू मुळीसुद्धा विव्हल होऊ नको, कारण ज्याला सदोदित सुख मिळाले किंवा जो सदोदित दुःखामध्येच पडला असा या जगात कोण आहे ? चाकाच्या धावेच्या गतीप्रमाणे माणसाला अवनत आणि उन्नत स्थिती प्राप्त होत असते.' चाकाच्या दृष्टान्तावरून काय अनुमान निघते एवढेच जर पाहावयाचे झाले तर ते निखालस दैववादाचे असले पाहिजे असे म्हणता येत नाही. चाकाच्या तळाशी असलेल्या भागाला उच्च स्थिती प्राप्त व्हावयाची तर ते चाक हल्ले तर पाहिजे; म्हणजे ते हलविण्यासाठी किंवा फिरविण्या-साठी कोणती तरी शक्ती त्याला फिरवीत किंवा ओढीत असली पाहिजे. ही शक्ती दैवाची असू शकेल किंवा मनुष्यप्रयत्नाचीही असू शकेल किंवा दैव आणि मनुष्यप्रयत्न या दोघांची मिळून असू शकेल. हा दृष्टान्त फक्त एवढेच दर्शवितो की, नीचावस्थेतून उच्चावस्था, त्यातून पुन्हा नीचावस्था असे चक्र जगतामध्ये चाललेले दिसते. मनुष्यप्रयत्न उपयोगाचे नाहीत किंवा प्रयत्न करूनही काही होणार नाही अशा तऱ्हेचा निर्भेळ दैववाद येथे अवश्य प्राप्त होतो असे मानण्याचे कारण नाही.

' लोकहितवादी ' निबंधात, मालेच्या ६५ व्या अंकामध्ये राष्ट्रांचे उत्कर्षापकर्ष या विषयाचा चिपळूणकरांनी विचार केला असून तत्संबंधी आपली मते सांगितली आहेत. चालू संदर्भ हिंदुस्थानाच्या स्थितीसंबंधाचा आहे आणि त्या बाबतीत लोकहितवादी व चिपळूणकर यांच्यामध्ये दांडगा मतभेद आहे. वादाचे मूळ तेच आहे. ' सध्यां, (म्हणजे इ. स. १८८० च्या सुमारास, चिपळूणकर लिहीत होते त्या वेळी ) आपल्या देशाची जी निकृष्टावस्था झाली आहे ती कोणत्या प्रकारची आहे ' असा प्रश्न उपस्थित करून त्याचा विचार मालाकारांनी केला आहे. निकृष्टावस्था आहे; पण निकृष्ट स्थितीची दोन स्वरूपे असतात : एक शाश्वत अथवा नित्य व दुसरे आगंतुक अथवा नैमित्तिक. यांपैकी शाश्वत अथवा नित्य निकृष्ट अवस्थेची उदाहरणे म्हणून मिसर, इराण, ग्रीस व रोम या राष्ट्रांच्या स्थितीकडे त्यांनी बोट दाखविले आहे. प्राचीन इतिहासातल्या एकेका कालखंडामध्ये ही राष्ट्रे उत्कर्षशिखरावर होती पण आता त्यांच्या पूर्वकालीन वैभवाचा ' फारसा मागमूसही उरला नाहीं म्हटलें असतां चालेल. ' चिपळूणकरांच्या वेळची

जागतिक स्थिती जर लक्षात घेतली तर त्यांचे हे वर्णन चुकले होते असे म्हणता येत नाही. यांपैकी इटलीखेरीज बाकीचे तीन देश त्या वेळी फारसे खिजगणतीत नव्हते. आणि इटलीमध्ये पिडमाँटच्या संस्थानाने जरी ऑस्ट्रियाच्या जोखडाखालून नुकतीच आपली मुक्तता करुन घेतली होती तरी राष्ट्राराष्ट्रांच्या स्पर्धेमध्ये त्याला फारसे महत्त्व नव्हते. आजची स्थिती जरी पाहिली तरी स्वभावसिद्ध गुणांच्या समृद्धीने प्राप्त होणारी योग्यता हा जर निकष लाविला तर मिसर म्हणजे ईजिप्त आणि इराण या दोन्ही देशांच्या वर्गवारीमध्ये मोठा फरक करावा लागेल असे वाटत नाही. ईजिप्त देशाला अनेक आगंतुक कारणांमुळे आलेले महत्त्व किती आणि त्याची स्वतःची योग्यता किती याची कसोटी लागण्याचा प्रसंग १९६७ च्या इस्राईलबरोबरच्या युद्धाच्या प्रसंगी आणि त्यानंतर नुकत्याच झालेल्या संघर्षाच्या वेळी असा दोनदा येऊन चुकला आहे. त्यासंबंधी इथे अधिक लिहिण्याचे कारण नाही. खनिज तेलामुळे आगंतुक प्राप्त झालेल्या अवाढव्य श्रीमंतीमुळे राष्ट्राराष्ट्रांच्या राजकारणामध्ये इराणचा भाव आज पुष्कळ चढलेला दिसत आहे. तथापि निर्वाणीचा प्रसंग आल्यास हे सगळे कितपत टिकेल याची परीक्षा अद्यापि व्हावयाची आहे.

तेव्हा नित्य किंवा शाश्वत निकृष्टावस्थेचा जो प्रकार चिपळूणकरांनी कल्पिला आहे तो अगदीच काही वेडगळपणाचा नाही एवढे वरील विवेचनावरुन दिसून येईल.

निकृष्टावस्थेचा दुसरा प्रकार म्हणजे आगंतुक किंवा नैमित्तिक निकृष्टावस्था. आपल्या देशाची निकृष्टावस्था अशाच प्रकारची आहे असे चिपळूणकरांचे म्हणणे आहे. एवढ्याने आपल्या म्हणण्याचा नीटसा बोध होणार नाही यास्तव इतिहासातली त्यांनी काही उदाहरणे दिली आहेत. पानपतच्या दारुण संग्रामानंतर ब्राह्मण बादशाहीचा जो अपकर्ष झाला किंवा शिवाजीमहाराजांच्या मरणोत्तर मराठ्यांच्या स्वराज्याला जे ग्रहण लागले ते दोन प्रसंग त्यांनी उदाहरणादाखल घेतले आहेत. पानपतानंतर थोरल्या माधवरावाने हिंदुस्थान पुन्हा सर करून यवनांचे पुनः शासन केले. त्याप्रमाणे शिवाजीनंतर मराठ्यांचे राज्य 'त्यांच्या चिरंतन वैऱ्याच्या कब्जांत सांपडून संपूर्ण राज्य-वृक्ष उपळून पडल्यासारखाच झाला होता.' तरी मराठ्यांनी न डगमगता पुन्हा आपले राज्य परत मिळविले. ही दोन उदाहरणे आगंतुक किंवा नैमित्तिक अपकर्षाची झाली.

यानंतर आपल्या राष्ट्राच्या सद्यःस्थितीचे वर्णन करून ती केवळ आगंतुक किंवा नैमित्तिक स्वरुपाची कशी आहे हे पटवून देण्याचा ते यत्न करतात. 'जसा एकादा नदीप्रवाह लव्हाळ्यांनी चहूंकडे आच्छादून टाकला असल्यामुळें दृष्टिगोचर होत नसतो व तो आटून गेला कीं काय असा भास होतो किंवा एकादा जबरदस्त घाव लागल्यानें चांगला सशक्त मनुष्य जसा कांहीं वेळ निश्चेष्ट होऊन पडतो तशी वस्तुतः पाहतां आज आमच्या देशाची स्थिति झाली आहे. पूर्वी कधींही पडली नव्हती अशी परकी अंमलाची जबरदस्त मगरमिठी त्यावर एकाएकी येऊन पडल्यामुळें त्याची

हालचाल अगदीं बंद झाल्यासारखी बाह्यतः दिसते खरी व इतक्या दिवसांच्या निश्चेष्टतेनें त्याच्यावर पुष्कळ ग्लानी आली आहे हेंही खरें. तरी एकंदरींत पाहतां आतल्या शरीरप्रकृतीस काही धक्का पोचला आहे असें आम्हांस वाटत नाहीं.' देशाच्या निकृष्टावस्थेची चिपळूणकरी मीमांसा याप्रमाणे आहे. हीच पुढे निराळ्या रीतीने मालेच्या ८३व्या अंकात सांगितली आहे.

'वरील मत पुष्कळांस विलक्षण वाटण्यासारखें आहे' असे चिपळूणकर स्वतः सांगतात आणि इथेच त्यांचा लोकहितवादीप्रमुख सुधारकांशी मोटा मतभेद आहे. आपल्या देशाची प्रकृती मुळापासून बिघडली आहे. 'आमचा धर्म बिघडला आहे, आमची नीति सुटली आहे,' अशा रीतीने मुळातच बिघाड झाल्यामुळे हे सर्व मुळासकट उपटून इथे सगळे नवीन आणून स्थापिल्याशिवाय देशाची सुधारणा होणार नाही; अशी एकंदरीने सुधारणापक्षाची धारणा होती. ही जी परस्पर विरुद्ध मते, त्यांच्यापैकी खरे कोणते या प्रश्नाचा निर्णय भिन्नभिन्न दृष्टिकोणानुसार निरनिराळा होऊ शकेल. पुढच्या काळात राष्ट्रीय जागृती आणि मोठमोठ्या चळवळी करून राष्ट्रधुरीणांनी स्वातंत्र्य मिळविले तेव्हा आपल्या राष्ट्राच्या आतल्या शरीरप्रकृतीस काही धक्का पोचला नसल्यामुळे, राष्ट्राचा विस्तार आणि त्यातील नाना प्रकारचे भेद लक्षात घेता, त्या मानाने थोड्याच काळात आपण स्वातंत्र्य मिळविले. म्हणजे चिपळूणकरांचा सिद्धान्त खरा ठरला, असे एका पक्षाला वाटेल. उलट पक्षी, राजकीय स्वातंत्र्य मिळाले असले तरी आपली खरीखुरी सुधारणा अद्याप झाली नाही, जातिभेद, अस्पृश्यता इत्यादी सामाजिक रोगांचे निर्मूलन झाले नाही, वर्गविग्रह, भाषिक संघर्ष, प्रादेशिक असूया इत्यादींचे थैमान चालू आहे, तेव्हा आपल्या समाजाची खरी सुधारणा अद्याप झाली नाही. तिच्या अभावी राजकीय स्वातंत्र्याला काही अर्थ नाही, असेही दुसरे मत असू शकेल. पण लोकहितवादी-प्रभृतींनी आग्रहाने आळविलेल्या सुधारणा बहुतांशी सर्व झाल्या आहेत; त्या झाल्या म्हणूनच आपणास स्वातंत्र्य मिळाले आणि आपण उन्नतावस्थेला पोचलो, असे जर कोणी म्हणेल तर ते खरे असल्याची साक्ष सध्याच्या समाजस्थितीत आपणाला पटणार नाही.

राष्ट्राराष्ट्रांच्या इतिहासामध्ये योगायोगाने काही गोष्टी घडून येतात की नाही याविषयी वाद होण्याचे कारण नाही. व्यक्तीच्याप्रमाणे राष्ट्राच्या आयुष्यातही दैवाने, म्हणजे योगायोगाने किंवा यदृच्छेने अनेक गोष्टी घडून येतात हे दाखविणे फारसे कठीण जाणार नाही. मुख्य प्रश्न असा की, योगायोग अथवा दैव मान्य केले की, त्यामुळे प्रयत्नवाद व्यर्थ ठरतो की काय ? तसे ठरण्याचे मुळीच कारण नाही. कार्य घडून येण्याच्या अनेक कारणांपैकी दैव हे एक कारण होय, असे मानिल्याने इतर कारणांच्या सिद्धीकरिता जो प्रयत्न लागणार तो निरर्थक ठरण्याचे काही कारण नाही. चिपळूणकरांनी तसे कुठेही म्हटले नाही. ते खरे प्रयत्नवादी होते. त्यांचे जाणतेपणीचे सर्व आयुष्य त्याला साक्ष आहे. निष्क्रिय निष्फळ प्रारब्धवादाचे ते प्रतिपादक होते हे म्हणणे भ्रांत आहे.

## महाराष्ट्र–साहित्य–पत्रिका

**माहितीपत्रक तक्ता–४ नियम ८**

| | |
|---|---|
| (१) प्रसिद्धि स्थान | महाराष्ट्र-साहित्य-परिषद, टिळक रस्ता, पुणे ३० |
| (२) प्रसिद्धि प्रकार | त्रैमासिक |
| मुद्रणस्थळ | चिं. स. लाटकर, कल्पना मुद्रणालय, पुणे ३० |
| (३–४) मुद्रक–प्रकाशक : | वासुदेव गोपाळ देशपांडे |
| राष्ट्रीयत्व : | भारतीय |
| पत्ता : | महाराष्ट्र-साहित्य-परिषद, टिळक रोड, पुणे ३० |
| (५) संपादक | भालचंद्र दिनकर फडके |
| राष्ट्रीयत्व | भारतीय |
| पत्ता | पुणे विद्यापीठ कार्टर्स, पुणे ७ |
| (६) मालकी | महाराष्ट्र-साहित्य-परिषद टिळक रस्ता, पुणे ३० |

मी वासुदेव गोपाळ देशपांडे असे जाहीर करतो की, मी वर दिलेली माहिती बरोबर व खरी आहे.

१५ जून १९७४

**वासू देशपांडे**<br>कार्यवाह<br>महाराष्ट्र-साहित्य-परिषद

अनुक्रमणिका

# निबंधमालेचे ऐतिहासिक कार्य



डॉ. सरोजिनी शेंडे

एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धात इंग्रजांबद्दल व इंग्रज राजवटीबद्दल, भारतवासियांना बरीचशी यथार्थ कल्पना आली. तिचे गुणावगुण जाणवू लागले. महाराष्ट्रात काही विचारवंतांना 'हिंदू लोकांमध्यें मूर्खपणा वाढला, तो दूर करण्याकरितांच हे गुरु दूर देशांतून ईश्वरानें इकडे पाठविले आहेत.' (लोकहितवादी, श. पत्रे नं. ४६) 'ईश्वरी नेमानेमानें इंग्रज हे आपले गुरु व त्यांच्या सान्निध्यांत आपण आपला रानटी समाज सोडून सुधारलेल्या समाजांत पदार्पण करूं', (रानडे) असे मनोमन वाटत होते. आपल्या देशाचा उद्धार इंग्रजांच्याच हातून होईल, याबद्दल त्यांना तिळमात्र शंका नव्हती. इंग्रजांकडून निरनिराळ्या विषयांतील ज्ञान आत्मसात करून नंतर हळूहळू त्यांची राज्यपद्धती शिकून इंग्लंडमधील पार्लमेंटप्रमाणे येथेही व्यवस्था व्हावी, असाही विचार लोकहितवादींनी मांडला होता. तत्कालीन बहुसंख्य सुशिक्षितवर्गाला इंग्रजांप्रमाणेच जे जे इंग्रजप्रणीत ते ते श्रेष्ठ व जे जे एतद्देशीय ते ते तिरस्करणीय व त्याज्य वाटत होते. जोतिबा फुल्यांसारख्या कृतिशील विचारवंताला जातिभेद व 'ब्राह्मणांची गुलामगिरी' जाचक वाटत होती व ती दूर करण्यासाठी त्यांनी 'सत्यशोधक समाज' सुरू केला होता.

अशा या परिस्थितीकडे आपल्या स्वतंत्र दृष्टीने पाहणारे व तिचे आपल्या पद्धतीने मूल्यमापन करणारे विष्णुशास्त्री चिपळूणकर हे एक होत. चिपळूणकरांना या साऱ्या विचारवंतांची इंग्रजी राजसत्तेबद्दलची भावना व दृष्टी पटत नव्हती. चिपळूणकरांच्या तेजस्वी वृत्तीला त्यांचा हा परधार्जिणेपणा विलक्षण तापदायक वाटत होता. म्हणून त्यांनी १८७४ च्या जानेवारीत आपली 'निबंधमाला' सुरू केली. 'प्रस्तुत मालेचा उद्देश' या लेखात आपली भूमिका स्पष्ट करताना ते म्हणाले, 'आमचा पुस्तककर्त्यांच्या नात्यानें जगाशीं जो शत्रुमित्रसंबंध आहे तो केवळ सत्य व स्वदेशप्रीति ह्या दोहोंच्या संबंधानेंच काय तो आहे. म्हणजे आपल्या जन्मभूमीचा योग्य अभिमान असून ज्यांस सत्य आवडते ते आमचे मित्र व स्वदेशाची टवाळी करण्यांत ज्यांस भूषण वाटतें व जे असत्यास जाणूनबुजून भजतात किंवा त्याच्या निरसनाविषयीं अनास्था प्रकट करतात ते आमचे द्वेष्य!' 'स्व'त्वहीन स्वकीयांची स्वाभिमानशून्य कृती त्यांना आत्मघातकी









वाटत होती. ती निःशेष करून चिपळूणकरांना त्यांच्या मनात स्वदेश, स्वभाषा व स्वसंस्कृती यांविषयी स्वाभिमानाची ज्योत प्रज्वलित करायची होती. या हेतूनेच त्यांनी आपली लेखणी सरसावली.

ह्या पार्श्वभूमीवर त्यांच्या कार्याचा विचार करता त्यांच्या कार्याचे स्वरूप दोन प्रकारचे आढळते. त्यांना अभिप्रेत असलेल्या विधायक उपक्रमांबद्दल त्यांनी अत्यंत तळमळीने लिहिले; तर त्यांना जेथे जेथे परधार्जिणेपणा, इंग्रजांचे नसत्या गोष्टीतील अनुकरण, वा इंग्रजप्रणीत उपक्रमांचा अकारण केलेला गौरव आढळला, तेथे त्यांनी अशा मंडळीवर 'न भूतो न भविष्यति' असा जोरदार हल्ला केला. त्यांनी केलेले असले हल्ले नेहमीच न्याय्य वा औचित्यपूर्ण होते, असे नाही; परंतु त्यामागे कोणताही वैयक्तिक आकस वा लाभाचा हेतू नव्हता. अत्यंत प्रामाणिकपणे व सात्त्विक संतापानेच ते असा प्रहार करीत. इंग्रज सरकारच्या राज्यकारभारातील न्यायान्यायाविषयी व त्यांच्या वृत्तीविषयी लिहिताना पहिल्या वर्षाच्या शेवटी लिहिलेल्या 'निबंधमाला वर्ष १ ले' या लेखात ते म्हणतात, 'इंग्रज जसे देव नव्हेत, तसेच आम्हीही पशु किंवा राक्षस नाही. दोघांतही गुणदोष आहेतच आहेत; आणि त्याविषयीं वाटाघाट करण्याचा अधिकार इंग्रज ग्रंथकारांस जसा आहे, तसाच तो आम्हांसही आहे.' किंवा 'सारें सत्य काय तें एका बुकांत सांठवलें आहे व सारे मनुष्यजातीचे गुण जगन्नियंत्याने एका राष्ट्रांत कोंडून भरले आहेत, हें मत आम्हांस बिलकुल पसंत नसून त्यासारखें मूर्खपणाचें व अधमपणाचें मत कोणतेंही नाहीं अशी आमची पक्की समजत आहे,' अशा प्रकारच्या उद्‌गारांतील त्यांचा निर्भयपणा व मनोधैर्य प्रशंसनीय आहे. त्यांची सत्यनिष्ठा व प्रामाणिकपणा प्रखर असल्यामुळे त्यांनी सरकारचे वा स्वजनांचे प्रमाद दिसताच घणाघाती आवेशाने त्यांचे वाभाडे काढले. हा प्रहार उपहास, व्याजोक्ती, वक्रोक्ती, ऊनोक्ती इत्यादी आयुधे अचूक रीत्या वापरल्यामुळे यशस्वी होत असे. त्यांचा टीकाविषय झालेली व्यक्ती वा संस्था काही कालपर्यंत तरी निस्तेज होत असे.

'आम्हांस जो सत्याचा व देशहिताचा मार्ग दिसत आहे त्यास अनुसरणें हेंच आम्हांस प्राप्त झालेल्या विद्येचें बीज होय' हे त्यांचे प्रतिज्ञोत्तर असे. त्यामुळेच त्यांना भोवतालच्या सुशिक्षित वर्गाची आपल्या भाषेकडे पाहण्याची उपेक्षेची वृत्ती संतापजनक वाटे. 'आपल्या भाषेच्या अंगीं अर्थव्यंजकता, वर्णसौंदर्य फार कमी आहे — किंबहुना नसल्यासारखेंच आहे — हा अलीकडील विद्वानांचा ग्रह कांहीं अंशीं तरी मोडून टाकण्यास जर आमचे निबंध कारण झाले, तर आमच्या हातून देशहिताचें एक मोठेंच कृत्य घडलेलें आम्ही मानूं' — ही त्यांची इच्छा होती. त्यांना इंग्रजी भाषा व तिच्यातून प्राप्त होणारे ज्ञान याबद्दल ऋणी वाटायचे. तिला ते 'वाघिणीचे दूध' म्हणत. 'इंग्लिश भाषेचा आमच्या भाषेशीं जो संसर्ग घडला आहे, तो सर्वथा हिता-वहच होईल.' (भाषापद्धती) परंतु इंग्रजी भाषेच्या परिचयामुळे स्वभाषेची उपेक्षा व

निंदा करणाऱ्यांचा अधिक्षेप ते परखड शब्दात करीत. इंग्रजांच्या संपर्कामुळे आपल्या साऱ्या क्षेत्रांविषयी नवशिक्षितांना जो न्यूनगंड निर्माण आला होता, तो त्यांचे मन प्रक्षुब्ध करी. तत्कालीन सुशिक्षितांमध्ये इंग्रजांचे साऱ्या बाबतीत अनुकरण करण्याची जी लाट आली होती, त्याबद्दल शास्त्रीबुवांच्या मनात तिटकारा होता. त्यामुळेच आर्य-समाज, प्रार्थनासमाज व सत्यशोधक समाज या संस्थांची भूमिका व उपक्रम यांचा गाभा न तपासता त्यांनी त्यांतील जुजबी तपशिलावर एकान्तिक व निंदाव्यंजक शब्दांचा मारा केला.

स्वदेशाभिमान, स्वदेशप्रीती व स्वभाषाभक्ती यांच्या जाज्वल्य अभिमानाने व अभिनिवेशाने चिपळूणकर एवढे भारलेले होते की, त्या विषयासंबंधी जो कोणी विरोधी सूर काढील, त्याच्यावर ते कडाडून हल्ला करीत, त्याची कुचेष्टा करीत; पुष्कळदा हे विरोधक राजमान्यतेचा शिक्का असणारे रावसाहेब, रावबहाद्दूर असत किंवा राज-सत्तेचा भक्कम पाठिंबा असणारे रेवरंड असत. ते आपल्या कृतींनी व उक्तींनी जनतेचा जो तेजोभंग करीत, त्याला तोंड देऊन जनतेची अस्मिता येनकेनप्रकारेण टिकविण्यासाठी शास्त्रीबुवांना आपली तीक्ष्ण हत्यारे वापरावी लागत. ते म्हणतात, 'जो ग्रंथकार वाचकांस नेहमीं रंजवूं पाहील व त्यांस नेहमीं थक्क करून टाकण्याचा प्रयत्न करील त्यांस निवळ सत्यासच अनुसरून चालणें उपयोगी पडणार नाहीं. मीठमिरचीचा साठा त्यास आपणापाशीं नेहमीं भरपूर ठेवावा लागेल.' या विधानानंतर ते हा प्रकार गौण आहे असेही सांगून जातात.

चिपळूणकरांच्या सुशिक्षित वर्गाकडून काही रास्त अपेक्षा होत्या. त्यांनी स्वदेशाचे ऋण आपणावर असून ते आपण फेडले पाहिजे, अशी बांधिलकी स्वीकारली पाहिजे; व ज्यांनी इंग्रजी भाषेचा अभ्यास करून विविध प्रकारचे ज्ञान संपादन केले, त्यांनी आपल्या अज्ञानी बांधवांना सुविचारी बनविण्यासाठी देशभाषेत ग्रंथलेखन करावे; ( वक्तृत्व ) असे वाटत असे. स्वदेशाच्या इतिहासाविषयी आस्था बाळगून, त्याचा शोध घ्यावा व परकीयांची असत्य व अज्ञानमूलक वचनांच्या आधारे स्वकीयांना हीन लेखण्याची वृत्ती सुशिक्षितांनी टाकावी, असे ते म्हणत. ( भाषापद्धती ) स्वभाषेची अभिवृद्धी व्हावी असे वाटत असेल तर तिचा अभिमान बाळगून तीत ग्रंथरचना करावी; भाषेचा विकास मनुष्यप्रयत्नांनीच होतो, असे चिपळूणकरांनी मत ठासून मांडले. ( भाषांतर )

विष्णुशास्त्री चिपळूणकरांनी सतत प्रयत्नशील राहून आपल्या बांधवांचा न्यूनगंड नाहीसा केला. त्यांची अस्मिता जागृत केली. इतिहासातील उज्ज्वल कालाचे संस्मरण करून त्यांच्या मनात 'पूर्व दिव्य ज्यांचे त्यांना रम्य भावि काल' असे आशावादी विचार स्फुरण्यास मदत केली. ज्यांनी देशहिततत्परतेने असे कार्य करायला प्रारंभ केला, त्यांची भलावण केली. 'काव्येतिहाससंग्रह' मासिकाने केलेल्या कार्यारंभाचा गौरव करून त्याच्या या कार्याला इतरांना मदत करण्यासाठी आवाहन केले. 'केसरी'

अनुक्रमणिका

व 'मराठा' ही मराठी व इंग्रजी नियतकालिके सुरू करून समाजप्रबोधनाचे कार्य सुरू केले. राष्ट्रीय शिक्षण देता यावे म्हणून 'न्यू इंग्लिश स्कूल' हे विद्यालय सुरू केले. देश व समाजाच्या उन्नतीसाठी झटणारे लो. टिळक, आगरकर, आपटे, नामजोशी इ. तडफेचे तरुण सहकारी मिळविले. अशा रीतीने विचाराला भक्कम कृतीची जोड दिली.

देशहिताच्या प्रेरणेने चिपळूणकर निबंधमाला चालवीत असता, त्यांच्या हातून मराठी भाषेची अमौलिक सेवा घडली. त्यांनी मराठी गद्याला ओजस्वी रूप दिले. 'निबंध' हा एक नवा वाङ्मयप्रकार निर्माण झाला. त्यापूर्वी विविध विषयांवर लेख लिहिले जात होते. आशयाच्या दृष्टीने पाहिले तर विचार व तळमळ त्यामध्ये व्यक्त होत होती; परंतु भाषेला आशयाच्या अनुरोधाने विविध विलासांनी अधिक आशय-संपृक्त बनविले ते चिपळूणकरांनीच. स्वतःला 'मराठी भाषेचा शिवाजी' म्हणवून घेतले ते यामुळे यथार्थच वाटते. मराठी भाषेच्या जिवंतपणाची व टसकेबाजपणाची, नाट्यपूर्ण वक्तृत्वपूर्ण सरसतेची प्रत्ययकारिता चिपळूणकरांच्या निबंधमालेमुळे आजही जाणवते. त्यांच्या भाषेतील अर्थवाहकता, भारदस्तपणा, शब्दांचा मार्मिक उपयोग हे त्यांच्या विदग्ध व्यक्तित्वाचेच पैलू आहेत.

विषय कोणताही असो शास्त्रीबुवांची लेखणी काही वेळा विषयाच्या अनुषंगाने तर काही वेळा विषयान्तर करून सुधारकांवर, प्रार्थनासमाजीयांवर किंवा मिशनरींवर टीका करताना विविध रूपे धारण करते. कित्येक ठिकाणी मिस्किलपणे प्रतिस्पर्ध्याला चिमटे घेते तर काही वेळा उपरोधपूर्ण विधानांनी निस्तेज करते; तर काही वेळा वक्रोक्तीने वा व्याजोक्तीने हास्यास्पद करते. निरनिराळ्या ग्रंथांतले औचित्यपूर्ण संदर्भ देऊन आपल्या विधानांना बळकटी आणीत, तर काही ठिकाणी त्याच संदर्भांचा उपयोग प्रतिस्पर्ध्याला चारीमुंड्या चीत करण्यासाठी करीत. चपखल अवतरणे देऊन विषयाचा परिचय मार्मिकरीत्या करून देत. विषयाचे मुद्देसूद सूत्र पुढे ठेवून रसिक वृत्तीने विषयाला न्याय देत. नुसत्या विषयविवेचनापेक्षा आक्रमक पवित्रा घेऊन वकिली बाण्याचा युक्तिवाद चिपळूणकर चांगला करतात.

'मराठी भाषेची सांप्रतची स्थिति' या विषयापासून 'आमच्या देशाची स्थिति' या विषयापर्यंत विविध विषयांचा परामर्श शास्त्रीबुवांनी घेतला. त्यात ग्रंथांवर परीक्षणे आहेत, टीकाकार, वाचन, इतिहास इ. अनेक वाङ्मयीन, सामाजिक, राजकीय विविध प्रकारचे उपयुक्त ज्ञान देणारे लेख समाविष्ट झाले आहेत. ह्या निबंध-वाङ्मयातून मराठीतील वैचारिक निबंधाची परंपरा सुरू झाली. चिपळूणकरांच्या 'समुद्र' या छोट्या लेखाचे नाते आजच्या ललित लेखांशी आहे. तो लेख म्हणजे एक गद्य-काव्यच. परंतु त्यांचे इतर निबंधांचे रूप हे विचारवंतांनी माध्यम म्हणून स्वीकारले. शास्त्रीबुवांच्या निबंधरचनेचे विशेष निरनिराळ्या विचारवंतांच्या लेखनात प्रकर्षाने जाणवतात. त्यांची निर्विवाद व तर्कसंगत प्रतिपादन करण्याची पद्धती लो. टिळकांच्या

लेखांत आढळते, तर विशिष्ट उपक्रमांबाबतची आवेशपूर्ण तळमळ आगरकरांत; त्यांची वक्रोक्ती व उपहासगर्भ शैली शि. म. परांजपे यांच्या लिखाणात आढळते. वा. म. जोशी, न. चिं. केळकर, ग. त्र्यं. माडखोलकर, श्री. के. क्षीरसागर, पु. ग. सहस्रबुद्धे, हे निबंधकार चिपळूणकरी परंपरेतील होत. इतर वाङ्मयप्रकारांनी आपले रूप बदलले, काही क्षीण झाले, काही नष्ट झाले; परंतु निबंधाचे सारभूत रुप अजून टिकून आहे. निबंधाला नामसादृश्यामुळे ललित निबंधाची समांतर वाढ झाली व आता ललित लेख आपले वेगळे रूप घेऊन सिद्ध झालेले दिसतात. तरीही निबंधाला वेगळे अस्तित्व आहे.



## साभार पोच

जास्वंद : माधव आचवल, मौज प्रकाशन, किंमत रु. १७·५०

रंग माझा वेगळा : सुरेश भट, मौज प्रकाशन, किंमत रु. १०·००

डॉ. श्री. व्यं. केतकर ह्यांचे वाङ्मयविषयक लेख,
संपादक : गं. दे. खानोलकर, मराठी संशोधन मंडळ,
मुंबई, किंमत रु. २०·००

राजगुरु समर्थ रामदास : डॉ. शं. दा. पेंडसे
केसरी प्रकाशन, किंमत रु. २५·००

अनुक्रमणिका

# जोतीराव फुले यांच्या लेखनाची धाटणी



## भास्कर लक्ष्मण भोळे

कित्येकदा लेखकाच्या प्रामाणिक हेतूंचा विपर्यास होऊन, त्याने प्रयत्नपूर्वक अवलंबिलेली शैली हेच त्याच्या लेखनाचे न्यून ठरते व त्यामुळे त्याच्या अभिजात व मूलगामी विचारांनाही कमीपणा देण्याची चूक अनेकांच्या हातून घडते. महाराष्ट्रात जोतीरावांच्या लेखनाबाबत असेच काहीसे घडले आहे असे म्हणावे लागेल. त्यांच्या अनेक समकालीनांनी त्यांच्यावर याच कारणासाठी टीका केली होती. त्यांची कुत्सित उपेक्षा केली होती. खुद्द मालाकार चिपळूणकरांनीही या प्रवृत्तीचे नेतृत्व केलेले दिसते. एके जागी त्यांनी लिहिले आहे : ' अजम जोतीराव गोविंदराव हे वर सांगितलेल्या (सत्यशोधक) समाजाचे मुख्य पुरस्कर्ते व आधारस्तंभ होत. या गृहस्थांच्या अंगीं अनेक अलौकिक गुण वास करताहेत. ते कोणते म्हणाल तर हे कवी आहेत, इतिहासज्ञ आहेत, मोठे गहन भाषापंडित आहेत, वक्ते आहेत, आणि सर्वांत विशेषतः सांगण्या-सारखें हें कीं, आमच्या देशांत अलीकडे लोककल्याणाला वाहिलेली जी मंडळी चोहीकडे आढळते त्यांत तर यांच्यासारखे केवळ तद्रूप बनलेले थोडेच सांपडतील ! ' [1] या शब्दां-मागील उपरोध नवसाक्षर वाचकाच्याही लक्षात यावा इतका स्पष्ट आहे, आणि याच पूर्वग्रहातून जोतिबांच्या लेखनाचा व कार्याचा विचार प्रामुख्याने झाला आहे. मालाकार ज्या ' पुस्तकी ' अर्थाने विद्वान होते, बहुश्रुत होते, जी व्याकरणशुद्ध, शिष्टसंमत भाषा जाणत होते किंवा ज्या भाषेवर त्यांची हुकमत होती — त्या कोणत्याच दृष्टीने जोती-रावांना इतिहासज्ञ, भाषापंडित वा वक्ते ही अलंकरणे लावता यायची नाहीत. त्यांना शास्त्रीबुवांसारखे प्रच्छन्न प्रहार करता येत नाहीत, त्यांचे आघात प्रत्यक्ष असतात. भाषा मराटमोळी असते. दृष्टान्त ठसटशीत – प्रसंगी बटबटीतही – असतात. आत-बाहेर वेगळेपणाचे वेगडी नाटक जोतीरावांना जमत नव्हते. अर्थात त्यांच्या सगळ्या हेतूंकडे जाणीवपूर्वकच दुर्लक्ष करून त्यांच्या ' ब्राह्मणी ' समकालीनांनी त्यांची कुचेष्टा करणे एक वेळ एक अपरिहार्य तात्कालिक प्रतिक्रिया म्हणून समजूही शकते, परंतु वाईट वाटते ते याचे की, अजूनही काही विचारवंत हा पूर्वग्रह बाजूला ठेवून नितळ मनाने जोतीरावांच्या विचारांकडे पाहू शकत नाहीत. ते त्यांच्या रांगड्या, मराटमोळ्या भाषेला बुजतात तरी किंवा केवळ त्या भाषेवरूनच त्यांच्या लेखनातील विचारांचा पोत ठरवून बसण्याचा

अनुक्रमणिका

उतावळेपणा तरी करतात. या दोन्ही गोष्टी टाळून जोतीरावांचे लिखाण वाचल्यास त्यांची भाषा व शैली त्यांच्या हेतूंशी किती सुसंगत होती, किंवा त्यांची धाटणी व वैचारिक बैठक या गोष्टी कशा अन्योन्याश्रयी होत्या याचा प्रत्यय सहृदय वाचकांस येऊ शकतो. अशाच प्रत्ययाचे रसग्रहण वाचकांसमोर ठेवणे हा या लेखाचा हेतू आहे.

निबंधमालाकार लिहितात : 'जोतिबांचे महान् पूर्वज जे शंखासुर, हिरण्याक्ष वगैरे त्यांच्या प्रचंड तांडवाने सगळी भूमि दणाणून जात असेल, त्याप्रमाणेंच आमच्या देश-भाषेचा टाकान्टाका या एका ग्रंथकाराच्या अकांडतांडवाने खिळखिळा होऊन गेला आहे! व्युत्पत्तिज्ञानाकडे पाहावें तर असें म्हणावें लागतें कीं, आजपर्यंत पाणिनी, भट्टोजी वगैरे वैयाकरण आमच्या देशांत झाले व युरोपांत मोक्षमुल्लरादिकांनींही आम्हा-करितां व्याकरणें रचून इकडे पाठवून दिलीं, पण त्या सर्वांनीं निवळ झक मारली!! जोतिबांच्या 'गुलामगिरी'त 'द्विज', 'ब्राह्मण', 'विप्र', 'संस्कृत', 'मार्तंड' इत्यादि शब्दांची मूळपीठिका जी आढळते ती पाणिनीच्या प्रपितामहाच्याही स्वप्नीं कधीं आली नसेल.'[२] शास्त्रीबोवांचे म्हणणे खरेच आहे. पण ते एक गोष्ट विसरतात की, पाणिनीच्या अभ्यासकांशी वा पाणिनीय व्याकरण घडघडा मुखोद्गत करणाऱ्या पढिकांशी कोरड्या शुष्क तत्त्वज्ञानाचा शाब्दिक काथ्याकूट करीत जोतीरावांना बसायचे नव्हते, तर त्यांना हृदयसंवाद साधायचा होता. कुणब्यांशी – माळ्यांशी, महारांशी – मांगांशी, शूद्रादी – अतिशूद्रांशी त्यांना हितगूज करायचे होते. विद्वन्मान्य होण्यापेक्षा या उपेक्षितांशी संवाद व समनुयोग साधणे त्यांना अधिक मोलाचे वाटत होते. आणि म्हणून त्या दलितांना पेलतील, समजतील, रुचतील अशा शब्दांची, वाक्यांची, दृष्टान्तांची वा वाक्प्रचारांची पेरणी जोतीरावांनी आपल्या सगळ्याच लिखाणातून केली आहे. त्यांच्या भाषेचे नाते संस्कृतशी नसले तरी या समाजतळी खितपत पडलेल्या पांगळ्यांच्या संस्कृतीशी मात्र थेट रक्त-मांसाचे आहे. या हेतूंच्या पूर्तीच्या अनुषंगाने जोतिबांच्या लेखनाचा विचार जर केला तर पटते की, जे प्रचंड आंदोलन त्यांच्या भाषेने या प्रदेशात पेटवले, ज्या महामंथनाला तिने हात घातला त्याची तुलना निबंधमालाकारांच्या शब्दात करावयाची तर, 'शंखासुर, हिरण्याक्षादिकांच्या तांडवानें दणाणून सोडलेल्या भूमीशींच' करता येईल. सुप्त समाजाला खडबडून जागे करण्यात, त्याला नव्या दिशेने प्रेरित करण्यात आणि त्याला नवे चैतन्य देण्यात जोतिबांनी प्रवर्तित केलेली ही क्रांती त्या तांडवापेक्षा अंशानेही उणी नव्हती.

त्याचप्रमाणे असेही दिसते की, जोतीरावांनी या भाषेचा वापर जाणीवपूर्वकच केला आहे. त्यांना अधिक संस्कृतप्रचुर व उच्चभ्रू लोकांच्या भाषेत लिहिता आलेच नसते असे म्हणवत नाही. कारण काही जागी नकळत त्यांच्या लेखणीने तशी भाषा अगदी लीलया लिहिलेली आढळते. 'या सर्व अगम्य, अतर्क्य आकाशमय विस्तीर्ण पोकळींत नाना प्रकारचे तत्त्वांच्या संयोगवियोगानें अगणित सूर्यमंडळें त्यांच्या त्यांच्या उपग्रहांसह

निर्माण होऊन लयास जात आहेत. त्याचप्रमाणें हरेक उपग्रह आपापल्या प्रमुख सर्याच्या अनुरोधानें भ्रमण करीत असतां एकमेकांच्या सान्निध्य संयोगानुरूप या भूग्रहावरील एकाच मातापितरांपासून एक मुलगा मूर्ख व दुसरा मुलगा शहाणा असे विपरीत जन्मतात...'[३] अशी अनेक वाक्ये या विधानाची साक्ष देतील. तसेच त्यांच्या बहुश्रुतपणाची साक्ष इंग्रजी वाङ्मयातील त्यांनी दिलेली समयोचित अवतरणे, डार्विनच्या उत्क्रांतिवादाची त्यांनी केलेली चर्चा, जीवशास्त्रातून त्यांनी दिलेली उदाहरणे, होमर, कॅ. जेम्स कूक प्रभृतींच्या लिखाणाबरोबरच वेदोपनिषदादी संस्कृत ग्रंथांमधूनही त्यांनी उद्धृत केलेले मौलिक विचार इत्यादींवरून मिळते. यावरून असे म्हणता येईल की, रांगडेपणा हा या रसिक, बहुश्रुत व सुसंस्कृत माणसाच्या भाषेचा स्थायीभाव नसून तिने हेतुतः लेइलेला अकृत्रिम असला तरी अलंकारच आहे.

जोतीरावांनी मुद्दामच लोकभाषेतल्या शब्दकळेला जवळ केले आहे आणि तरीही त्यांच्या लिखाणात कृत्रिमता नाही. त्यातल्या ओबडधोबडपणातही एक नैसर्गिक सौंदर्य आहे. 'कलम–कसाई', 'नारदशाही', 'झोटिंगबादशाई', 'जहामर्दी', 'बुगऱ्या–सागुती', 'स्टांप', 'कवडी–रेवडी', 'स्नानसंध्येशीलपणा', 'पाऊणे आठ'— असे शेकडो पांढरपेशा संस्कृतीला नवखे पण अर्थवाही शब्द जोतिबा सहजपणे वापरतात. 'त्यांच्या (लाचखाऊ अधिकाऱ्यांच्या) डोमल्यावर घालायास काहीतरी बरोबर घ्या, तवा निघा', 'भटमामलेदार अशी झोटिंगबादशाई करून आपल्या जातीच्या कलम कसायाची पोळी पिकवितात', '(त्यांनी) माझा सगळा उन्हाळा केला हो', 'माझ्या सगुणाचा गळा कापून तिच्या नांदण्याचे चांदणे केले', 'तट्टुकू दुमणी और तेजीकु इशारा बस है', — अशी स्वाभाविक वाक्येच जोतीराव आपल्या भोवतालच्या व्यक्तींच्या तोंडी घालतात. तर कधी कधी ते 'विद्येविना मति गेली, मतिविना नीति गेली, नीतिविना गति गेली, गतिविना वित्त गेलें, वित्ता-विना शूद्र खचले — इतके अनर्थ एका अविद्येनें केले'[४] अशी साठा उत्तरातल्या कहाणीतल्याप्रमाणे सुभाषितवजा छोटी छोटी पण बोधाची वाक्ये सहज लिहून जातात. त्यांच्या शैलीची ही सहजता व स्वाभाविकता त्यांचे विचार थेट मनाला नेऊन भिडविते. भाषेच्या शुद्धाशुद्धतेची व वैयाकरणिक अचूकतेची चिकित्सा करण्याची गरज वाचकांस वाटतच नाही. आणि त्यामुळेच 'असल्या महान् वैयाकरणास सत्यशोधकवाल्यांनीं मराठी पहिली इयत्ता शिकण्यास पाठवायचें सोडून उलटा त्यास आपल्या डोक्यावर बसवून ठेवला हें कसें झालें?'[५] असा उपरोधिक प्रश्न त्यांच्या विरोधकांनाच पडू शकतो. त्यांच्या अनुयायांना तो कधीच पडला नाही.

त्यांच्या काही लिखाणात जोतीरावांनी संवादात्मक पद्धतीचा अवलंब केला आहे. तिथे तर त्यांची भाषा आणखीनच अनौपचारिक, दैनंदिन व्यवहारातील व साधी – सोपी होते. प्लेटोने आपल्या 'रिपब्लिक' ग्रंथात सॉक्रेटिस आणि इतर पात्रे

यांच्यातील संवादांच्या माध्यमातून आपले विचार मांडले आहेत, त्यांची आठवण जोतिबांचे हे संवादात्मक विचार वाचताना झाल्यावाचून राहत नाही. याही संवादांमध्ये तेवढाच खुसखुशीतपणा व नाट्य आहे. उदाहरणार्थ, 'गुलामगिरी' या पुस्तकातील धोंडिबा – जोतिबा यांच्यातील नाट्यपूर्ण व ओघवान संवाद दाखविता येतील, किंवा जोतिबांनी काढलेल्या सत्सार या अनियतकालिकातील शूद्रब्राह्मण संवाद, कोंडाजी पाटील व तात्या (म्हणजे जोतीराव) यांच्यातील प्रश्नोत्तरे, यशवंत जोतिबा फुले यांच्या शंका व तात्यांनी केलेले त्यांचे निरसन इत्यादीही घेता येतील. 'सत्य धर्म पुस्तका'तील संवादामध्ये तर अनेक व्यक्ती आपल्याला भेटतात. यशवंतराव, जोतिबा तर आहेतच, शिवाय बळवंत हरी साकवळकर, गुंडीराम धोंडिराम प्रवाशी, गणपतराव दर्याजी थोरात – अशी मंडळीही आहेत. ही पात्रे बहुधा वास्तवातली असावीत, कदाचित जोतीरावांच्या कल्पनेतलीही असावीत. तरी पण जरी समजा ती कल्पित असली तरी ती निर्जीव नाही वाटत. तत्कालीन समाजात मऱ्हाटी खेड्याच्या कोणत्याही गल्लीत ती आपल्याला भेटली असती असेच सारखे वाटत राहते. जगाच्या उत्पत्तीसंबंधी प्रचलित असलेल्या – ब्रह्माच्या मुखातून ब्राह्मण, बाहूतून क्षत्रिय, मांड्यांमधून वैश्य व पायातून शूद्र निर्माण झाल्याच्या, किंवा परमेश्वराच्या निरनिराळ्या अवतारांसंबंधी समाजमानसात पक्क्या चिंबलेल्या भाकड – दिव्यकथा (मिथ्स) खोट्या आहेत हे पटवून सांगताना ज्या असंख्य शंका जोतीरावांनी उभ्या केल्या आहेत त्या याच मंडळींच्या मनामधून त्यांना गोळा कराव्या लागल्या असतील, आणि ऐतिहासिक सत्याभोवती पसरलेली ही दंतकथांची जाळी झाडण्यासाठी या शेकडो शंका जोतिबांनी जागोजाग सढळ हाताने वापरलेल्या दिसून येतात.

जोतिबा देतात ते दृष्टान्त अत्यंत चमखल असतात. परिचित असतात. वेदादी ग्रंथ जर खोटे आहेत, तर त्यांजवर शूद्रादिकांनी विश्वास कसा ठेवला या शंकेचे निरसन करताना ते म्हणतात, 'आजच्या या सुधारलेल्या काळांतसुद्धां ... एखाद्या शहाण्या गृहस्थाकडे कोणी लबाडानें एखाद्या मोठ्या गृहस्थाच्या नावाचें खोटें पत्र जरी आणले तथापि त्यास कांहीं वेळपर्यंत त्यावर भरंवसा ठेवावा लागतो व समयानुसार तोही फसवला जातो.'[६] त्याचप्रमाणे निर्मिकाने पशुपक्ष्यांना स्वाभाविक खोड (इन्स्टिंक्ट) दिली आहे, तर मानवप्राण्यास सारासार विचार करण्याची बुद्धी दिली आहे हे सांगतानाही जोतीरावांनी दिलेला दृष्टान्त मोठा मनोज्ञ आहे. ते म्हणतात : 'हजारों वर्षांपूर्वी पाकोळी नांवाच्या पक्ष्यांनीं बांधलेली कोठी व त्यांनीं हल्ली नवीन बांधलेली कोठी यांमध्ये तिळप्राय सुधारणा झालेली दिसून येत नाहीं ... परंतु हजारों वर्षांपूर्वीं झाडाच्या ढोलींत राहून निर्वाह करणारे व गुडघेभेटी येऊन हात टेकून जनावरासारखे पाणी पिणारे मानवप्राणी (आज) मोठमोठ्या हवेल्यांत वास करून लोडाशी टेकून रुप्याच्या पंचपात्रीने पाणी पिऊन मजा मारीत (आहेत).'[७] बोलक्या दृष्टान्ताची अशी कित्येक उदाहरणे देता येतील. पण तशी गरज नाही.

जोतीरावांच्या शैलीत ओज आहे, प्रत्ययकारित्व आहे. त्यांच्या शैलीचे ते मोठेच सामर्थ्य मानावे लागेल. अनेक रसांचाही उत्तम आविष्कार त्यांच्या लेखनात होताना आढळतो. त्यांनी चितारलेले क्रौर्य काळजाला भिडून अस्वस्थ करते, तर प्रसंगी त्यांच्या शब्दांमधून ओसंडून वाहणारे कारुण्य मनाच्या आरपार शिरुन कासावीस करते. फत्तेगडाहून इंग्लिश स्त्रिया, पुरुष, मुलेबाळे मिळून सुमारे एकशेसव्वीस भांबावलेले प्राणी, आपापले जीव मुठीत धरुन नावेत बसून गंगा मार्गाने पळून जात असता नानासाहेब पेशव्यांनी वचनभंग करून त्यांचा कसकसा अंत केला याचे हृदयद्रावक वर्णन जोतीराव पुढीलप्रमाणे करतात : ' प्रथम नानासाहेब पेशव्यांनी, त्यातून सर्व पुरुषांस निवडून तेथेच एके बाजूला उभे केले आणि त्यांचेसमोर त्यांच्या भांबावलेल्या स्त्रियांनी आपापल्या स्तनाला लावून उराशी गच्च आवळून धरलेल्या तान्ह्या बच्चांस हिसकावून हातात नागव्या तरवारी घेऊन, त्यांच्या भोवताली उड्या मारुन मोठया सफाईने त्यांची शिरे कोवळ्या काकडीसारखी उडविली ... त्यांची आई–बापे एकमेकांकडे दीनवदने करून पाहात आहेत, इतक्यात त्यांचे स्त्रियांची शिरे तरवारीचे झटक्यासरशी खाली पाडविताच बाकी उरलेल्या दुर्दैवी इंग्रजांस नीट ओळीत उभे करून त्या सर्वांचे दोन्ही हात मागे फिरवून, त्यांचे बगलांतून बांबू गोवून पिछाडीस प्रत्येकांचे दोन्ही हात जखडून बांधले ...'[१८] या प्रसंगाची ऐतिहासिकता कदाचित विवाद्य असेल पण एक गोष्ट निर्विवाद आहे की, माणसाने माणसाच्या केलेल्या राक्षसी छळाचे भयाण चित्र एखाद्या छळनाट्यातल्यासारखे मूर्तिमंत साकार करण्याचे अगाध सामर्थ्य जोतीरावांच्या लेखणीत होते. सगळीकडूनच ज्याची कोंडी झाली आहे असा एक कुळवडी 'शेतकऱ्याचा असूड' या जोतिबांच्या ग्रंथात आपली व्यथा अत्यंत कारुण्यपूर्ण शब्दात सांगतो आहे. ' कण्हेरीच्या मुळ्या मी वाटून प्याल्यास कर्तीधर्ती मुले आपली कशीबशी पोटे भरतील. परंतु माझ्या जन्म देणाऱ्या वृद्ध बयेस व बायकोसह माझ्या लहान लहान चिटुकल्या लेकरांस अशा वेळी कोण सांभाळील ? त्यांनी कोणाच्या दारात उभे राहावे ? त्यांनी कोणापाशी आपले तोंड पसरावे ! '[१९] दुसरीकडे असाच एक शेतकरी आपला कटू अनुभव सांगताना जोतीरावांची जी वाक्ये उच्चारतो त्यांच्यामधून त्याची अजीजी, असहायता, त्याच्यावरील अन्याय किती उत्कटपणे मूर्त होतो हे सुद्धा पाहण्यासारखे आहे. तो म्हणतो : ' मी त्या भटमामलेदाराकडे जाऊन त्यास मोठया नम्रतेने जमिनीस हात लावून मुजरा केला व त्याच्याशी एक चकार शब्द न बोलता फक्त त्याच्या हातात माझी अर्जी देऊन मी तसाच चार-पाच पाऊले हटून आपले दोन्ही हात जोडून त्याच्यासमोर दीनवदन करून थरथरा कापत उभा राहिलो. इतक्यात त्या यमाने माझ्याकडे खालवर पाहून लागलीच ती अर्जी माझ्या अंगावर फेकून देऊन मी कोडताची बेअदबी केली अशा कारणांवरून उलटा त्याने मलाच दंड केला. तो दंड मला देण्याची ऐपत नसल्यामुळे मला काही दिवस कैदेत राहावे लागले '[२०] किती कमी शब्दांत या प्रसंगातील करुण-नाट्य जोतीरावांनी आपल्यासमोर उभे केले आहे !

एखाद्या गोष्टीचे महत्त्व पटवून देताना त्यांची भाषा विलक्षण आग्रही होते. सरकारने प्राथमिक शिक्षण सक्तीचे करावे हे लोकांना पटवून सांगताना, न शिकण्याचे किती भयावह व दूरगामी परिणाम संभवतात याचे विलक्षण पटणारे चित्र त्यांनी उभे केले आहे. त्यांच्या म्हणण्याचा थोडक्यात आशय असा आहे की, तुमची मुले शिकली नाहीत म्हणजे ती उनाड, चोर, खुनी, समाजकंटक होणार. ती समाजाचे स्वास्थ्य व सौख्य हिरावून व्यापारधंद्याचीही अनवस्था करून तर टाकतीलच पण त्याचबरोबर त्यांच्यावर नियंत्रण करण्यासाठी, त्यांना शिक्षा करण्यासाठी अधिक न्यायालये उभारण्यात सरकारला जो जास्तीचा खर्च करावा लागेल त्याचाही भार तुमच्याच बोडक्यावर पडणार; याखेरीज ही पोरं वयात आली तरी विवेकशून्यच राहतील, व्यभिचार करतील, खोट्या साक्षी देऊन निरागस व्यक्तीस शिक्षापात्र ठरविण्यास हातभार लावतील; त्यांची बेड्या घालून धिंड निघालेली पाहताना तुम्हास दुःख होईल......वगैरे लोकांना कोणतीही गोष्ट पटवून सांगण्याची जोतीरावांच्या भाषेची ताकद विलक्षण आहे.

विवेचन कंटाळवाणे होऊ नये म्हणून अधूनमधून मिष्किल पण उपरोधपरिपूर्ण अशा विनोदाचीही पेरणी ते करतात. उदाहरणार्थ, इंग्रज अधिकारी 'लंगोट्या' शेतकऱ्यांचे म्हणणे नीट ऐकून न घेता त्याला हाकलून देतात हे सांगताना जोतीराव प्रश्न विचारतात, 'त्याच्या हातात नारळाची आई देऊन त्यास शिमगा करण्याकरिता त्याचे घरी (ते) पाठवीत नसतील काय?'[११] किंवा दुसऱ्या एका जागी पंडिता रमाबाईंनी ख्रिस्ती धर्माचा स्वीकार केल्याबद्दल अकांडतांडव करणाऱ्या – पण त्याच वेळी स्वतः मात्र वाटेल त्या घाणीची दारू ढोसण्यात अब्राह्मण्य न मानणाऱ्या ब्राह्मणांबद्दल जोतीराव मिष्किलपणे उद्गारतात, 'अहो, कित्येक भट-ब्राह्मण बाटलीतील ऐन माल गट्ट करून शेवटी इंग्लंडाकडे दीन वदने करून 'रमाबाई बाटली', 'रमाबाई बाटली' म्हणून रात्रंदिवस बाटल्यांस निजध्यास करतात.'[१२]

व्यक्तीचे वा प्रसंगाचे संपूर्ण चित्र वाचकांच्या डोळ्यांसमोर उभे करण्याचे कसब जोतीरावांच्या लेखणीला पुरेपूर साधले आहे. एके जागी एका कुळवाड्याचे असेच एक बोलके शब्दचित्र त्यांनी रेखाटले आहे : 'एक कुळवडी एके दिवशी नदीच्या किनाऱ्याजवळच्या हवाशीर दाट आंब्राईतील कलेक्टरसाहेबांच्या कचेरीच्या तंबूकडून, मोठ्या रागाच्या त्वेषात हातपाय आपटून दातओठ खात आपल्या गावाकडे चालला आहे. त्याचे वय सुमारे चाळीशीच्या भरावर असून हिम्मतीत (तो) थोडासा खचल्यासारखा दिसत होता. डोईवर पीळदार पेचाचे पांढरे पागोटे असून त्यावर फाटक्या पंचाने टापशी बांधलेली होती. अंगात खादीची दुहेरी बंडी व गुढघे–चोळणा असून पायात सातारी नकटा जुना जोडा होता. खांद्यावर जोट, त्यावर खारवी बटवा टाकला असून, एकंदर सर्व कपड्यांवर शिमग्यातील रंगांचे पिवळे तांबूस शिंतोडे पडलेले होते. पायांच्या टाचा जाड व मजबूत होत्या खऱ्या, परंतु काही काही ठिकाणी उकलून भेगा

अनुक्रमणिका

पडल्यामुळे (तो) थोडासा कुल्पत चालला होता ......(त्याच्या) हाताच्या कांबी रुंद असून छाता पसरट होता ......'[१३] वगैरे बराच सूक्ष्म तपशील जोतीरावांनी यात नोंदविला आहे. पुढे एके ठिकाणी, येथील एक आठबैली कुणबावा ओढणाऱ्या शेतकऱ्याच्या स्थितीचे येथील एका युरोपियन पलटणीतल्या साधारण गोऱ्या सोजिराच्या स्थितीशी तुलना केल्यास त्यांच्यामधील अंतर कसे, 'काशी – रामेश्वरापेक्षाही जास्ती' आहे हे सांगताना जोतिबांनी त्या दोहोंचा वेष, राहणी, आहार, घरे-दारे, सवलती— इत्यादी कित्येक बाबतीत इतका सूक्ष्म तपशील टिपला आहे की मी म्हणेन वाचकांनी तो भाग मुळातूनच वाचायला हवा.

एका कुळवाड्याच्या अंगणातून पाहिलेले दृश्यही जोतीरावांनी असेच अत्यंत रेखीवपणे रेखाटले आहे. 'त्याचे घर एक मजला कौलारू आहे. घराचे पुढचे बाजूस घरालगत आढेमेढी टाकून बैल बांधण्याकरिता छपराचा गोठा केला आहे. त्यात दोन-तीन उतवणीस आलेले बैल रवंथ करीत बसले आहेत व एका बाजूला खंडी, सव्वा खंडीच्या दोन-तीन रिकाम्या कणगी कोपऱ्यात पडल्या आहेत...' पुढे असाच अगदी बारीक-सारीक तपशील टिपीत जोतिबा निवेदन करीत आहेत...चित्र अंतश्चक्षूंसमोर उभे राहात आहे...उजवीकडे एक आटबैली जुना गाडा, डावीकडे तुळशीवृंदावन, त्यालगत खापरी रांजणाच्या पाणईचा ओटा, त्यावर भरलेल्या मातीच्या घागरी, छाट दिवालींच्या आत ओबडधोबड फरशांची न्हाणी–तिच्याबाहेर डबके ... डबक्यात बुचबुचणारे किडे, पलीकडे एक पांढऱ्या चाफ्याचे झाड, त्या झाडाखाली 'हायदोस' करणारी उघडी-नागडी, खरुजलेली, खवडे झालेली, शेंबडी, घामट अशी मुले – त्यांचे विविध खेळ, पिछाडीला सकाळीच व्यायलेली म्हैस, दोन-तीन वासरे, एक घोडी, भिंतींना चिकटलेली गोवरिडे, वेणीफणीनंतर छपराच्या कळचणीला कोंबलेले केसांचे बुचके, जवळच कोंबड्यांचे खुराडे, पलीकडे शेणखई, तिच्यात पोरासोरांनी केलेल्या विष्टेवर घोंघावणाऱ्या हिरव्या माश्या, गोवऱ्यांचा कळकड, मोडक्या औतांचा ढीग – याबरोबरच तिथल्या व्यक्ती, त्यांचे वागणे, त्यांचे खाणेपिणे, त्यांच्या वापरातील वस्तू, अंथरुणे-पांघरुणे इत्यादींबद्दल इतके असंख्य बारकावे जोतीरावांनी टिपले आहेत की ते वाचताना वाचकाने नुसते स्तिमितच होऊन जावे.[१४]

सरकारदरबारी दाद लागत नाही हे अनुभवल्यावर हताश, असहाय झालेल्यांची अवस्था वर्णिताना जोतीराव लिहितात : 'या भटकामगारांच्या कसबामुळे कित्येक लंगोट्यांनी...आपले प्राणघात करून घेतले नसतील काय ? कित्येकांनी दरवडेखोरांचे धंदे करून (ते) आपल्या जीवास मुकले नसतील काय ? कित्येकांनी आपल्या मनात अतिशय संताप करून घेतल्यामुळे (ते) वेडे झाले नसतील काय ? आणि कित्येकांनी आपल्या दाढ्या वाढवून अर्धवेड्यासारखे होऊन रस्त्यात जो भेटेल त्यास (ते) आपली गाऱ्हाणी सांगत फिरत नसतील काय ?'[१५] असे एकापाठोपाठ एक प्रश्न उभे

करून आपले विवेचन अधिक प्रभावी करताना जोतीराव दिसतात. सुया-दाभणापासून सगळ्या वस्तू इंग्लंडातून आणून इथे स्वस्तात विकल्यामुळे पोटासाठी लागलेल्या बुभुक्षित कसबी लोकांचे वर्णन करताना ते लिहितात : ' येथील कोष्टी, साळी, जुलई, मोमीन इतके कंगाल झाले आहेत की, त्यांपैकी कित्येक विणकर लोक अतिशय मंदीचे दिवसांत उपाशी मरू लागल्यामुळे अन्नस्तव कधी कधी चोरून छपून आपला निर्वाह डाळीच्या चुणीवर, कित्येकदा तांदळाच्या व गव्हाच्या कोंड्यावर व आंब्याच्या कोयांवर करितात. कित्येक पद्मसाळी, घरातील दाताशी दात लावून बसलेल्या बायकापोरांची स्थिती पाहावेनाशी झाली म्हणजे, संध्याकाळी निःसंग होऊन दोन-चार पैशांची उधार शिंदी पिऊन बेशुद्ध झाल्याबरोबर, घरात जाऊन मुडद्यासारखे पडतात, '[१६] तर कधी कुणाला फसवून फरार होतात.

अमेरिकेतील निग्रोंच्या गुलामगिरीचेही त्यांनी केलेले वर्णन चटका लावणारे आहे. त्यांच्यावर होणाऱ्या जाचांचे नुसते वर्णन ऐकूनही पाषाणहृदयी माणसाचाही कंठ दाटून येऊन त्यास रडे फुटेल अशी जोतीरावांची खात्री आहे. तिथे गुलामांना कशी पशुवत वर्तणूक देत, त्यांच्याकरवी जमिनी नांगरून घेऊन त्यांनी काही कमजास्त केल्यास कसे अंगावर कोरड्याचे वळ उठवले जात, छाटी फुटून रक्त ओकेपर्यंत कष्ट केल्यावर निजायला कुठे ? तर गुरांच्या गोठ्यात कसे सोडीत, दुसरे कळवळणारे अंग, धन्याची मनात सदैव धास्ती, पोटाची खळगी रिकामी पडल्याने जीव हलक होऊन घडणारे परमक्लेश इत्यादींमुळे त्यांना झोप कशी अशक्य होई, आणि रात्रभर दुःखा-वेगाने आसवे गाळीत ते कसे कुशी बदलत परमेश्वराची करुणा भाकीत – या सगळ्या गोष्टींना व प्रसंगांना जोतीरावांच्या लेखणीने सजीव केले आहे.

जोतीरावांचा पिंडच मुळी संवेदनशील कवीचा आहे हे त्यांनी लिहिलेल्या पद्य-लेखनातून तर जाणवतेच पण त्यांच्या गद्यलेखनातूनही असे कित्येक उतारे काढून दाखवता येतील की, जी नितांत रमणीय काव्येच आहेत. मानवाचे प्रथम युगुल भूतलावर आले तेव्हाच्या सृष्टीचे वर्णन करताना जोतीरावांच्या प्रतिभेने अशी सुरेख भरारी मारली आहे की, ते जातिवंत कवी होते हे त्यांच्या एवढ्या एकाही कल्पना-विलासाने स्पष्ट व्हावे. ते लिहितात : ' ते जेव्हा ऐन दुपारी भलत्या एखाद्या झाडाच्या छायेखाली प्रखरतर सूर्याच्या किरणांपासून निवारण होण्याकरिता क्षणभर विश्रांती घेत असतील, तेव्हा जिकडे तिकडे उंच उंच कडे तुटलेल्या पर्वत व डोंगराच्या विस्तीर्ण रांगा, गगनात जणू काय, शुभ्र पांढऱ्या धुक्याच्या टोप्याच घालून उभ्या राहिलेल्या त्यांच्या दृष्टीस पडत असतील, तसेच खालच्या बाजूंनी लहानमोठ्या दऱ्याखोऱ्यांच्या आसपास अफाट मैदानात जुनाट मोठमोठाले विशाल वड, पिंपळ व फळभाराने नम्र झालेले फणस, आंबे...वगैरे फळझाडांची गर्दी होऊन त्यावर नाना तऱ्हेच्या द्राक्षादी वेलींच्या कमानीवजा जाळी बनून जागोजाग पिकलेल्या

केळीच्या घडांसहित कमळे इत्यादी नाना तऱ्हेची रंगीबेरंगी फुले लोंबत आहेत, त्यांच्या आसमंतात जमिनीवर नाना प्रकारच्या पानाफुलांचा खच पडून त्या सर्वांचा भला मोठा चित्रविचित्र केवळ एक गालिचाच'[१५] तयार झालेला त्यांना दिसला असेल. विराट विश्वाच्या या हृदयंगम चित्रात पुढे खळखळणाऱ्या निर्मळ जलप्रवाहांचे, सरोवरातील कमळांभोवती रुंजी घालणाऱ्या भ्रमरांचे, वनचरांचे, सुस्वर गाणाऱ्या पक्ष्यांचे, नाना प्रकारच्या फुलपुष्पांच्या सुवासाची पखरण चहूकडे करणाऱ्या मंद शीतल वायुलहरींचे अतिशय मनोहारी वर्णन जोतीरावांनी केले आहे. विस्तारभयास्तव ते येथे देण्याचा मोह मी आवरतो.

कविमनाच्या या माणसाने लिहिलेली अखंडादी काव्यरचना साहजिकच अत्यंत लालित्यपूर्ण, लयबद्ध, गेय व गोड आहे. 'जोतीरावांची एक मजेदार सवय होती. एखादी चटकदार कल्पना, मार्मिक विचार किंवा प्रखर भावना डोक्यात भुणभुणू लागली की, जोतीराव कविता करायचे. जोतीरावांनी असाच भावनेचा उद्रेक झाल्यावर शिवाजी-महाराजांवर पंचेचाळीस पानांचा पोवाडा लिहिला. जोतीराव आधुनिक युगातले शिव-प्रभूंचे पहिले शाहीर!'[१८], शिवाजीच्या पवाड्याखेरीज ब्राह्मणांचे कसब, सत्यशोधक समाजाची मंगळाष्टके आणि अधूनमधून पेरलेली स्फुट काव्ये इत्यादी पद्यरचनांमध्ये लोकगीतांशी जवळचे नाते सांगणारे अनेक काव्यप्रकार जोतीरावांनी सफाईने हाताळले आहेत. परंतु त्यांच्या पद्यरचनांबद्दल इथे जाताजाता त्रोटकपणे लिहिण्याऐवजी त्यांचा स्वतंत्रपणे विचार केला जाणे उचित ठरेल. तेवढे महत्त्वाचे स्थान त्या रचनांना निश्चितच आहे. कारण श्री. वि. द. घाटे म्हणतात त्याप्रमाणे, 'तत्कालीन समाजाचे दर्शन जोतीरावांनी आपल्या प्रभावी वाणीने आपल्या काव्यात वर्णिले आहे. जोतीरावांचे गद्य खडबडीत, ओबडधोबड आणि काहीसे रुक्ष असे. परंतु त्यांच्या काव्यात शब्द वेचक, कल्पना मार्मिक आणि विचार तल्लख असत.'[१९]

## संदर्भ सूची

१. चिपळूणकर, विष्णुशास्त्री : निबंधमाला : १९१७, पृ. ४५८.
२. कित्ता, पृ. ४६०–६१.
३. फुले, जोतीराव गोविंदराव : शेतकऱ्याचा असूड : महात्मा फुले समग्र वाङ्मय (संपा. कीर / मालशे), १९६९, पृ. २१४–२१५.
४. कित्ता, पृ. १८९.
५. चिपळूणकर : उपरोक्त : पृ. ४६२.
६. फुले, जो. गो. : गुलामगिरी : म. फु. स. वा. : पृ. ८४.
७. फुले, जो. गो. : सार्वजनिक सत्यधर्म पुस्तक : मफुसवा : पृ. ३७१.
८. फुले, जो. गो. : सत्सार – २ : मफुसवा : पृ. ३०३–३०४.

९. फुले, जो. गो. : शेतकऱ्यांचा असूड : मफुसवा : पृ. २१५–२१६.
१०. फुले, जो. गो. : गुलामगिरी : मफुसवा : पृ. १३१.
११. कित्ता पृ. १३०.
१२. फुले, जो. गो. : सत्सार – १ : मफुसवा : पृ. २८६.
१३. फुले, जो. गो. : शेतकऱ्यांचा आसूड : मफुसवा : पृ. २१४–२१५.
१४. कित्ता : पृ. २३६ ते २४०.
१५. फुले, जो. गो. : गुलामगिरी : मफुसवा : पृ. १३०.
१६. फुले, जो. गो. : शेतकऱ्यांचा आसूड : मफुसवा पृ. २०४–२०५.
१७. कित्ता : पृ. २१५–२१६.
१८. घाटे, वि. द., विचार विलसिते, ( १९७३ ) पृ. ३८.
१९. कित्ता – ३७.

## साभार स्वीकार

खाडिलकरांची तीन नाटके ( समीक्षा ) : गंगाधर गाडगीळ, सुविचार प्रकाशन मंडळ; पुणे; किंमत १२ रुपये.

मुखवटे ( कथासंग्रह ) : आनंद जातेगावकर; मौज प्रकाशन, मुंबई किंमत रु. १७·५०

जोडयात्रा ( प्रवास-लेखन ) श्री. ना. बनहट्टी, सुविचार प्रकाशन मंडळ, पुणे, किंमत १५ रुपये

मिकी आणि मेमसाहेब; सतीश आळेकर; नीलकंठ प्रकाशन, पुणे, किंमत ४ रुपये

# लोकहितवादींची शैली : काही वैशिष्ट्ये



डॉ. सुधाकर के. भोसले

**प्रास्ताविक :**

इ. स. १८१८ साली पेशवाई संपुष्टात आली. मराठ्यांचे राज्य नष्ट झाले. इंग्रजी राज्याची अमदानी सुरू झाली. यापूर्वी या देशावर मुसलमान, डच, फ्रेंच, पोर्तुगीज यांची आक्रमणे झाली होती.

आक्रमक मुसलमानांची संस्कृती ही आम्हाला प्रभावी वाटली नाही. त्या संस्कृतीत दिपून जाण्याजोगे काही नव्हते. विचारचक्राला गती मिळावी, अंतर्मुख होऊन त्यांच्यातील काही तत्त्वांचे अनुकरण करावे असे काही वाटण्यासारखे तीत नव्हते. तसे इंग्रजांच्या बाबतीत घडले नाही. इंग्रजांचे राज्य येथे स्थिरावल्यानंतर येथे पाश्चात्त्य विद्या प्रसृत होऊ लागली. त्या भाषेतील विचारवैभवांनी, तत्त्वज्ञानांनी सुशिक्षित पदवीधरांची पहिली पिढी दिपून गेली,

इंग्रजांच्या अमदानीत शिकून बाहेर पडलेल्या सुशिक्षितांना स्वतंत्रपणे विचार करण्याची एक दृष्टी लाभली. स्वतंत्रपणे विचार करावा, उलटसुलट विचार पडताळून पाहावेत, विचार शब्दबद्ध करावेत, विचार फुलवावा, सुसूत्रपणे, तर्कशुद्ध अशी विचारांची मांडणी करावी असे सुशिक्षितांना वाटू लागले. यातूनच मराठी निबंधाची जडणघडण होऊ लागली.

## आधुनिक मराठी वाङ्मयातील पहिले शैलीकार

अशा प्रकारचे लेखन करणाऱ्या पहिल्या काळात दादोबा पांडुरंग, हरी केशवजी व बाबा पदमनजी होते. त्यांच्या लेखनात निबंधरचनेचे काही गुण आढळतात. मात्र आद्य निबंधकार आणि मराठी गद्यशैलीचे आद्य प्रवर्तक म्हणून लोकहितवादी यांचा उल्लेख करणे रास्त ठरेल. कारण त्यांच्या निबंधलेखनातून मांडणीचा घाट, विचाराचे सामर्थ्य आणि शैलीचे सौंदर्य ही वैशिष्ट्ये स्पष्ट झाली. त्यांच्या व्यक्तित्वाचे विशेष घेऊन त्यांचा निबंध सजला.

लोकहितवादी व्यासंगी होते. इंग्रजी भाषेचा, जागतिक घडामोडी, इतिहास, राज्यशास्त्र, अर्थशास्त्र, संस्कृत विद्या इ. विषयांचा त्यांचा अभ्यास सखोल होता. जुन्य

अनुक्रमणिका

विषयांचे ज्ञान आणि नवीन विषयांचे स्वरूप आणि सामर्थ्य जाणून घेण्याची आकलन-क्षमता त्यांच्याजवळ होती. त्यांच्याजवळ विचारांची तर्कशुद्ध मांडणी करण्याची हातोटी होती. आपला विचार ते साधार मांडीत. स्वभूमिकेबद्दल कणखर आत्मविश्वास, अंतःकरणात तीव्र तळमळ आणि निर्भय वृत्ती होती. त्यामुळे त्यांचे शतपत्रातील लेखन प्रभावी झाले. शैलीदार लेखनामुळे ते आकर्षक झाले. म्हणून आधुनिक मराठी वाङ्मयातील पहिला शैलीकार म्हणून त्यांना पदवी देणे उचित ठरेल.

## विचारसामर्थ्य

अव्वल इंग्रजी काळात लोकहितवादींच्या पूर्वी गद्यलेखनाचे स्वरूप हे बाळबोध होते. विवेचनात भारदस्तपणा, शिस्त आणि तर्कशुद्धता नव्हती. भाषा प्रवाही, प्रौढ, पल्लेदार नव्हती. मराठी गद्याची ती बाल्यावस्था होती.

लोकहितवादींची शतपत्रांच्या लेखनामागची भूमिका लोकजागृतीची, लोकशिक्षणाची होती. 'प्रभाकर' या साप्ताहिकातून १८४८ ते १८५० या काळात त्यांनी ही पत्रे प्रसिद्ध केली. सतत दोन वर्षे एकाच विशिष्ट दृष्टिकोणाने त्यांनी हे लेखन केले.

शरीरात रक्त तसे निबंधात विचार आवश्यक असतात. विचार जेव्हा अर्थपूर्ण, चिंतननिर्मित, सत्यवादी, मार्मिक, निर्भय आणि प्रामाणिक असतो तेव्हा तो तेजस्वी असतो. लोकहितवादींचे स्वतंत्रपणे विचार करण्याचे सामर्थ्य अपूर्व होते. श्रुती, स्मृती, वेदान्त, पुराणे यांनी निर्माण केलेल्या भ्रांत, असत्य जगात लोक शतकानुशतके वावरत होते. देश दरिद्री का झाला, धर्माला ग्लानी का आली या सार्‍यांचा अन्वयार्थ ईश्वरी क्षोभ, नशीब, सद्दी यांच्या साहाय्याने लावला जात होता. लोकहितवादींनी इंग्रजी विद्या अभ्यासिली. प्रत्येक गोष्टीकडे ते डोळसपणे, पूर्वग्रहरहित दृष्टीने पाहू लागले. जबाबदारी झटकण्यासाठी सोयीस्कर निष्कर्ष काढावेत, मनःपूत अनुमाने करावीत हे मोह त्यांनी टाळले. निर्भयपणे, टामपणे त्यांनी आपल्यामधील दोषांचे, वैगुण्यांचे, उणिवांचे, मर्यादांचे निरीक्षण केले. जे आहे ते पत्करले, स्वीकारले. ते नाकारले नाही. दोषांचा कबुलीजबाब देताना ते ओशाळले नाहीत.

हे दोष दूर करण्यासाठी समाजात माजलेली तकलादू, हिणकस, भ्रष्ट, तर्कदुष्ट, अर्थशून्य विचारांची बंडाळी मोडली पाहिजे हे त्यांच्या मनाने घेतले. हे करताना तथाकथित विद्वानांत हाहाकार उडेल, त्यांच्या अस्तित्वालाच हादरा बसेल म्हणून ते चवताळतील, चिडून उठतील, तेव्हा जे विचार आपल्याला मांडावे लागतील त्यामध्ये एवढीशीही कोठे कमकुवत बाजू ठेवून चालणार नाही की जेथे ते आपल्याला आव्हान देऊ शकतील, किंवा आपल्यावर हल्ला करून ते पराभूत करू शकतील, हे पक्केपणे जाणून घेऊन त्यांनी जे लिहिले ते तर्कशुद्ध, मुद्देसूद, साधार आणि धारदार! लेखनातून उगीच एखाद्याला डिवचावे, चिडवावे, चिमटे घ्यावे, अनुदार उद्‌गार काढून खिजवावे

असे त्यांनी कोठे केले नाही. म्हणून अतिशय प्रखर लिहूनही त्यांची टीका कोठे वाहवत गेली नाही. तिच्यातील समतोल कोठे ढळला नाही. या धोरणामुळे विवेचन कोठेही उथळ, सवंग न होता सुटसुटीत असूनही ते वजनदार झाले.

भेदक सत्य सांगून त्यांनी लोकांना अंतर्मुख केले. खोटया गोष्टीतील मोठेपणाचे पितळ उघडे केले. आपल्या लोकांत ' बळ, शूरत्व किंवा शक्ती कमी आहे असे नाही; पहिल्याने याणी सर्व हिंदुस्थान जिंकले होते; परंतु यांस राखावयाचे शहाणपण नाही; याजमुळे हे गमावून बसले. ' ( १९,१७. ) या शब्दात त्यांनी आपल्या पराभवाचे निदान केले. सोळा कोटींची प्रचंड रक्कम अहिल्याबाईने धर्मादाय केली यामधील विवेकशून्यता स्पष्ट करण्यात ते कचरले नाहीत. ( ७७, ४५ ) वृद्ध लोक हे नवीन काही समजून घेण्याच्या बाबतीत उत्सुक नाहीत. नवीन चांगले विचार स्वीकारण्याच्या बाबतीत ते उदार नाहीत. ते हट्टी, दुराग्रही आहेत, त्यांच्याकडून मतपरिवर्तनाची अपेक्षाच करता येणार नाही. ते मूर्ख असून ते मेल्याशिवाय त्यांची हरकत दूर व्हावयाची नाही हे लिहिताना त्यांचा हात अवघडला नाही ! ( ३०–२२१, ७०–२२४, ८०–४६ ) अनेक शतकापासून आपल्याकडे नवीन विचार करण्याचे, शोध लावायचे, नवनवीन युक्त्या-प्रयुक्त्या काढावयाच्या, कल्पनाशक्ती लढवावयाची या गोष्टी झाल्याच नाहीत. अर्थशून्य पाठांतर म्हणजे विद्या; रीती, पद्धती, चाल, परंपरा, रूढिपालन म्हणजेच नीतिधर्माचरण अशा वेडगळ कल्पना मनाशी बाळगून आम्ही आळशी आणि मागासलेले राहिलो. त्यामुळे समाजात विषमता निर्माण झाली. ते लिहितात–जसा तांब्या पूर्वी करीत होते, तसाच आता करितात. पोथी जशी पूर्वी लिहीत होते, तसीच आता लिहितात. नवीन युक्ती वगैरे काही नाही. ( ८२–५२ ) पाणी वाहण्याचे थांबले की पाण्यात शेवाळ माजते. पाण्याला दुर्गंधी येते. ते पाणी दूषित होते. विचार करण्याचे सोडून दिल्यामुळे हिंदूंची तशीच विपरीत अवस्था झाली. नागवे उघडे फिरत नाही, एवढेच कमी आहे. अशा ह्या अर्धरानटी ( ४२–११२ ) निर्लज्ज लोकांची ( ४८–१७४ ) स्थिती वर्णिताना ते म्हणतात–' जसे एखादे जनावराचे प्रेत पडते आणि ते कुजले म्हणजे, त्याचा एक एक केस वेगळा होतो; तद्वत हिंदू लोक मूर्ख होऊन कुजून गेले आहेत. याजमुळे त्यांची प्रत्येकांची चित्ते पृथक आहेत...हे विद्येचे व ज्ञानाचे वैरी लोक आहेत, म्हणून यांची अशी दशा आहे. ( ५२–३२६ ) अशी किती उदाहरणे द्यावीत ? अशा रीतीने ते ठामपणे विधान करीत. या विचारांतील अर्थपूर्णता आणि आवेश लक्षणीय आहे. डॉ. फडकुले म्हणतात त्याप्रमाणे ते ' भिंतीत एखादा खिळा ठोकून बसवावा त्याप्रमाणे आपल्या घणाघाती शब्दांनी एखादा विचार ठसवतात ! ' ●

● लोकहितवादी : काल आणि कर्तृत्व, पृ. २६५.

## जसे व्यक्तिमत्त्व तशी भाषा

त्या काळात समाजस्थिती दारुण होती. अधःपतित समाजाला आपले अधःपतन आपल्यामधील दुर्गुणांमुळे, दोषांमुळे झाले आहे, हे ध्यानात येत नव्हते. अज्ञान, दारिद्र्य, गतार्थ रूढी, अनिष्ट परंपरा, धर्मविषयक भ्रष्ट कल्पना, कर्मकांड, आळशीपणा, जातिभेद, स्त्रीविषयक अनुदार भूमिका, मूर्ख नेतृत्व इ. रोगांनी देशदेह पोखरलेला होता. या देहात काही चैतन्य निर्माण करावयाचे असल्यास त्वरित, विनाविलंब शस्त्रक्रिया करण्याची आवश्यकता आहे हे लोकहितवादींनी जाणले, आणि त्याप्रमाणे ते कार्यसिद्धीस उद्युक्त झाले. शतकानुशतके एका ठराविक विचारसरणीच्या कोषात रमलेल्या पण वास्तवात अडकून पडलेल्या या समाजाला, नसलेल्या ज्ञानाच्या घमेंडीत राहून उद्दामपणे निर्लज्जपणे सारे शहाणपण आपल्याजवळच आहे असे भासवणाऱ्या स्वार्थी, संकुचित वृत्तीच्या ब्राह्मणांना, कधीकाळी पूर्वजांनी केलेल्या पराक्रमाच्या कथा सांगून स्वतःच्या तेजस्वी कुळाची व्यर्थ मिरास मिरवणाऱ्या नेभळट क्षत्रियांना साध्या, सरळ भाषेत चार समजुतीच्या गोष्टी सांगून मतपरिवर्तन होणार नाही हे ते ओळखून होते. आडमुठे अंतःकरण, हट्टी स्वभाव, दुराग्रही वृत्ती, संकुचित मन, अनुदार दृष्टी, अज्ञान, खोट्या प्रतिष्ठेच्या कल्पना यामुळे हे लोक निगरगट्ट झाले आहेत. आवेशयुक्त भाषेत, तीव्र शब्दांत त्यांची कानउघाडणी केली नाही तर काहीच उपयोग होणार नव्हता हे स्पष्ट होते. डोळ्यावरती कातडे ओढून झोपलेल्या या समाजाला भूपाळी म्हणून जाग आणता आली नसती. म्हणून त्यांनी प्रसंगी प्रखर, कडवट भाषा वापरली. अनावर झाले तेव्हा लाखोल्या वाहिल्या. शिव्याही दिल्या. ब्राह्मणांना उद्देशून उनाड (३६–१०७), जनावरे (३३–२६), निर्दय व शैत्यान्तःकरणी (४७–११७), लब्बाड, लुच्चे (२०–१६९), मूर्ख (७७–४३), महामूर्ख (८६–६२), भडवे (३१–२४, ४–८०, ४२–११२, २०–१६९) याशिवाय टोणपे, गर्विष्ठ, सोंगाडी, पोटभरू असे वेळोवेळी शब्द वापरले आहेत. असे शब्द योजिल्यामुळे त्यांच्या लेखनाची पातळी खालावली आहे काय ? मला वाटते तसे झाले नाही. त्यांनी ज्या पोटतिडिकेने, प्रामाणिकपणे, तळमळीने आणि आवेशाने लिहिले त्या विवेचनाच्या गतिमान ओघात एरवी आक्षेपार्ह वाटणारे शब्द तेथे अन्वर्थक वाटतात. दुसरी गोष्ट डॉ. फडकुले म्हणतात त्याप्रमाणे, 'लोकहितवादींना आपले लेखन सुंदर व्हावे असे वाटण्यापेक्षा ते प्रत्ययकारी व्हावे, प्रभावी व्हावे, विशिष्ट विचार आणि संस्कार देण्याचे कार्य त्याने समर्थपणे करावे हाच त्यांचा हेतू होता.*

सोस म्हणून त्यांनी शिव्या दिल्या नाहीत. एरवी शतपत्रांखेरीज इतरही लेखनात तशी वृत्ती प्रकट झालीच असती. भाषेतील ग्राम्य शब्द, प्रखर आवेश पाहिल्यानंतर

---

* लोकहितवादी : काल आणि कर्तृत्व, पृ. २६३.

त्यांच्या शैलीविषयी काही विचार येण्याआधी ज्या समाजाला उद्देशून त्यांनी लिहिले तो समाज किती मूर्ख, निगरगट्ट, निर्लज्ज, कोडगा आणि बधीर होता हे सारखे जाणवत राहते. मला वाटते, असे वाटण्यातच या शब्दांची आणि अशा भाषेची अपरिहार्यता सिद्ध होते.

## समतोल विवेचन

वर सांगितल्याप्रमाणे स्वकीयांवर टीका करावयाची म्हणून त्यांनी टीका केली नाही. समाजाच्या उद्धाराची त्यांना कळकळ होती म्हणूनच त्यांनी कठोरपणे समाजाचे दोष दिग्दर्शित केले. प्रसंगी त्यांनी स्वकीयांचे गुणगानही केले आहे. शिवाजीमहाराज हे थोर राजे होते ( १४·२९२ ), नाना फडणीस ( ७६·१३८ ) हे ' मेहनती ' होते या शब्दात त्यांचा गौरव केला आहे. ब्राह्मण म्हणजे एकजात वाईट नव्हेत, ( १·२८३,२८५ ) असे त्यांनी म्हटले आहे.

स्वकीयांचे दोषदिग्दर्शन त्याचबरोबर इंग्रजी राज्याचे मतलबी, स्वार्थी स्वरूप त्यांनी काही ठिकाणी प्रकट केले आहे. इंग्रजी राज्य म्हणजे वरदान आहे असे त्यांनी उद्‌गार काढले एवढ्यावरून ते इंग्रजधार्जिणे होते असे निष्कर्ष काढणे चुकीचे होईल. देशातील व्यापारवृद्धीसाठी, आर्थिक विकासासाठी इंग्रजांचा माल खरेदी करू नका ( ६०·३३१, ८५·६१, ५७·२७२ ) असे त्यांनी म्हटले. उत्पन्नाच्या लोभापायी मद्यपानास उत्तेजन देते त्याबद्दल सरकारास त्यांनी दोष दिला ( ७६·१३७ ). हिंदूंच्या मानाने इंग्रज हे बुद्धीने डावे आहेत ( ७६·१३८ ), इंग्रजांनी येथे लोकशाही पद्धतीची राज्यव्यवस्था सुरू करावी ( २५·६९६, ६०·३३१ ) इ. उल्लेखावरून त्यांची लेखणी इंग्रजांची भाटगिरी करणारी नव्हती हे दिसून येईल.

जेव्हा लोक विद्वान होतील 'त्या दिवसापासून पंचवीस वर्षांत हिंदुस्थानाचा रंग फिरेल...परंतु होईल यात संशय नाही.' (५६·३६) 'आता सुधारलेले लोक व सुशिक्षित सरसावत चालले आहेत. ते इंग्रजांची बरोबरी करतील, यात संशय नाही.' (३२·३०१) अशा या विधानांतून देशाच्या प्रगतीसाठी त्यांचे उत्कंठित झालेले मन आणि आशावाद पाहून त्यांनी स्वकीयांवरती केलेली कठोर टीका ही सद्‌हेतूनेच केली आहे याबद्दल कोणाच्याही मनात शंका राहणार नाही.

त्यांची मनोवृत्ती इंग्रजधार्जिणी असती तर त्यांच्या लेखणीला फितुरीचा कलंक लागला असता. त्यांच्या लेखणीला लुच्चेपणाचा किळसवाणा डाग लागला असता. स्वकीयासंबंधी प्रेमाची भावना नसताना त्यांनी स्वकीयांवर दोष दिला असता तर त्यांचे लेखन कुत्सित, चिडखोरीचे वाटले असते. म्हाताऱ्या आजीने कुरकूर करावी, बोटे मोडावीत, शिव्या-शाप द्यावेत तसे जाणवले असते.

प्रसंगी प्रखर दाहक लिहिणारे लोकहितवादी स्त्रियांच्या विपन्नावस्थेचे चित्रण करतात

तेव्हा अंतःकरणात कळवळते! ठिणग्यांचा वर्षाव करणाऱ्या लेखणीतून अश्रूंचे थेंब टपकत आहेत असा भास होतो. या दृष्टीने त्यांनी लिहिलेली स्त्रीविषयक पत्रे पाहावीत. (उदा. १०·२११, १५·२१५, ७०·२२५ इ.)

'एखाद्या उनाड पोराची बापाने आपल्या पत्रातून परखड शब्दातून कानउघाडणी करावी आणि त्याला त्याची कर्तव्ये ठसठशीत शब्दांत पटवून द्यावीत; तसे या पत्रात्मक निबंधांचे स्वरूप आहे.'[1] ही एकदा पत्रलेखनामागची भूमिका लक्षात घेतल्यावर पित्याला मुलाच्या दुर्वर्तनाबद्दल जसा राग येतो तद्वत मुलीचे दुर्दैव तिच्यावर होणारा अन्याय पाहून त्याचे अंतःकरण कळवळत आहे, हे पत्रातील मजकुरावरून लक्षात येईल.

## पत्रलेखनमाध्यमातील औचित्य

लोकांना त्यांची स्थिती, रीती कशी आहे हे दाखवण्यासाठी आणि त्यांना योग्य ते मार्गदर्शन करण्यासाठी लोकहितवादींनी लेखनास पत्राचे स्वरूप दिले, त्यामध्ये अनेक दृष्टींनी त्यांनी औचित्य साधले आहे. 'पत्रातून जसा आपला अभिप्राय स्पष्टपणे कळवावा त्याचप्रमाणे समाजाला उद्देशून लिहिलेली ही निःसंदिग्ध भाषेतील पत्रे आहेत.'[2] दुसरे वैशिष्ट्य म्हणजे पत्रात अनौपचारिकपणा नसतो. प्रस्तावना नसते. एकदम विषयाला सुरुवात होते. लोकहितवादींनी प्रस्तावनेशिवाय लागलीच विषयविवेचनाला सुरुवात केली आहे. पत्रास दिलेल्या शीर्षकावरून विषयाचे आणि पत्रातील पहिल्या एकदोन वाक्यांवरून विषयातील मुद्द्याचे स्वरूप स्पष्ट होते, (उदा. पत्रक्र. ३·७७ इ.) पत्राचे शेवटही अनौपचारिक आणि अकृत्रिम आहेत. (उदा. पत्र क्र. ७, ३७ इ.)

त्यांच्या लेखनात सूत्रमयता आहे. डॉ. पु. ग. सहस्रबुद्धे यांना ती सूत्रमयता दोषरूप वाटते.[3] ते लेखन त्रुटित स्वरूपाचे वाटते. वास्तविक त्यांचे लेखन सूत्रमय असूनही त्रुटित नाही. पत्रांतील मजकूर आटोपशीर आहे पण तो अर्धवट, अपुरा नाही. छोट्या छोट्या वाक्यांतून, एखाद दुसऱ्या मार्मिक विधानातून नेमका अर्थ व्यक्त होतो. शेरे मारावेत, ताशेरे ओढावेत तसे ते अभिप्राय नाहीत.

डॉ. सहस्रबुद्धे म्हणतात त्याप्रमाणे विवेचन, खंडनमंडन, आक्षेप, निरसन अशा चिपळूणकरी तऱ्हेचे त्यांच्या लेखनाचे स्वरूप नाही हे काही अंशी खरे आहे. पण तसे जर लेखनाचे स्वरूप असते तर लेखन आकाराने मोठे आणि त्याचे स्वरूप केवळ विचारजड असे झाले असते आणि त्यामुळे त्यातील 'पत्राचा' आत्मा नष्ट झाला असता.

.................................

१. लोकहितवादी : काल आणि कर्तृत्व–डॉ. फडकुले, पृ. २६३.

२. ” ” प्रस्तावना, पृ. ६८.

३. लोकहितवादींची शतपत्रे–डॉ. पु. ग. सहस्रबुद्धे.

लोकहितवादींनी स्थूलमानाने ( १ ) विद्या, ( २ ) हिंदूंचे धार्मिक जीवन, ( ३ ) स्त्री-जीवन, ( ४ ) जातिभेद, ( ५ ) ब्राह्मण, ( ६ ) आर्थिक जीवन, ( ७ ) इंग्रज राज्यकर्ते या विषयांवरती लिहिले आहे. या विषयांवरती एकूण त्यांनी १०७ पत्रे लिहिली. निबंधाचे स्वरूप जर द्यावयाचे असते तर त्यांनी वरील प्रत्येक विषयावरती फार तर दोन-तीन निबंध लिहिले असते म्हणजे काम भागले असते. आणि एकूण १७–१८ लेखांतच सर्व विवेचन आटोपले असते. असे निबंधही प्रभावी झाले असते यात शंका नाही, परंतु विचारवंतांपेक्षाही सर्वसामान्य वाचकासाठी हे लेखन त्यांना करावयाचे असल्यामुळे त्या सर्वसामान्य वाचकापर्यंत ते निबंध कितपत गेले असते, याचा विचार आपण केला पाहिजे.

दर आठवड्याला वाचकांना उद्देशून पत्रे लिहिल्यामुळे त्यांना वाचकांची हळूहळू मने तयार करता आली. औषधाचा एकदम मोठा कडवट डोस दिल्यास रोगी पुढचा डोस घेण्यासाठी येणारच नाही, हे ओळखून त्यांनी डोसाचे प्रमाण कमी केले. कडू गोळी-भोवती चटकदार भाषाशैलीने चवदार आवरण घातले. चटकदार प्रसंग, घटना ( उदा. ७-१०, ५०-२९, २६. ८६ इ. ), काही छोट्या कथा ( उदा. १९-१६, ५६-३४, ५९-३७, २९-१०२ इ. ) यांचा सुगंध तीत मिसळून दिला.

पत्राचे स्वरूप दिल्यामुळे वेगवेगळ्या निमित्ताने आणि वेगवेगळ्या पद्धतीने सांगून त्यांना प्रमुख चार-पाच विषय वाचकांच्या मनावर ठसवता आले, बिंबविता आले. गवंडी ज्याप्रमाणे एखादी अर्धी भिंत बांधतो आणि मग दुसरी भिंत तयार करण्यासाठी विटा रचतो. तोपर्यंत पहिल्या भिंतीचे काम पक्के होते. नंतर तो गवंडी पुन्हा पहिल्या भिंतीकडे वळतो. काही फूट बांधकाम झाल्यानंतर तो तिसऱ्या भिंतीच्या बांधकामाकडे वळतो. त्याप्रमाणे लोकहितवादींनी आलटूनपालटून विषयावरती लिहिल्या-मुळे त्याच विषयावरती पुढे प्रसिद्ध होणारे पत्र वाचण्यापूर्वीच्या दरम्यानच्या काळात वाचकास अंतर्मुख होऊन विचार करण्यास वेळ मिळाला. धक्का देणारा नवीन विचार एकदम झटकून टाकावा अशी त्यांची प्रतिक्रिया न होता हलके हलके तो त्या विचारा-तील सामर्थ्य आणि सौंदर्य याची अनभूती घेण्याइतपत तयार होत जाऊन त्याच्या वृत्ती प्रभावित आणि प्रकाशित होऊ लागल्या.

## विचारातील मार्मिकता

लोकहितवादी यांच्या शालेय वयातील एक प्रसंग बोलका आहे. एकदा ते पहाटे संगमावर फिरायला गेले असताना काही सैनिक बंदूक चालवण्याचा सराव करीत होते. मधोमध पाण्याने भरलेली एक घागर ठेवलेली होती. तिच्यावर निशाण लागावे असा हेतू होता. पण कोणत्याही सैनिकांचा, इतकेच काय अधिकाऱ्याचाही नेम लागला नाही. ते पाहून गोपाळरावांना हसू आले. अधिकाऱ्यांनी त्यांना जाब पुसला. गोपाळरावांनी

आव्हान स्वीकारून बरोबर मधोमध घागर फोडली. साऱ्यांना आश्चर्य वाटले. ही गोष्ट जनरलसाहेबांच्या कानावर गेली. ते म्हणाले, 'ब्राह्मण लोक निशाण मारण्यात जर इतके हुषार होते तर त्यांनी आपले राज्य कसे गमावले?' यावर लहान वयातील गोपाळरावांनी मार्मिक उत्तर दिले, 'ब्राह्मणांचे राज्य ते बंदुक मारण्यात कसबी नव्हते म्हणून गेले नाही, त्यांच्यात ऐक्य नव्हते म्हणून त्यांचे राज्य गेले.' या आठवणीवरून ते अचूक शरसंधान आणि मार्मिक विधान करण्यात किती तरबेज, कुशल होते हे दिसून येईल. शतपत्रांत अशी मार्मिक विधाने जागोजागी आढळतील. कुशाग्र बुद्धी, प्रदीर्घ चिंतन, थोर व्यासंग, मर्मभेदी दृष्टी, भाषाप्रभुत्व यामुळे त्यांची विधाने अर्थवाही आणि मर्मग्राही होत. काही उदाहरणे – विरोधकांच्या विधानांना, आक्षेपांना दिलेली मार्मिक उत्तरे (८१·१४९, १०३·७३), इंग्रज येथून कसे आणि केव्हा जातील याविषयी एलफिन्स्टनचे उद्धृत केलेले विधान (३५·१९३), ब्राह्मणांना निरुत्तर करणारा सवाल (७२·१९०), मार्मिक दृष्टान्त (१०·२११), बंदुकीने एकामागून एकेक गोळ्यांच्या फैरी झाडाव्यात आणि शत्रूची दाणादाण उडवून टाकावी त्याप्रमाणे विरोधकांना विचारलेली खोचक प्रश्नावली (६७·३३५), धर्मसुधारणेसाठी लोकांनी काय करावे याची दिलेली कलमवार यादी (६४·१२८), पेशव्यांचे राज्य का बुडाले याची कलमवार कारणे (२०·१७१), वाईट चालींच्या प्रकारची यादी (१३·८४), दारिद्र्य का आले याचे निदान (४३·११७, ५७·२७१), आम्ही ज्ञानशून्य का झालो? (३३·२५), याशिवाय सुटसुटीत, सुलभ अर्थपूर्ण व्याख्या – वृत्तपत्र म्हणजे काय? (७·९), विद्वान कोणास म्हणावे? (३१·२३), धर्माचे सार काय? (७·१४१, ८३, १४५), पत्र क्र. २२ च्या अखेरीस आलेला संवाद विलक्षण मार्मिक आहे. पान क्र. ५८ व ६१ मधील आचाराच्या संदर्भात लिहिलेली वाक्ये विलक्षण गतिमान आणि उपरोधपूर्ण (पृष्ठे अनुक्रमे १२५, १७९) आहेत.

'बुडती हे जन न देखवे डोळा। येतो कळवळा म्हणवूनी' या तुकाराममहाराजांच्या वृत्तीने लोकहितवादींनी पत्रे लिहिली आहेत. किंबहुना यातील एकेक पत्र म्हणजे तुकाराममहाराजांचा परखड अभंगच होय!

**संदर्भ ग्रंथ :**

(१) लोकहितवादींची शतपत्रे—डॉ. पु. ग. सहस्रबुद्धे
कॉंटिनेंटल प्रकाशन, पुणे, तिसरी आवृत्ती, १९६३.

(२) लोकहितवादी : काल आणि कर्तृत्व—डॉ. निर्मलकुमार फडकुले
कॉंटिनेंटल प्रकाशन, पुणे ३०, आवृत्ती पहिली, १९७३.

विवेचनामधील कंसातील पहिला आकडा पत्रक्रमांक आणि दुसरा आकडा पृष्ठक्रमांक (डॉ. सहस्रबुद्धे संपादित प्रतीचे) दर्शवितो.

# आगरकरांची शैली



डॉ. मनोहर माधव अळतेकर

कोणताही उत्तम लेखक आणि त्याची शैली ही एकरूप असतात. दोघांत द्वैत नसते. गणिताच्या परिभाषेत सांगावयाचे म्हणजे लेखक आणि शैली या दोहोंत असणाऱ्या द्रव्यांचा व विशेषांचा तंतोतंत हिशोब जुळावा लागतो. अर्वाचीन मराठी वाङ्मयातील एक महान निबंधकार व शैलीकार गोपाळ गणेश आगरकर हे वरील नियमाचे निदर्शक आहेत.

आगरकरांच्या शैलीचा विचार करिताना ते ज्या महान कालखंडाचे परिपाक आणि प्रवर्तक आहेत, त्याची ठळक वैशिष्ट्ये कोणती हे बघितले पाहिजे. १८७४ साली "मराठी भाषेचे शिवाजी" विष्णुशास्त्री चिपळूणकर यांच्या निबंधमालेचा जन्म झाला. १९२० साली लोकमान्य बाळ गंगाधर टिळक यांचा मृत्यू झाला. १८७४ ते १९२० हा महाराष्ट्राच्या पुरुषार्थाचा कालखंड नव्हे, सुवर्णखंड आहे. रानडे, चिपळूणकर, टिळक व गोखले यांच्याप्रमाणेच या कालखंडाचे आगरकर हेही एक शिल्पकार आहेत. पण या कालखंडात प्रकर्षाने प्रकट होणाऱ्या प्रवृत्तीच्या पायरवाचा मागोवा बाळशास्त्री जांभेकर, विष्णुबुवा ब्रह्मचारी, लोकहितवादी आणि जोतिबा फुले यांच्या अव्वल इंग्रजीच्या काळात जाऊन घ्यावा लागतो. "स्वधर्म, स्वदेश, स्वभाषादिकांचा" "जगी मान व्हावा" हा हेतू जसा चिपळूणकरांचा होता, तसाच तो बाळशास्त्री जांभेकरांचा व विष्णुबुवा ब्रह्मचाऱ्यांचा, लोकहितवादींचा होता तितकाच तो टिळकांचा व आगरकरांचा होता. फुल्यांचा होता तसाच तो रानडे व गोखले यांचाही होता. फार काय, "ज्ञानाचा एका, किंवा नामाचा तुका" याप्रमाणे आगरकरांचे पूर्वावतार म्हणजे लोकहितवादी असे म्हणण्याचा प्रघात आहे व त्यात थोडेफार तथ्यही आहे. आगरकरांच्या व्यक्तिमत्त्वात किंवा शैलीत जे आहे त्याचे पाय लोकहितवादींच्या वाङ्मयाच्या व विचारांच्या पाळण्यात दिसतात इतकेच! त्यापलीकडे साम्य शोधण्यात अर्थ नाही. आगरकरांच्या लेखसंग्रहामधून विचारांच्या दृष्टीने अभिनव वाङ्मयाच्या दृष्टीने विलोभनीय, चारित्र्याच्या दृष्टीने वंदनीय असे काही अधिक आणि अलौकिक जाणवते. शब्दांमधून, वाक्यखंडांमधून व संपूर्ण लेखामधून याचा आविष्कार होत असतो. जीवनातील अनेक बऱ्यावाईट प्रश्नांकडे बघणारी आगरकरांची तर्ककठोर पण

अनुक्रमणिका





तितकीच हळुवार वृत्ती त्यांच्या लेखामधून प्रकट होते. पुरुषांचा किंवा स्त्रियांचा पेहराव असो, घटस्फोट अथवा काडीमोड किंवा स्वयंवर असो, "तरुण सुशिक्षितांस विज्ञापना असो" किंवा "महाराष्ट्रीयांस अनावृतपत्र" असो, प्रत्येक लेखामधील ओळींमधून, आगरकरांच्या मनोवृत्तीचा विचारपद्धतीचा व ते शब्दांकित करण्याचा एक असामान्य वेगळेपणा वाचकाला जाणवल्यावाचून राहत नाही. आणि या क्षणीच आगरकरांच्या शैलीचा जन्म होतो.

लेखकाच्या शैलीचा अभ्यास करताना त्याच्या चरित्राचे व काळाचे जसे अवधान ठेवावे लागते त्याप्रमाणे आणखी एका गोष्टीचा आवर्जून विचार करावा लागतो. तो म्हणजे लेखक ज्या माध्यमाचा उपयोग करतो, त्या वाङ्मयप्रकाराचा ! काव्य, नाटक, कादंबरी याप्रमाणेच निबंध हा एक प्रतिष्ठित व प्रौढ वाङ्मयप्रकार आहे. लोकहितवादी, चिपळूणकर, आगरकर, टिळक, शि. म. परांजपे, नरसिंह चिंतामण केळकर, कृष्णाजी प्रभाकर खाडिलकर, अच्युतराव कोल्हटकर आणि विनायक दामोदर सावरकर अशा प्रथमश्रेणीच्या प्रतिभाशाली व प्रभावी निबंधकारांच्या पर्वतराजी मराठी वाङ्मयात प्रख्यात आहेत. याच पर्वतांच्या शिखरांमधून अनेक लहानमोठ्या निबंधकारांचे वारिप्रवाह कधी वेगाने तर कधी संथपणे वाहताना आढळतात. आगरकरांनी ह्याच निबंधवाङ्मयप्रकाराद्वारे आपले मनोगत म्हणा, विचार म्हणा, आशय म्हणा, प्रकट केला.

तसे पाहिले तर निबंध म्हणजे नि + बद्ध = एकत्र बांधणे, मुद्देसूद किंवा सुसंबद्ध लिहिणे. प्राचीन काळात आपण त्यांना टीका म्हणत होतो.

ज्ञानेश्वरांची 'भावार्थदीपिका', वामनपंडितांची 'यथार्थदीपिका' आणि रामदासांचा 'दासबोध' हे निबंधाचेच पुरातन प्रकार होत. आपण त्याला आता प्रबंध असेही म्हणतो. लो. टिळकांचे 'गीतारहस्य' हा मोठा निबंध म्हणजे प्रबंधच आहे. संयुक्त वाक्यांत जसा अनेक वाक्यांचा तसा प्रबंधात अनेक विचारांचा समावेश झालेला असतो तर लेखात किंवा निबंधात एकच विषय किंवा एकच विचार ठळकपणाने मांडलेला असतो. आगरकरांचे निबंध हे चिपळूणकर आणि टिळक यांच्या लेखाप्रमाणेच एकेरी आहेत. असे होण्याचे दुसरे कारण म्हणजे हे लिखाण वृत्तपत्रात प्रसिद्ध झालेले आहे. निबंधमाला दर महिन्याला किंवा कधी कधी अनियमितपणे निघत असल्यामुळे "आमच्या देशाची स्थिती, डॉ. जॉन्सनचे चरित्र किंवा मोरोपंतांची कविता" ह्या निबंधांचा पसारा अनेक अंगे व्यापतो. उलट, केसरी व सुधारक ही साप्ताहिके असल्यामुळे कधी कधी लेखांक झाले तरी चिपळूणकरांच्या तुलनेने टिळकांचे व आगरकरांचे लेख अधिक आटोपशीर आणि मुद्देसूद वाटतात.

निबंध हा अनेक प्रकारचा असतो. काही निबंध वर्णनात्मक असतात तर काही निवेदनात्मक ! काही प्रचारात्मक तर काही निबंध उपदेशात्मक ! काही निबंध उपरोधात्मक आणि उपहासात्मक, तर काही निबंधांची जात ही कवितेप्रमाणे ललित असते.

आगरकरही एकाच धाटणीचे लेख लिहीत नाहीत. आगरकरच काय पण प्रत्येक निबंध-कार, निबंध हा राग अनेक ढंगाने आळवतो व रंगवतो. 'धर्मकल्पना आली कोठून?', 'देवता', 'देवतोत्पत्ती' आणि 'अथ आचारप्रकरण' हे लेख प्रामुख्याने माहितीवजा आहेत. विवाद व विवेचन आहे पण ते गौण आहे. मुलाइतकीच मुलींच्या शिक्षणाची आवश्यकता किंवा संमतिवयाच्या वादावरील सर्व लेख हे प्रासंगिक आहेत. लोकशिक्षण व लोकजागृती हे आगरकरांच्या लेखनाचे मुख्य उद्दिष्ट असल्यामुळे काही विषय आणि काही विचार आगरकर पुन्हापुन्हा मांडतात. त्यामुळे अशा निबंधात पुनरावृत्ती, पाल्हाळ आणि प्रचार हे वाङ्मयाला मारक असणारे त्रिदोष मधूनमधून अपरिहार्यपणे आढळतात. उलट काही लेख लिहिताना आगरकर नुसते विचार मांडत नाहीत तर आपल्या ज्ञान-दीपावर वाचकांच्या बुद्धीत सुप्त असलेला स्वतंत्र विचारांचा दीप लावतात. निबंध किंवा लेख अनेक प्रकारचे असले तरी उत्तम लेख किंवा निबंध तोच, की जो अशा सचेतन विचारांनी ओतप्रोत भरलेला व भारलेला असतो.

"वादे वादे जायते तत्त्वबोधः" हे सुभाषित आज अनेक शतके प्रसिद्ध असले तरी ग्रंथप्रामाण्य, विभूतिपूजा आणि बौद्धिक आळशीपणा यामुळे "ठेविले अनंते तैसेचि रहावे" ही सरासरी भारतीयांची धारणा आहे. त्यामुळे ज्ञाताच्या कुंपणावरून उड्डाण करण्याची आणि स्वतंत्र विचार करण्याची उमेद व उत्साह गेल्या दोन हजार वर्षांच्या इतिहासात काही सन्माननीय अपवाद सोडल्यास सापडत नाही. इंग्रजांनी हा देश परतंत्र केला आणि त्याचे भीषण अर्थशोषण केले हे खरे, पण येथील प्रजेस परिचित नसलेली लोकशाही, व्यक्तिस्वातंत्र्य, राष्ट्रनिष्ठा अशी जीवनमूल्ये इंग्रजांच्याबरोबर ह्या देशात आली. तोपर्यंत हा देश तथाकथित परमार्थप्रेमाने पछाडलेला होता. आगरकरांचा मोठेपणा हा की त्यांनी स्वतंत्र बुद्धीचे व विचारकलहाचे महत्त्व ओळखले, म्हणून आगरकर आवेशाने विचारतात, "विचारकलहाला तुम्ही इतके कशासाठी घाबरता? पाश्चात्य शिक्षणामुळे ज्या दिवशी एका वादास आरंभ झाला तो दिवस हिंदुस्थानच्या भावी इतिहासात महोत्सव करण्यासारखे होईल." निबंधाचे अधिष्ठान विचार हे असते. हा विचार म्हणजे वरवरचा विचार, मत किंवा आग्रह असून चालत नाही. अशा विचारात कोणत्याही प्रश्नाचा, प्रमेयाचा, मग ते प्रमेय किंवा तो प्रश्न सामाजिक, राजकीय, धार्मिक किंवा नैतिक असेल–स्वतंत्र विश्लेषणात्मक बुद्धीने मूलगामी वेध घेतलेला असतो. आगरकरांच्या अनेक प्रासंगिक आणि वर्णनात्मक व क्वचित पाल्हा-ळिक व पुनरावृत्ती असणाऱ्या लेखांना हे विश्लेषणात्मक विचारक्षमतेचे अधिष्ठान असल्यामुळे "फोलें गेलीं पण सत्त्व उरलें आहे.", "आमचें अजून ग्रहण सुटलें नाहीं.", "मूळ पाया चांगला पाहिजे" आणि संमतिवयाच्या वादाचे लेख ह्या सगळ्यांमधून शाश्वत सत्याचे दर्शन घडते.

आगरकरांचे लेख पुस्तकी नाहीत किंवा रोमँटिक नाहीत. वास्तवता व ध्येयवाद ह्या

काही परस्परविरोधी कल्पना नव्हेत. पाय जमिनीला लागले असले तरी डोके आकाशाला भिडू नये असे थोडेच आहे ? चिपळूणकर आणि टिळक त्यांच्या लेखनात जितके वास्तवाचे तारतम्य आहे तितकेच ते आगरकरांच्यात आहे. आगरकरांना कायद्याच्या मर्यादा कळतात, मतपरिवर्तनाचे व त्यासाठी अंग मोडून कराव्या लागणाऱ्या प्रचाराचे व आचाराचे महत्त्व एका कर्त्या सुधारकाला कोणी शिकविण्याची गरज नव्हती. विचार, उच्चार आणि आचार ह्यांतील अद्वैत आगरकरांच्या शब्दाशब्दांमधून प्रकट होते. आगरकरांचे निबंध हा अन्तर्बाह्य डौलदार असतो; त्यातील ओजस्वीपणा हा केवळ शब्दांचा नसतो, केवळ मनोवृत्तीचा नसतो, तर अनुभवाच्या धगधगीत अग्निकुंडामधून तो निर्माण झालेला असतो. आगरकरांचे लेख वाचताच मेणाचा मऊपणा आणि वज्राचा कठोरपणा हा पदोपदी जाणवतो. लोकहितवादींची पत्रे वाचताना त्यातील भाबडेपणा, रागीटपणा, एकांगीपणा यामुळे प्रांजळपणात व सार्वजनिक रीत व बुद्धीतही थोडा गढूळपणा आल्यासारखा वाटतो. चिपळूणकरांच्या भाषेचा डौल हा विलक्षण मोहक खरा, पण मूळ आचाराचा विचार केला की चिपळूणकरांची युगप्रवर्तक निबंधमाला डावी ठरते. आज वाचताना चिपळूणकरांचे कित्येक विचार किंवा मते ही प्रसंगोचित वाटतात. त्या काळाच्या प्रश्नांच्या, वादांच्या व व्यक्तींचा संदर्भ लक्षात घेतल्यास ती ' अनुरूप ' वाटली तरी दिक्कालामधून आरपार पाहण्याची दृष्टी या एका महापुरुषात नव्हती हे कळते. " आपल्या देशाची स्थिती " विद्वत्त्व व कवित्व फुलविण्यावरील लेखन ह्यांची उत्तम साक्ष आहेत. आगरकरांच्यात हा द्रष्टेपणा आहे. त्यामुळे आगरकरांच्या काही लेखांतील विचार अव्यवहार्य आणि एकांतिक वाटले आणि प्रतिपक्षीयांनी त्यांचा त्या काळी कितीही विपर्यास आणि उपहास केला आणि असंख्य माणसांचे मत आपल्यासारखे केले तरी आज जेव्हा आपण मागे वळून बघतो आणि विचार करतो तेव्हा त्या क्रान्तिकारक विचारवंत निबंधकारांची अनेक अनुमाने आणि सिद्धान्त आज अबाधित राहिली आहेत. " आधीं सामाजिक कीं आधीं राजकीय " या एका वादावर अनेक बाजूंनी त्या काळीं मोठे रणकंदन माजले होते. आपण परतंत्र असल्यामुळे आपणात अनेक सामाजिक दोष आले; स्वातंत्र्यसूर्य उगवला आणि परकीय राज्यकर्ते गेले की रामराज्य होईल, हा एक सिद्धान्त तर पारतंत्र्य हे कारण नसून परिणाम आहे. आज हजारो वर्षे आमच्यात बद्धमूल झालेल्या अनेक दोषांचा परिणाम किंवा परिपाक म्हणजे आमचे हे पारतंत्र्य हा आगरकरांचा आज काळाच्या भट्टीत तावून सुलाखून निघालेला सिद्धान्त आहे.

तसेच राजकीय सुधारणा व सामाजिक सुधारणा यांचा जन्म एकाच परिस्थितीमधून व प्रेरणेमधून झाला आहे, असे आगरकर प्रतिपादन करतात. " राष्ट्रसभा ज्या विद्येचें फळ आहे त्याच विद्येचें फळ सामाजिक परिषद आहे...या देशांत ज्या विद्येचा पाय शिरला आहे ती आमच्या राज्यविषयक विचारांप्रमाणें धार्मिक व सामाजिक विचा-

रांतही प्रचंड क्रांति करणार व तदनुसार आमचें आचरण बदलत जाणार." आज ऐंशी वर्षांनंतर आगरकरांचा शब्द खरा ठरलेला आपण बघत आहोत.

आगरकरांना फक्त बुद्धी मान्य होती. विभूतिपूजा आणि ग्रंथप्रामाण्याचा त्यांना तिटकारा होता. रानडे आणि टिळक यांच्यात कितीही मतभेद असले तरी प्राचीन वचनांचा व सिद्धान्तांचा आधार घेऊन ते वाद करतात. आगरकर मुळातच घाव घालतात. त्यामुळे चहाग्रामण्य प्रकरणात रानडे आणि टिळक हे जसे प्रतिपक्षी असूनही एकत्र आले तो प्रकार आगरकरांच्या बाबतीत शक्य नाही. संमतिवयाचा वाद असो, रखमाबाई प्रकरण असो, रानडे व टिळक त्यांची युद्धाची शस्त्रे एकच असत. उलट आगरकरांचे शस्त्र वेगळे होते. यामुळे आगरकर परंपरावादी नाहीत, चिपळूणकर आणि टिळक हे परंपरावादी आहेत. दोन हजार वर्षांपूर्वी आमचा देश स्वतंत्र, संपन्न होता, वगैरे ते सांगत बसतात. आगरकर स्वातंत्र्याची मागणी करतात. त्या इतिहासजमा गोष्टी घोकत बसत नाहीत आणि वाचकांच्या अज्ञानास गतवैभवाची व अहंकाराची फुंकर घालीत नाहीत. त्याचा अर्थ त्यांना स्वत्व नव्हते असा नाही. उलट भारतीय संस्कृतीला कसलाही धक्का न लागता सुधारणा झाल्या पाहिजेत असा त्यांचा आग्रह आहे.

आगरकर हे बुद्धिप्रामाण्यवादी असले तरी हाडाचे लेखक आणि कवी आहेत. कवितारसाचा व वाङ्मयाचा त्यांनी मूलभूत विचार केला आहे. तत्त्वज्ञान, तर्कशास्त्र, अर्थशास्त्र आणि समाजशास्त्र या विषयांचा आगरकरांचा व्यासंग गाढा होता. त्यातच मनाला इष्ट वाटलेले विचार आमरण आचरणात आणल्यामुळे त्यांचे व्यक्तिमत्त्व चौरस आणि कसदार झाले होते. पेशाने पत्रकार आणि शिक्षक असल्यामुळे सर्वसामान्य माणसाला समजेल अशा प्रकारची भाषा आगरकर योजतात. चिपळूणकरांच्या साहित्यिक गुणांचा वारसा आगरकरांच्यात आला आहे. पल्लेदार वाक्यरचना, विषयाचे व विचारांचे आवेशपूर्ण निरूपण हे आगरकरांच्या लेखनाचे सकृतदर्शनी जाणवणारे विशेष आहेत. पण ही वाक्यरचना निरर्थक नसते. शेवटी हे सर्व लेखन वृत्तपत्रातील असल्यामुळे ती ती पदे, ती ती मते आणि तेच तेच युक्तिवाद फिरून आल्यास नवल नाही. नवल हेच की आवेशयुक्त प्रतिपादनाचा गडगडाट, विपर्यासाचा व अतिरेकाचा काळोख आणि विवादाच्या कडाडणाऱ्या विजा आज उरल्या नाहीत. आज आगरकरांच्या शाश्वत विचारांचे, प्रतिभाशाली प्रतिपादनपद्धतीचे प्रत्येक वाक्यरचनेमधून प्रकट होणाऱ्या प्रांजळ, निग्रही, कर्तव्यकठोर पण तितक्याच भावनोत्कट पण बुद्धिनिष्ठ अंगोपांगांचे दर्शन घडविणारे शब्दब्रह्म तेव्हढे उरले आहे.

लोकशिक्षण आणि लोकजागृती करण्यासाठी लिहिलेल्या प्रासंगिक लेखांत वाङ्मयीन गुण का येतात हा खरोखर विरोधाभासात्मक वाटणारा प्रश्न आहे. पण अर्थामागे शब्द धावतात व त्यांना आपोआप बुद्धया प्रयत्न न करता वाङ्मयीन आकार, रूप किंवा

अनुक्रमणिका

सौन्दर्य प्राप्त होते. त्याचप्रमाणे उत्कट आणि विश्लेषणात्मक व्यक्तिमत्त्वामधूनच शैली अवतीर्ण होते.

लेखक काय आणि शैली काय, हा अनन्वय अलंकार असतो. एका लेखकासारखा दुसरा लेखक आणि एका शैलीसारखी दुसरी शैली नसते. आगरकरांच्यात अनेक महत्त्वाचे वाङ्मयीन गुण असले, ते थोर विचारवंत असले तरी काही मर्यादाही होत्या. मिल, स्पेन्सर, दिदेरो इत्यादी पाश्चात्त्य विचारवंतांच्या अभ्यासामधून आणि चिंतनामधून आगरकरांचे मौलिक वाटणारे विचार आकार घेतात. मूलभूत विचार करण्याचे सामर्थ्य आगरकरांच्यात नक्की आहे. पण अशा प्रकारे आत्मसात केलेल्या सिद्धान्त-प्रणालीचा उपयोग ( application ) आगरकर आपल्या सामाजिक, राजकीय, धार्मिक व नैतिक प्रश्नांचा विचार करताना अंगीकारतात. ह्यात कमीपणा कसलाच नाही. आगरकरांना सत्यशोधनाच्या वाटा ठाऊक आहेत. पण ' भाष्यकाराते वाट पुसतु ' ही त्यांची मर्यादा आहे. नव्या वाटांचे, नव्या विचारपद्धतींचे आगरकर प्रवर्तक नाहीत. प्रवर्तक का नाहीत याची कारणे सांगता येतील, पण त्यामुळे जी आहे ती वस्तुस्थिती बदलत नाही. पण त्यामुळे लेखक म्हणून आगरकरांना आणि त्यांच्या शैलीला कसलाच कमीपणा येत नाही. कारण खुद्द आगरकरांना जे अभिप्रेत नाही त्याचा ऊहापोह करणे हे अनुचित व अन्यायाचे होईल.

निबंधकार म्हणून आगरकरांची शैली आजही जिवंत, अर्थगर्भ आणि विचारास चालना देणारी वाटते त्याचे कारण आगरकरांचे प्रसन्न, संपन्न, प्रांजळ आणि प्रखर व्यक्तिमत्त्व व चारित्र्य! आगरकरांचे अनेक लेख त्यांतील विषय आणि विचार कालबाह्य होऊन ही ' वाङ्मय ' म्हणून अजून आकर्षित करतात कारण त्यात लेखकाच्या व्यक्तिमत्त्वाचा व शैलीचा ताळेबंद तंतोतंत जमतो.



अनुक्रमणिका

# लो. टिळकांचा निबंध

आपण जेव्हा मराठीतील शैलीकार निबंधकारांविषयी विचार करू लागतो तेव्हा आपल्यासमोर उभे राहतात ते स्वदेश, स्वभाषा आणि स्वधर्म यांविषयी एतद्देशीयांच्या अंतःकरणात अभिमानाची ज्योत प्रज्वलित करणारे ' निबंधमाला'कार विष्णुशास्त्री चिपळूणकर. समता, बंधुता आणि स्वातंत्र्य यांचा प्रखरपणे पुरस्कार करणारे ' सुधारक '-कर्ते आगरकर, शुद्ध स्वातंत्र्याचे प्रतिपादक काळकर्ते शिवरामपंत परांजपे आणि निबंध-लेखनात रंगून गेलेले साहित्यसम्राट केळकर ! पण लोकमान्य टिळकांची प्रतिमामात्र भारतातील राजकीय असंतोषाचे जनक म्हणूनच उभी राहते ! खरं म्हटलं तर टिळकांचं व्यक्तिमत्त्व विविधरंगी आहे. कधी ते ब्रिटिश सत्तेला आव्हान देणाऱ्या योद्ध्याची भूमिका घेतात, कधी ग्रह-ताऱ्यांचा वेध घेत, वेदांचा अर्थ शोधीत, अनेक अवघड गणिते सोडवीत ' शोधका'ची भूमिका घेतात तर कधी आसेतुहिमाचल पसरलेल्या भरतखंडातील जनतेची सुखदुःखे जाणणाऱ्या नेत्याच्या भूमिकेत असतात, तर कधी कारागृहाच्या उंच भिंतींची क्षिती न बाळगता तत्त्वचिंतनात गाढ रंगलेले असतात. या विविध भूमिकांचं स्वच्छ दर्शन घडतं ते त्यांच्या निबंधलेखनात ! टिळकांचे सर्वच निबंधलेखन अगदी नितळ व स्वच्छ पाण्यासारखे पारदर्शक आहे हा प्रा. वा. ल. कुलकर्णी यांचा अभिप्राय किती मार्मिक आहे ! या निबंधलेखनातून टिळक आपल्या वाचकांशी बोलत असतात, त्यांना शिकवीत असतात, त्यांना इशारत देत असतात, त्यांना जागृत करीत असतात.

लोकजागृतीचे व्रत स्वीकारूनच लो. टिळक लेखनाला उद्युक्त झाले आहेत. " जेणे करून समाजाचे व्यापार सुरळीत चालण्यास मदत होईल असं लोकमत जागृत करणं व जो कोणी या कामी व्यत्यय आणील त्याचे स्वरूपाविष्करण करून वेळीच बंदोबस्त करणं हे वर्तमानपत्रांचे मुख्य कर्तव्य आहे " अशी त्यांची श्रद्धा आहे. त्यामुळेच स्वमत-प्रतिपादनाच्या बरोबर ते ' परमतखंडन ' तीव्रतेनं करतात. ते जे जे लिहितात त्यामागे त्यांचं देशासाठी जळणारं मन आहे हे आपल्या ध्यानात येतं ! विष्णुशास्त्री एकदा

( पुणे नभोवाणी केन्द्रावरील भाषण )

अनुक्रमणिका

टिळकांना म्हणाले होते, "तुमचं अंतःकरण देशाकरता जळते आहे ना ? तर मग तुम्हाला लिहिता आले पाहिजे. तळमळीतून शब्द जन्मास येतात, शब्दांपासून तळमळ उत्पन्न होत नाही." ज्ञानेश्वरीच्या लेखनानं मराठी भाषेत जसं एक नवीन युग निर्माण झालं तसंच विष्णुशास्त्र्यांच्या निबंधमालेनं एक नवीन युग निर्माण केलं असं मानणाऱ्या लो. टिळकांनी शास्त्रीबोवांचा मागोवा घेतच लेखन केलेलं आहे. त्यांच्या प्रत्येक निबंधामागे त्यांचं तत्त्वनिष्ठ, क्रियाशील, वेडर व ज्ञानसंपन्न व्यक्तिमत्त्व आहे हे आपणास विसरता येणार नाही.

टिळकांनी कितीतरी विविध विषयांवर लेखन केलं आहे. स्वदेशी बहिष्कार, राष्ट्रीय शिक्षण व स्वराज्य या राष्ट्रीय चतुःसूत्रीचे विवरण करावयाचं असो किंवा एखाद्या 'प्रासंगिक' विषयातील दडलेल्या शाश्वताचा शोध घ्यावयाचा असो किंवा होऊ द्याच तर दोन हात म्हणून सरकारशी लढण्याचा पवित्र घ्यायचा असो किंवा एखाद्या प्रश्नावर लोकमत घडवायचं असो, टिळकांची मूर्ती एखाद्या कायदेपंडितासारखी दिसते. तात्यासाहेब केळकर म्हणतात त्याप्रमाणे टिळक हे आपल्यासमोर येतात ते वकील म्हणून, न्यायाधीश म्हणून नव्हे ! ज्या पक्षाची वकिली करावयाची म्हणून ते उभे असतात त्या पक्षाच्या विरुद्ध असलेला पक्ष हा त्यांच्या सहानुभूतीचा विषय होणं अशक्यच असतं ! आपल्या पक्षाची अत्यंत तर्कशुद्धपणं आवश्यक ती प्रमाणं देऊन बाजू प्रभावीपणं सादर करणं हा त्यांचा लेखनोद्देश असतो. त्यांचं प्रतिपादन त्यामुळेच स्पष्ट निश्चित असतं. 'आमची अशी खात्री आहे', 'आम्हांस सर्वतोपरी हेच इष्ट दिसते' असे निश्चयी वाक्यान्त त्यांच्या निबंधातून वारंवार आढळतात. आपली मते ठामपणे मांडण्याची टिळकांची रीत लक्षांत घेण्याजोगी आहे. आपल्या निबंधातून जे मांडायचं त्यासंबंधी त्यांनी खूप विचार केलेला असतो, खूप तयारी केलेली असते. ज्या विषयासंबंधानं निबंधलेखन करावयाचे आहे त्या विषयावरील जेवढी म्हणून उपलब्ध माहिती मिळेल ती मुळातून अभ्यासणं त्यांना आवश्यक वाटत असे. प्रांतिक व हिंदुस्थान सरकारची बजेटं, दुष्काळ कमिशनचा रिपोर्ट, होळकर सरकारचा राजिनामा, पोलीस खात्याची सुधारणा, तिबेटची मोहीम, रुसो-जपानी युद्ध, राष्ट्रीय शिक्षण इ. अनेक विषयावर त्यांनी केलेलं लेखन तपासलं तर त्यामागचे त्यांचे परिश्रम, त्यांचं दीर्घकाल चाललेलं चिंतन लक्षात येतं ! 'नामूलं लिख्यते किंचित्' ही त्यांची प्रतिज्ञाच होती. त्यामुळे त्यांचे निबंधलेखन परिणामकारक ठरत असे. मूलभूत चिंतन करून चिरंतन असे सिद्धांत ते कसे मांडीत हे पाहावयाचे असेल तर त्यांच्या 'सनदशीर व कायदेशीर' या निबंधाकडे वळावे लागेल. 'सनदशीर' व 'कायदेशीर' या दोन्ही शब्दांचे अर्थ निश्चित करून मग ते म्हणतात, "कायदा जर जुलमी असेल तर शिक्षा सोसूनच त्याचा प्रतिकार केला पाहिजे." निबंध कोणत्याही विषयावरचा असो, तो वाचकांच्या आटोक्यात येईल इतका सुबोध आणि स्पष्ट झाला पाहिजे याची ते

काळजी घेत. लेख लिहिताना तो लिहिण्याचा उद्देश, त्या विषयासंबंधानं आपले मत, त्यास प्रमाण आणि अखेरीस सिद्धांत असा त्यांच्या निबंधाचा सर्वसाधारण ' घाट ' असे चिपळूणकरांप्रमाणे स्वमतप्रतिपादन व परमत खंडन करावे अशी त्यांची एकंदर पद्धत होती. अर्थात कृत्रिम व अवघड वाक्यरचना न करता सरळ लिहिण्याकडे त्यांचा जसा कल होता तसे ते आपला विचार, आपलं म्हणणं विविध उताऱ्यांच्या, अवतरणांच्या गर्दीत कोंडून टाकीत नसत. त्यांच्या लेखात सहसा उतारे आढळत नाहीत. उताऱ्या-तील विचार आपल्या भाषेमध्ये गोवून ते लिहिल्यामुळे जास्त वजन पडते असं त्यांना वाटे. ते म्हणत, " उतारा चांगला असला तरी तो लेखास खातो आणि वाईट असला तरी लेखास खातो. " पांडित्यप्रदर्शनाची हौस त्यांना नव्हती. मात्र आपला मुद्दा ठसविण्यासाठी ते समर्पक अवतरणांची निवड करीत जी मते मांडावयाची ती त्यांची ठाम मतं असत. एखाद्या शब्दाचा आपल्याला प्रतीत झालेला अर्थ ते किती टामपणे मांडीत ते पाहण्यासारखे आहे. ते ' राजनिष्ठा ' या शब्दाचा अर्थ विशद करताना लिहितात, " राज्यपद्धतीतील दोष नजरेस आणणे हीच खरी राजनिष्ठा होय. एखाद्या नोकराप्रमाणे सरकारच्या प्रत्येक कृत्याला मान डोलवीत राहणे म्हणजे खरी राजनिष्ठा नव्हे. " त्यांच्या निबंधातून अशा सूत्रबद्ध विचाराचा नुसता खच पडला आहे. " स्वराज्याची तहान सुराज्याने भागणार नाही. " मेलेली मने सचेतन करणे हेच संघटनेचे उद्दिष्ट ", " हे राज्य कायद्याचे आहे, दांडगाईचे नव्हे ", " शिकलेले लोक समाजाचे व समाजातलेच आहेत. समाज तरला तरच ते तरणार ", " प्रायश्चित्त म्हणजे पश्चात्ताप नव्हे– ते पापनाशक कर्म होय ", " लोकमताचे बल निश्चयात आहे, केवळ समुच्चयात नाही " अशी कितीतरी सूत्रबद्ध वाक्ये त्यांच्या लेखनातून पदोपदी आलेली आहेत. ही सूत्रबद्ध वाक्ये म्हणजे त्यांच्या चिंतनाचं फल होय. चिंतनशीलता हा त्यांच्या निबंधाचा फार मोठा विशेष ! त्यामुळे त्यांचा निबंध आपल्याला विचारप्रवण करतो. ते मांडीत असलेल्या विषयाची बाजू फार प्रभावीपणे आपल्या लक्षात येते. ज्याला लोकमताला विशिष्ट दिशा द्यावयाची असेल ज्याला लोकमत सुजाण करावयाचं असेल त्याला आपलं लेखन आक्रमक करावं लागतं. खरा पत्रकार आक्रमक पवित्रा घेतो अर्थात केवळ भावनाविवश होऊन काय फायदा ! खऱ्या पत्रकाराच्या लेखणीला बुद्धीचे बळ हवे.

टिळकांचा निबंध विस्तार टाळतो, क्लिष्टता येऊ देत नाही, दुर्बोध होण्याऐवजी सुबोध होण्याचा प्रयत्न करीत असतो ते एवढ्याचसाठी की आपलं म्हणणं वाचकांच्या मनावर चांगलं ठसवावं. यासाठी टिळक आपल्या निबंधातून कडाडून हल्ला चढवितात. अशा वेळी त्यांच्या लेखनातून उपहासाचे–उपरोधाचे सूर आपोआप अवतरत असतात. त्यांनी आपल्या लेखातून केलेले प्रहार सरळ सरळ असतात. शिवरामपंत परांजपे यांच्या-प्रमाणे त्यांना वक्रोक्तीचा आश्रय करावा असं वाटत नाही. ' जाइल्ससाहेब यांची

ओवाळणी ' या लेखात ते सरळ लिहितात, " एकदा गाय लाथाळी निघाली म्हणजे ती कोठे कोणास लाथ मारील याचा नेम नाही ", कर्झनवर भडिमार करताना ते म्हणतात, " या कर्झनशहाने सरस्वती देवीला राजसत्तेची दासी बनवली. " ' टाइम्स ऑफ इंडिया ' पत्राचे संपादक मि. बेनेट हे १९०१ मध्ये विलायतेस चालले असता मुंबईच्या सर भालचंद्रादी पुढाऱ्यांनी त्यांना पानसुपारी केली. या घटनेच्या निमित्ताने ते लिहितात, " केवळ युरोपियन या नात्याने फाटक्या साहेब लोकांची ही मर्जी संपादन करण्याची आम्हास अतिशय वाईट सवय लागत चालली आहे." १९०४ साली 'काळ'-कर्त्यावर ' टाइम्स 'ने काहूर उठविल्यावर टिळकांनी आपल्या निबंधातून सरकारवरच तोफ डागली आहे. ते लिहितात, " सरकारच्या आवडीकरता काही आम्ही पत्रे काढिली नाहीत व सरकारवर कडक टीका केल्याने त्याचा रोष आमच्यावर झाला तरी त्याची आम्हास पर्वा नाही. " परकीय सत्तेविरुद्ध त्यांची लेखणी आग ओकीतच असे, पण स्वजनांच्या डोळ्यांतही ते झणझणीत अंजन घालीत. राष्ट्रीय सभेच्या क्रियाशून्य, आळशी वृत्तीसंबंधी ते लिहितात, " वर्षभर स्वस्थ बसून शेवटी राष्ट्रीय सभा भरविणे म्हणजे नाताळात कोठे तरी वर्षश्राद्ध करण्यासाठी जमण्यासारखेच आहे. "

प्रतिपक्षावर हल्ला करणारे टिळक सार्वजनिक हितबुद्धीनं प्रवृत्त झालेले होते त्यामुळे त्यांच्या निबंधाला एक प्रकारचं तेज, एक प्रकारचा जोष लाभलेला होता. त्यांच्या आक्रमक वृत्तीचं प्रत्यंतर त्यांच्या लेखाच्या मथळ्यापासूनच येत असे. ' हे आमचे गुरु नव्हत ' ' सरकारचे डोके ठिकाणावर आहे काय ? ' ' राज्य करणे म्हणजे सूड उगविणे नव्हे ' ' अजून तरी डोळे उघडतील काय ! ' असे नुसते मथळे पाहिले की त्यांच्या लढाऊ निबंधाची साक्ष पटते. काही वेळा त्यांचे मथळे त्यांच्या मनातील खळबळीचे निदर्शक असतात. " टिळक सुटले पुढे काय ? " हाच प्रश्नांकित मथळा पहा ना ! वाचकाला पुढं उभं करून टिळकांची भव्य मूर्ती जणू विचारीत आहे असा भास आपल्याला होत राहतो.

म्हणजे त्यांच्या निबंधातील ओळन् ओळ त्यांच्या तीव्र भावनेची, तत्त्वनिष्ठेची, निश्चयीपणाची निदर्शक आहे. आपली बाजू प्रभावीपणे मांडताना त्यांनी कडक शब्द वापरले. कडक टीका याचा अर्थ मी कळकळीची टीका असे मानतो, असं ते नेहमी सांगत. म्हणून तर ते रावबहादुर रानडे, गोपाळराव आगरकर, गोखले यांच्यावर टीका करीत असताना ते कठोर होऊ शकत असत. टिळक विभूतिपूजक नव्हते, तर ते विचाराचे पूजक होते. मात्र कोणत्याही व्यक्तीचे मोठेपण ते जाणीत. टिळकांनी लिहिलेले आगरकर, न्या. रानडे, गोखले इ. श्रेष्ठ पुरुषांविषयीचे मृत्युलेख वाचले म्हणजे त्यांच्या गुणग्राहकतेचे, विचारपूजकतेचे, उदारपणाचे प्रत्यंतर येते. प्रा. वा. ल. कुलकर्णी म्हणतात, " टिळकांनी लिहिलेले मृत्युलेख मृत व्यक्तीच्या व्यक्तिमत्त्वाचं सर्वांगीण दर्शन घडविण्याच्या दृष्टीनं जसे उपकारक ठरतात तसेच ज्या जीवनमूल्यांना टिळक

नेहमीच शिरोधार्य मानीत आले त्या मूल्यांवरही एकसारखा प्रकाश टाकतात. गोखल्यांच्या बद्दल ' चोराच्या उलट्या बोंबा ' हा कडक लेख लिहून थोड्याच दिवसांत त्यांच्याविषयीच्या ' मृत्युलेखा'त त्यांच्या विषयी भक्तिभावाने लिहितात. आगरकरांच्या विचारसरणीवर तुटून पडणारे टिळक आगरकरांच्या निधनानंतर किती भावनावश झाले ! दोन दिवस डोळ्यांतलं पाणी सरत नव्हतं आणि त्यांना काही सुचत नव्हतं. मोठ्या माणसांचं मोठेपण नेमकं कशात आहे हे त्यांनी जाणलं होतं हे त्यांनी लिहिलेले मृत्युलेख वाचताना स्पष्टपणे प्रत्ययास येते.

कोणत्याही लेखातून ते जेव्हा टीका करीत तेव्हा त्यांची वृत्ती एखाद्या कुशल शस्त्रवैद्याची होती. ते एका निबंधात लिहितात, केसरीकारांस मनुष्यापेक्षा अगर संस्थेपेक्षा लोकहिताची म्हणून जी तत्त्वे आहेत ती जास्त प्रिय आहेत. या तत्त्वाबद्दल आपली एकनिष्ठता ठेवणे हे तो आपले कर्तव्य समजतो. '' मला वाटतं हे कर्तव्य बजावीत असतानाच त्यांचं निबंधलेखन झालं आहे. आपल्यापुढे जो वाचक आहे त्याची 'जाण' ठेवून त्यांनी त्याला विचारप्रवण केले. त्यांचा निबंध स्पष्टार्थ प्रतिपादक ठसठशीत अनलंकृत होता. अलंकारांची, अवतरणांची, उताऱ्यांची ओझी घेऊन तो मिरवला नाही; कल्पनाविलासाच्या मखरात कधी नटूनथटून बसला नाही, वैयक्तिक निंदेने कधी गढूळ झाला नाही, किंवा त्याने कधी पांडित्याचे प्रदर्शन केले नाही. '' ज्याचे अंतःकरण जसे जळत असेल त्याप्रमाणे तो बोलेल किंवा लिहील '' या बाण्याने त्यांनी आपलं लेखन केलं म्हणूनच शैलीकार निबंधकारांत निबंधकार टिळक आपलं वेगळं रूप सिद्ध करू शकले यात मुळीच संशय नाही.

**संदर्भ :**

१. लो. टिळकांची गद्यशैली – प्रा. वा. ल. कुलकर्णी, प्रतिष्ठान, मे १९६९
२. लो. टिळक यांची गेली आठ वर्षे – श्री. अप्पाजी विष्णु कुलकर्णी, १९०९
३. लो. टिळकांची भाषाशैली – ग. वि. केतकर १९३१
४. मराठी निबंध – डॉ. म. म. आळतेकर

---

# " निबंधमाला " नावाबाबत थोडेसे



प्रा. के. सी. कऱ्हाडकर

कै. विष्णुशास्त्री चिपळूणकरांनी इ. स. १८७४ साली " निबंधमाला " या नावाचे एक नियतकालिक सुरू केले.[१] निबंधमालेतील निबंध वाङ्मयीन गुणांनी नटलेले असून लालित्य, अलंकारिकपणा, ज्ञान, स्वातंत्र्यप्रेम इ. काही गुणांचा उल्लेख करता येईल. कै. विष्णुशास्त्री चिपळूणकर यांच्या निबंधांवर ॲडिसन, जॉन्सन व मेकॉले या इंग्रजीतील निबंधकारांचा बराच परिणाम झालेला दिसतो. तरीही खास चिपळूणकरांचे म्हणता येतील असे विशेषही त्यांच्या निबंधात आहेतच. " लालित्य, भाषासौष्ठव, अलंकार-प्राचुर्य, अतिशयोक्ती, इ. मालाकारांच्या खास वैशिष्ट्यांचा उल्लेख करावाच लागतो. निबंधमालेने मराठी भाषेचे सुशिक्षितांतील अप्रेम नाहीसे केले. मिशनरींच्या धर्मघातक चळवळीला आळा घातला. इंग्रजी राज्यातील आपमतलबीपणाचा दंभस्फोट केला. तात्पर्य, निबंधमालेची कामगिरी विधायक व विध्वंसक अशा दुहेरी स्वरूपाची आहे. तसेच लो. टिळक, गोपाळराव आगरकर, वि. का. राजवाडे, ह. ना. आपटे, शि. म. परांजपे अशी ग्रंथकारांची परंपरा निबंधमालेने निर्माण केली. निबंधमालेबाबत स्वतः विष्णुशास्त्री चिपळूणकरच म्हणतात, " कोणापाशी एक छदाम किंवा ओळही न मागता हे महासत्र संपवून आज अवभृथस्नानाला मोकळे होणार हीच विशेष गोष्ट. "[२] प्रस्तुत उद्‌गार निबंधमाला बंद करताना काढलेले आहेत. त्या काळाच्या पार्श्वभूमीवर हे उद्‌गार महत्त्वाचे आहेत. निबंधमालेचे श्रेष्ठत्व निर्विवाद आहे.

आता " निबंधमाला " या नावाविषयी विचार करू लागले असता पुढील विचार मनात येतात. कै. विष्णुशास्त्री चिपळूणकर यांना आपल्या " निबंध–लेखना " च्या नियतकालिकास " निबंधमाला " हे नाव कै. बाबा पदमनजी यांच्या " निबंधमाला " या निबंधसंग्रहावरून तर सुचले नसेल ना ? " निबंधमाला " या नावाचा बाबा पद-मनजींचा निबंधसंग्रहात्मक ग्रंथ इ. स. १८६० साली " दक्षिणा प्रैज कमिटीने "

---

१. सं. बाबा पदमनजी " सत्यदीपिका "
पु. २ अं. ११ जानेवारी १८७५, पृ. १७०.

२. " प्रदक्षिणा– ' वि. ह. कुलकर्णी, ' ' मराठीतील निबंधवाङ्मय, " पृ. १४४.
[ आ. २ री, १९५६ ]

अनुक्रमणिका

प्रसिद्ध केलेला आहे.[१] इ. स. १८५२ साली बाबा पदमनजींनी "सर्वसंग्रही" या नावाचे एक निबंधसंग्रहात्मक पुस्तक दक्षिणा प्रैज कमिटीकडे सादर केले. त्यास रु. १२० चे बक्षीसही मिळाल्याचा उल्लेख आहे. शिवाय निबंधमालेच्या प्रारंभी पुढील सूचना आहे. "सर्वसंग्रही या नावाचा ग्रंथ बाबा पदमनजी ह्यांनी इ. स. १८५२ साली तयार केला. ह्या ग्रंथाचे नाव हल्ली "निबंधमाला" असे ठेवले आहे.[२] दक्षिणा प्रैज कमिटीचे त्या वेळचे रिवैजर नानाशास्त्री साठे यांनी बाबा पदमनजींच्या ग्रंथाचे नावच बदलेले नाही तर त्यातील महत्त्वाचा भाग सुमारे १/३ गाळून टाकला अशी जाहीर तक्रार ज्ञानोदयाने त्या वेळी जाहीरपणे केलेली आहे.[३] यावरून बाबा पदमनजींच्या "सर्वसंग्रही"चे नाव नानाशास्त्री साठे यांनी "निबंधमाला" असे इ. स. १८६० साली ठेवले. निबंधमालेमध्ये विविध विषयांवर स्फुट निबंधलेखन केलेले होते. त्याची उपयुक्तता व महत्त्व लक्षात घेऊनच दक्षिणा प्रैज कमिटीने त्यास बक्षीस दिले व तो उशीरा का होईना प्रसिद्ध केला हे उघड आहे. बाबा पदमनजींच्या सर्वसंग्रहीस दक्षिणा प्रैज कमिटीने बक्षीस दिले तरी तो ग्रंथ प्रसिद्ध होण्याची काही लक्षणे दिसेनात. शेवटी बाबा पदमनजींनी इ. स. १८५७ मध्ये विद्याखात्याच्या डैरेक्टर साहेबांस सर्व हकीगत कळवली व "बक्षीस परत घेऊन आपले पुस्तक परत द्यावे" असे कळविले. मग दक्षिणा प्रैज कमिटीने तो ग्रंथ गचाळ स्वरूपात प्रसिद्ध केला. "ग्रंथ दिसण्यास चांगला नाही, छपाई सुंदर नाही व अक्षरेपण दिसत नाहीत." या प्रकारची कुरकुर ज्ञानोदयाने केली आहे.[५] ज्ञानोदयकार म्हणतात, "या पुस्तकांतील विषय फार उपयोगी, ज्ञानदायक व मनोरंजक आहेत. त्यांतून कांहीं सांगतों. आलिकजांद्रिया पुस्तकसंग्रहाचा नाश, अर्धी सोडून सकळीला धाऊ नको, इंग्रज लोक, कोंबडीच्या अंड्यातील पिलाच्या उत्पत्तीविषयी, स्त्री-विद्याभ्यास, मुसलमान लोक, मुसलमानी राज्यकर्ती, पौर्णिमेच्या रात्रीवर विचार, सृष्टीतील गुह्यगोष्टी, चहा, स्वदेशप्रीती, पारशी लोक, निरनिराळ्या लोकांचे शक, विलायतेची लक्ष्मी, बाजीराव पेशवे यांच्या अमलात मराठी राज्याची व देशाची स्थिती, इत्यादी."[४] याचप्रमाणे नीती व धर्मविषयी या निबंधमालेत होते असे पुढे ज्ञानोदय म्हणतो. पुष्कळ विषय इंग्रजीवरून भाषांतर करून घेतले आहेत, बाकीचे ग्रंथकर्त्याने स्वतः रचले आहेत.[६] यावरून बाबा पदमनजींच्या निबंधमालेचे स्थूल स्वरूप लक्षात

---

१ बाबा पदमनजी "निबंधमाला" पुणे, १८६०, पृ. २.

२ तत्रैव, पृ. २.

३ ज्ञानोदय, १ ऑगस्ट १८६०, पृ. २६०. (पु. १९ अंक १९)

४ ज्ञानोदय, पु. १९ अं. १९ (१ ऑगस्ट १८६०), पृ. २९७, २९८, २९९.

५ तत्रैव.

६ तत्रैव.

अनुक्रमणिका

येईल. " ग्रंथ करण्याची शक्ती, विषयाची निवड व त्याचे प्रतिपादन करण्याची हातोटी, बाबांची रसिक भाषा, शैली," इ. बाबा पदमनजींच्या लेखनगुणांचा गौरवही ज्ञानोदयकरांनी केला आहे. प्रस्तुत ग्रंथ निबंधस्वरूपाचा व मालेच्या पंधरा वर्षे पूर्वीचा आहे, असे म्हणता येईल.

आता कै. विष्णुशास्त्री चिपळूणकरांच्या " निबंधमाले "तील काही विषय पाहू. ते पुढीलप्रमाणे आढळतात. "मराठी भाषेची सांप्रतची स्थिति," "वक्तृत्व", "इतिहास", " मोरोपंतांची कविता ", " इंग्रजी भाषा ", " विद्वत्व व कवित्व ", " गर्व " व आमच्या देशाची स्थिति, इत्यादी. कै. विष्णुशास्त्री चिपळूणकरांची रसिकता, बहुश्रुतता, मार्मिकता व रसिकता ही निबंधावरून स्पष्ट होते व ती सर्वमान्यही आहे. माहिती, मनोरंजन व भाषाशैली यामुळेही त्यांचे निबंध वाचनीय होते, याबाबतही वाद नाही. तात्पर्य, कै. चिपळूणकरांची निबंधमाला संख्यात्मकदृष्ट्या व गुणात्मकदृष्ट्या, समृद्ध होती असे म्हणता येईल. कारण ती सतत आठ वर्षे चालू होती. त्या मानाने बाबा पदमनजींची "निबंधमाला" गुणदृष्ट्या व संख्यादृष्ट्या फारशी प्रभावी नव्हती. काही जणांना या दोन " निबंधमालां–" मध्ये जमीन-अस्मानाचे अंतर वाटेल. परंतु एक गोष्ट मात्र सत्य आणि ती ही की " बाबा पदमनजी " यांची निबंधमाला ही कै. चिपळूणकरांच्या निबंधमालेपेक्षा अगोदरची आहे व ती कै. चिपळूणकरांनी वाचली असणे अगदी शक्य आहे. बाबा पदमनजींची इ. स. १८६० मधली निबंधमाला स्वरूपदृष्ट्या व नावाच्या बाबतीत कै. विष्णुशास्त्रींच्या पुढे असण्याची शक्यता नाकारता येत नाही. त्यावरून निबंधस्वरूपाचे लेखन प्रसिद्ध करण्यासाठी व जनजागृतीसाठी चालवायच्या नियतकालिकास चिपळूणकरांनी " निबंधमाला " हेच नाव समर्पक व अन्वर्थक वाटल्यावरून स्वीकारले असेल.



## साभार पोच

**विषयान्तर :** चन्द्रकान्त खोत : प्रकाशक अपनुम वाचनालय ना. म. जोशी मार्ग, मुंबई २७ पृ. १२३ किंमत १० रु.

**मृत्यूचे चुंबन घेणारा महाकवी :** साने गुरुजी : लेखक – आचार्य अत्रे; साधना प्रकाशन, पुणे ३० पृ. १३५ किंमत ८ रु.

**फुगे साबणाचे :** विजय तेंडुलकर, नीलकंठ प्रकाशन, पुणे ३०; किंमत ६ रु.

# शब्दवेध



**म. अ. मेहेंदळे**

महाराष्ट्र-साहित्य-पत्रिकेच्या १८६ व्या अंकात (जुलै–सप्टेंबर १९७३) प्रा. रा. श्री. जोग यांचे 'शब्दवेध' ह्या सदरात काही विचार प्रसिद्ध झाले आहेत. त्यासंबंधात खालील टिपणे देत आहे.

(१) लक्ष–लक्ष्य :

प्रा. जोग लिहितात : "मराठीमध्ये एकाच अर्थाची ही दोन शब्दरूपे रूढ आहेत. काही जण लक्ष्य हे रूप कटाक्षाने वापरतात." मराठीत लक्ष आणि लक्ष्य हे दोन निराळ्या अर्थांचे शब्द आहेत आणि त्यात घोटाळा होऊ देऊ नये असे प्रा. जोग ह्यांचे म्हणणे आहे. ह्या दोन शब्दांच्या उच्चारात फरक होत नसल्याने कोणी लक्ष ऐवजी लक्ष्य असे रूप लिहिताना वापरणे शक्य आहे. परंतु हा घोटाळा दाखविणारी चांगलीशी उदाहरणे प्रा. जोगांनी द्यायला हवी होती, ती त्यांनी दिली नाहीत. त्यांनी जे एकच उदाहरण दिले आहे ते मात्र योग्य नाही. ते लिहितात, "हरिभाऊ आपटे यांच्या सुप्रसिद्ध कादंबरीच्या नावामध्येच तो शब्द आला आहे. तेथे त्याचे रूप लक्ष्यांत असे आहे." परंतु हरिभाऊंच्या 'पण लक्ष्यांत कोण घेतो' ह्या कादंबरीच्या नावात आलेला 'लक्ष्यांत' हा शब्द 'लक्ष' शब्दाचे रूप आहे, 'लक्ष्य' शब्दाचे मानण्याचे कारण नाही. अकारान्त नपुसकलिंगी नामाच्या शेवटचा अ उच्चारित असला तर त्याचे सामान्य रूप निराळे होते (फडक–फडक्यात, कुत्र–कुत्र्यात). ह्यासारखेच लक्ष शब्दाचे सामान्यरूप लक्ष्यात हे कादंबरीच्या नावात आले आहे. फडक, कुत्र ह्या-सारख्या शब्दात आणि लक्ष ह्या शब्दात सध्या साम्य दिसत असले तरी ऐतिहासिक दृष्ट्या त्यात फरक आहे हे खरे. फडक, कुत्र हे शब्द काही वर्षांपूर्वी एकारान्त (आणि सानुनासिकही) होते. त्यांची फडक्या, कुत्र्या ही रूपे तेव्हाची आहेत. लक्ष हा शब्द एकारान्त केव्हाच नव्हता. त्यामुळे त्याचे सामान्यरूप प्रा. जोगांना अभिप्रेत असलेले लक्षात हेच असायला हवे. परंतु सादृश्यानुरोधाने असे बदल अधूनमधून घडतात. कादंबरीच्या नावात लक्ष्यात असे लिहिलेले आढळल्यास तिथे लक्ष व लक्ष्य ह्या शब्दांची गल्लत झाली आहे असे मानणे योग्य नव्हे. लिहिणारा लक्ष्यात हे लक्षचे

सामान्यरूप म्हणून लिहीत असतो. लक्ष्यात हे लक्ष्यचेही रूप होऊ शकेल. पण त्याला उपाय नाही. कादंबरीचे नाव लिहिणाऱ्याला ते अभिप्रेत नसावे असे खात्रीपूर्वक वाटते. प्रा. जोगांना ' द्राक्ष्यातले श्री ' असे लिहिणारे कोणी आढळले नाही का ?

## ( २ ) विन्मुख–सन्मुख

ह्या दोन मराठी शब्दांचे मूळ संस्कृत विमुख आणि संमुख असल्याचे प्रा. जोग बरोबर सांगतात. पण " मराठीत त्यातील उपसर्ग आणि पुढील मुख शब्द या दोहोंमध्ये न् विनाकारण घुसलेला आहे. " अशी तक्रार करून मराठी भाषिकांनी विमुख व संमुख ही रूपे पुन्हा स्वीकारावीत हे योग्य अशी जी भाषाशुद्धी ते सुचवितात ती योग्य वाटत नाही. संस्कृतशी तुलना करून मराठी भाषेतले उच्चार शुद्ध की अशुद्ध हे ठरवणे योग्य नाही. मराठीत आज ही रूपे रुढ झाली आहेत तेव्हा ती तशीच चालू राहिल्यास काही हरकत नाही. भाषेच्या बाबतीत व्युत्पत्तिज्ञानापेक्षा लोकव्यवहार बलवत्तर ठरणे अटळ आहे. तसे पाहिले तर मराठीत ' दोन ' ह्या शब्दाच्या शेवटी एक नकार आणि चांभार या शब्दात मधेच एक भकार विनाकारण जागा अडवून बसलेले दिसतील. फार फार वर्षांपूर्वी ही ' चूक ' कुणाच्या लक्षात ( की लक्ष्यात ) आली नाही. किंवा येथूनही ती सुधरविण्याचा कोणी खटाटोप न केल्याने मराठीत ती रूपे तशीच टिकली. त्याने आपल्या भाषेचे कोणतेही नुकसान झाले नाही. मग विन्मुख आणि सन्मुख चालू राहिल्यास कोणती हरकत आहे. चुका दुरुस्त होऊ नयेत असे नाही. पण अगदी पहिल्या पहिल्या उपयोगात विन्मुखादिकांना चूक म्हणता आले असते. प्रा. जोगांच्य लिहिण्याप्रमाणे आता ही रूपे ' रुढ ' झालेली आहेत.

उच्चारसौकर्यामुळे संमुखचे सन्मुख झाले असे म्हणता येत नाही, हे प्रा. जोगांचे म्हणणे मान्य व्हावे. संमती, संमार्जन, संमिश्र अशा शब्दांची सन्मती इत्यादी रूपे झालेली नाहीत. परंतु संमान ह्या अर्थी मराठीत सन्मान रुढ आहे. त्यातही एक नकार ' घुसलेला ' आहे. ' उन्मुख ' शब्दाशी असलेल्या साम्याभासामुळे सन्मुख, विन्मुख ही रूपे प्रचारात आली असावीत ही प्रा. जोगांची सूचना पटेलसे वाटत नाही. ' उन्मुख ' हा शब्द त्याच्या प्रभावामुळे इतर शब्दांची रूपे बदलावीत इतका मराठीत उपयोगात आहेसे वाटत नाही. आणि उदयोन्मुख, मरणोन्मुख ह्यासारख्या सामासिक शब्दात तो विशेष आढळतो.

व्युत्पत्तिज्ञानामुळे काही पंडित लोक भाषेशी–तिच्या लिखित स्वरूपाशी का होईना– नसते खेळ एखादे वेळेस खेळतात. इंग्रजी भाषेतील debt, doubt ह्या शब्दांच्या स्पेलिंगमधील b ही अशीच पंडित लोकांच्या व्युत्पत्तिज्ञानामुळे निरर्थक घुसलेली आहे. हे शब्द इंग्रजीत फ्रेंच भाषेतून उसनवार आले. फ्रेंच भाषेत त्या शब्दांची रूपे dette, doute अशी आहेत. परंतु इंग्रजी भाषेत हे शब्द आले तेव्हा त्या काळच्या इंग्रजी

लॅटिन पंडितांना वरील फ्रेंच शब्दांचे मूळ लॅटिन भाषेत असून त्या मूळ लॅटिन रूपात b असल्याचे माहीत होते. तेव्हा त्यांनी उच्चारित इंग्रजीत जरी नाही तरी लिखित इंग्रजीत एक b ठेवून दिली आणि ती तशीच रूढावली. आता तिचे उच्चाटन होणे कठीण आहे.

लय हा शब्द मराठीत संस्कृतप्रमाणे पुल्लिंगी वापरला जात नाही आणि अभिरूप हा शब्द मराठीत इंग्रजीतील mock ह्या शब्दासाठी प्रतिशब्द म्हणून वापरला जातो, पण मूळ संस्कृतात अभिरूप शब्दाला तो अर्थ नाही अशीही प्रा. जोग यांची तक्रार आहे. तेव्हा त्या चुका दुरुस्त व्हाव्यात अशी त्यांची इच्छा आहे. परंतु जी गोष्ट वर उच्चाराविषयी लिहिली तीच व्याकरणविषयक व शब्दाच्या अर्थात होणाऱ्या फेरबदलाविषयी म्हणता येईल. संस्कृत भाषेच्या इतिहासातही कालक्रमाने व्याकरणविषयक व शब्दार्थविषयक अनेक बदल घडून आले आहेत. हे क्रमप्राप्त आहे. एकदा ह्या प्रारंभकाळच्या ' चुका ' रूढ झाल्या की त्या दुरुस्त करीत बसण्याचा खटाटोप व्यर्थ आहे. प्रा. जोगांनी ' आवर्त ' हा दुसरा संस्कृत शब्द उदाहरण म्हणून घेतला आहे. तो संस्कृतात पुल्लिंगी पण मराठीत नपुंसकलिंगी वापरण्यास नुकतीच सुरुवात झाली आहे. परंतु " तो तितका रूढही अद्यापि झालेला नाही " असे ते म्हणतात. तेव्हा ही चूक दुरुस्त होण्याचा प्रयत्न व्हावा.

### ३. सहमत असणे–होणे

' मी त्यांच्या मताशी ( वा विचाराशी किंवा विधानाशी ) सहमत आहे ' असा एक वाक्प्रचार मराठीत वारंवार ऐकू येतो–विशेषतः व्यासपीठावरून हे प्रयोग प्रा. जोगांना रुचत नाहीत. त्यांचे म्हणणे आपण एखाद्या व्यक्तीशी सहमत असू शकू; पण त्या व्यक्तीच्या मताशी सहमत असणे कसे शक्य आहे ? प्रा. जोगांना वाटणारी अडचण रास्त आहे. त्यांनी हा भाषेत होणारा विनोद लोकांच्या निदर्शनास आणला हे ठीक. परंतु ह्या प्रयोगाबाबत वस्तुस्थिती अशी आहे की इंग्रजीतील agree ह्या क्रियापदासाठी मराठीत सहमत असणे हे क्रियापद वापरले जाते. आणि इंग्रजीत आपण I agree with him आणि I agree with his views असे म्हणत असल्यामुळे मराठीतही ' मी त्याच्याशी सहमत आहे ' व ' मी त्याच्या विचाराशी सहमत आहे ' असे म्हणू लागतो. ' मी त्याच्या मताशी सहमत आहे ' असे कोणी मराठीत म्हणत असला तर त्याचा अर्थ इतकाच की बोलणाऱ्याच्या हिशेबी सहमत शब्दांतील ' मता'ला स्वतंत्र अर्थ नाही. अशा प्रयोगाबद्दल मन्त्री लोकांना डिवचण्याचे काहीच कारण नाही.

अनुक्रमणिका

## रा. श्री. जोग

श्री. संपादक,

महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका यांस,

माझ्या सा. पत्रिकेच्या १८६ व्या अंकातील ' शब्दवेधा 'च्या टिपणावरील प्रा. मेहेंदळे यांची टिपणे आपण माझ्या अवलोकनार्थ पाठविली याबद्दल आभारी आहे. मी ती टिपणे लक्ष ( लक्ष्य नव्हे ) पूर्वक वाचली. त्यामध्ये माझ्या टिपणांतील मी दाखविलेले बहुतेक शब्द, त्यांची रूपे किंवा प्रयोग हे मुळात तरी चूक आहेत हे त्यांनी मान्य केले आहे. विन्मुख आणि सन्मुख ही रूपे मूळ नव्हेत हे त्यांना मान्य दिसते. लय हा शब्द मुळात पुल्लिंगी आहे आणि अभिरूप शब्दाला mock चा अर्थ नाही हेही मान्य दिसते. मात्र हे सारे रूढ झाले असल्याने आता ते चूकही नव्हे आणि सुधारून घेण्याची आवश्यकता नाही असे त्यांचे म्हणणे आहे. ' रूढिर्बलीयसी' हे तत्त्व येथेही प्रभावी ठरते. आवर्त शब्द अद्यापि न. लिंगी झालेला नाही, तोवर त्याची दुरुस्ती व्हावयास त्यांची हरकत दिसत नाही. ' सहमत होणे,' याबाबत ते इंग्रजीचा आधार देऊन मराठीमध्ये चुकीचे प्रयोग का चालले आहेत, त्याचे संभाव्य कारण सांगतात; परंतु तसा प्रयोग बरोबरच आहे असे त्यांना म्हणावयाचे नसावे असे वाटते. मी मन्त्री लोकांना याबाबत डिवचले म्हणून मात्र ते नाराज दिसतात. मन्त्री लोक सारखे लोकांपुढे भाषणे करून हा प्रयोग रूढ करण्यास फार साहाय्य करितात, म्हणून त्यांचा उल्लेख केला. मेहेंदळे तसे करीत असते, तर त्यांचाही केला असता.

पण लक्ष व लक्ष्य याबाबतचे त्यांचे समर्थन पाहून मात्र मी चकित झालो. लक्ष हा शब्द न. लिंगी अकारान्त आहे आणि काही अशा अकारान्त शब्दांप्रमाणे त्याचे ' लक्ष्यांत ' हे सप्तमीचे रूप बरोबरच म्हणावे लागेल असे त्यांचे म्हणणे दिसते. उदाहरणे म्हणून ' फडक ' आणि ' कुत्र ' असे दोन शब्द त्यांनी उल्लेखिले आहेत. हे शब्द न. लिंगी आहेत, परंतु अकारान्त लिहिले म्हणजे अकारान्त ठरत नाहीत. कोशामधून ते एकारान्त दिलेले आहेत, अकारान्त नाहीत. त्यावरून लक्ष या शब्दाचे ' लक्ष्यांत ' हे रूप बरोबर ठरणार नाही. ' लक्ष ' यास अर्थदृष्टया जवळ येणारे मन, चित्त हे शब्दच घ्या, त्यांची रूपे ' मन्यात ' ' चित्त्यात ' अशी होत नाहीत. अंग, कंकण, गवत, बळ, नशीब, दैव, मूळ, लिंग इत्यादी असंख्य न. लिंगी अकारान्त शब्दांत सप्तमीचे रूप ' या 'कारान्त होत नाही. फडक आणि कुत्र हे शब्द अकारान्त नसून एकारान्त आहेत. द्राक्ष ( न. लिंगी ) याचेही ' द्राक्षांत ' असेच रूप व्हावयास पाहिजे.

हे मूळ वादविषयाबद्दल झाले. पण यावरून अनेक तात्त्विक विचार संभवतात. रूढीच्या जोरावर चुकीचे किती खपवून घ्यावे हा एक विचार, अशा रूढी बहुधा अज्ञानमूलक असतात. अज्ञानाला किती महत्त्व द्यावे, हा पुढचा विचार. प्रयत्नांनी रूढी बदलता येणार नाही का हा तिसरा विचार. हिंदी, इंग्रजी, फारसी यांच्या परिणामा-

मुळे आपणही तसेच चुकीचे लिहावे काय हा पुढचा प्रश्न. रूढ झाले असे केव्हा समजावे; त्या आधी तरी दुरुस्तीचे प्रयत्न करावे की नाही हा आणखी विचार. हे सारे आज या उत्तरात करणे योग्य आणि सोयीचे होणार नाही. म्हणून येथेच थांबतो.

**रा. श्री. जोग**

# स्वातंत्र्यशाहीर कवी गोविन्द



डॉ. वा. वा. दातार

गवळ्याच्या घरी वाढलेला एक असंस्कृत अडाणी ब्राह्मणकुमार कालीदेवीची उपासन करून तिच्या कृपेने पुढे कविकुलगुरु कालिदास म्हणून विख्यात झाला अशी कालिदासासंबंधी एक कथा प्रचलित आहे. ही केवळ दंतकथा आहे ह्यात शंकाच नाही, पण दरिद्री व अशिक्षित कुटुंबात जन्मलेला, तारुण्यात प्रवेश करीपर्यंत उनाड दोस्तांच्या संगतीत फक्त टिवल्याबावल्या करणारा, एक सामान्य गवंड्याचा पंगू मुलगा स्वातंत्र्यलक्ष्मीची व शारदेची मनोभावे उपासना करून 'स्वातंत्र्यशाहीर' म्हणून महाराष्ट्रात विख्यात झाला ही मात्र दंतकथा नसून सत्यकथा आहे... नाशिकचे कवी गोविंद–गोविंद त्रिंबक दरेकर हे ह्या कथेचे नायक !

गोविंद कवींचे घराणे मूळचे नगर जिल्ह्यातील कव्हेरपोखरी ह्या गावचे. उदरनिर्वाहाचे साधन शोधीत शोधीत त्यांचे आजोबा नाशिकला आले व जवळच्या सातपूर ह्या खेड्यातील एका मारवाड्याकडे खाजगी शिपाई म्हणून नोकरी करू लागले. गोविंदाचे वडील नाशिकला गवंडी काम करीत असत. ह्या अशिक्षित व गरीब कुटुंबात ९-२-१८७४ ह्या दिवशी गोविंदाचा जन्म झाला. गोविंद ५ वर्षांचा असतानाच त्याचे वडील मृत्यू पावले. लोकांची भांडी घासून, धुणी धुऊन मिळणाऱ्या पैशाने गोविंदाची आई त्याचे संगोपन करू लागली. गोविंद मराठी शाळेत जाऊ लागला, पण वयाच्या आठव्या वर्षीच त्याला जीवावरचे दुखणे झाले. आपल्या एकुलत्या एका मुलाची शुश्रूषा आनंदीबाईने अपार कष्ट करून केली. मुलगा वाचला, पण त्याचे हातपाय लुळे झाले. तो कायमचा पंगू झाला. त्याचे शिक्षण अर्थातच संपले. आजूबाजूच्या उनाड मुलांच्या संगतीत गोविंद कबुतरे उडविणे, पांढरे उंदीर पाळणे, डफ तबला वाजविणे इत्यादी गोष्टींत रमू लागला. मित्रांच्या पाठंगुळी बसून नाचतमाशे पाहण्यास जाऊ लागला. ऐकलेल्या शृंगारिक लावण्या गुणगुणू लागला आणि इतर तमासगिरांच्या लावण्या म्हणता म्हणताच

हौशिने करा मसि गेंद गेंद
घडवा हो बाजूबंद
बाजूबंद पायात साखळ्या

अनुक्रमणिका

मूद राखडी नथ पाटल्या
टुशी सरी आणीक बुगड्या
चिल्लोरी भरा मसि छंद छंद

अशा लावण्या स्वतः रचू लागला. गोविंदाच्या निसर्गसिद्ध कविशक्तीचा हा पहिला उद्गार होय! ह्या काळात त्याच्या मनोभूमीला ज्या प्रकारचे शिंपण मिळत होते त्याचा प्रभाव ह्या पहिल्या अंकुरात स्पष्ट दिसतो.

समानशील सोबत्यांच्या सहवासात असल्या मौजा करीत असताच गोविंद कातरकाम शिकला. लग्नमौंजीच्या मिरवणुकीसाठी शोभेच्या कागदी फुलांचे बाण करू लागला. पतंग करणे, मिरवणुकांसाठी रॉकेलचे हिलाल पुरविणे इत्यादी उद्योग करून थोडेबहुत पैसेही बसल्या बसल्या मिळवू लागला.

अशा तऱ्हेने आयुष्याची अठरा वर्षे गेल्यानंतर गोविंदाच्या जीवनात एक स्थित्यंतर घडले. आपली पहिली विऱ्हाडाची जागा बदलून तो तिळभांडेश्वर गल्लीत पांढरपेशांच्या वस्तीत येऊन राहिला. ह्या नव्या परिसरात स्वाभाविक जुन्या दोस्तांच्या जागी जरा बरे संस्कार असलेले नवे दोस्त गोविंदला लाभले. गप्पांचे विषय बदलले. करमणुकींची साधने बदलली. जरा वरच्या दर्जाच्या मनोरंजनाचे प्रकार सुरू झाले. तमाशापेक्षा नाटकावर अधिक प्रेम करणाऱ्या नव्या दोस्तांच्या सहवासाचा परिणाम गोविंदावर झाला व जरा झोकदार पोषाख करून मित्रांच्या पाठुंगळी बसून तो आता नाटके पाहू लागला. आपणही नाटक रचावे असे त्याला वाटू लागले, व ' मन्मथप्रवाह ' ह्या नावाचे नाटक लिहिण्यास त्याने आरंभसुद्धा केला. ही शुभ्रुभा शुभांगा! स्मरशी रंभा रजनी रमणा सौंदर्याने, कुरंगशिशुना निजनयनाने। मंदमंद मातंगगतीने लाजवील ही उरुने रंभा।' ह्या थाटाची पदेही त्यांनी लिहिली.

पण प्रारंभी जुन्या लावणीच्या थाटाची अशी रचना करणाऱ्या ह्या शाहिरावरील ' मन्मथप्रभाव ' लौकरच नष्ट झाला व तो ' देशाच्या अंगाला अंगार लागला असता शृंगाराला—लाथ मारणारी पारतंत्र्य दुःखाने तळमळणारी थोर क्रांतिकारकांची कवने तीच खरी कविता ' ह्या श्रद्धेने ' शृंगाराला दूर सारी परि वीररसा स्वीकारी ' अशी वीराची कविता लिहू लागला.

गोविंद कवीच्या मनोवृत्तीत हे जे क्रांतिकारक परिवर्तन झाले त्याचे श्रेय १८९८ च्या प्लेगानंतर नाशिकला तिळभांडेश्वराच्या गल्लीत राहण्यास आलेल्या व पुढील काळात केवळ महाराष्ट्रीयच नव्हे तर भारतीय देशभक्तांत व क्रांतिकारकांत अग्रेसर झालेल्या विनायकराव सावरकरांनाच द्यावे लागेल. त्यांच्या तेजस्वी व्यक्तिमत्त्वाचा, कुशाग्र बुद्धिमत्तेचा, उद्यमशीलतेचा व विशेषतः प्रखर स्वातंत्र्यप्रीतीचा प्रभाव ह्या रहाळातील अनेक समवयस्क तरुणांप्रमाणेच कवी गोविंदांवरही तीव्रपणे पडला.

एरवी ज्यांची जीवने निरर्थ, क्षुद्र, केविलवाणी व खुरटी झाली असती त्यांच्या जीवनात सावरकरांच्या सहवासाने नवा अर्थ, नवा जोम आला. आपला सर्वांगीण विकास व्हावा व देशाच्या स्वातंत्र्यासाठी व हितासाठी त्यांचा विनियोग व्हावा अशी महत्त्वाकांक्षा ह्या तरुणांच्या मनात स्फुरू लागली. सावरकरांनी स्थापिलेल्या मित्रमेळ्यात ही मंडळी सामील झाली. गोविंद कवीही ह्या संस्थेत आला व त्याचा इष्ट तोच परिणाम झाला. आतापर्यंतच्या ख्यालीखुशालीच्या जीवनाला त्याने रामराम ठोकला व तो स्वदेशाचा विचार करू लागला, विद्येचे महत्त्व ओळखून लेखन-वाचनात गढून जाऊ लागला. आत्मनिरीक्षण करून अंगी असलेल्या गुणांचा विकास करण्यासाठी धडपडू लागला व वर उल्लेखिल्याप्रमाणे ' वीरा कविता ' लिहू लागला.

' संपूर्ण स्वातंत्र्य ' हे मित्रमेळ्याचे ध्येय होते व सशस्त्र क्रांतीशिवाय हे ध्येय साध्य होणार नाही अशी त्याची श्रद्धा बनली होती. ह्या ध्येयानुसार जनतेत उत्कट स्वातंत्र्य-प्रेम निर्माण करून अनुकूल वातावरण तयार करण्याचा प्रयत्न ह्या संस्थेने चालविला. राष्ट्रवीरांचे व धर्मवीरांचे उत्सव साजरे करून जनतेचे राष्ट्रप्रेम आणि धर्मप्रेम जागृत करण्याचा उपक्रम सुरू झाला. पंगू शरीराचा पण समर्थ मनाचा हा कवी आता स्फूर्ति-दायक कवने रचून मनाने पंगू झालेल्या जनतेत चैतन्य निर्माण करू लागला. परवशते-मुळे लाजिरवाण्या स्थितीत जिणे जगणाऱ्या लोकांचा स्वाभिमान जागृत करण्यासाठी व नव्या पराक्रमांना हुरूप निर्माण करण्यासाठी कवी विनायकाप्रमाणेच तो आपल्या भूत-कालीन पराक्रमाचे पोवाडे गाऊ लागला. जे उघड बोलता येईना पण बोलल्याशिवाय राहवेना ते तो ऐतिहासिक व पौराणिक प्रसंगांच्या वर्णनाद्वारा बोलू लागला. स्वाभाविक-पणेच ' दास्यान्तक त्या शिवसिंहाच्या बाळघर छाव्यांना ' अफझलखानाच्या वधाची कथा सांगून ' उठा आले स्वातंत्र्यपर्व रणि चलाच स्नानाला ' असे आवाहन मिळाले. जावळीचे चंद्रराव मोरे व संभाजी कावजी ह्यांच्या संवादातून '

' अर्जांनि चोर जरि पळते ।
श्रीराम अर्ज तरि करिते ।
युद्ध का होते ? स्वातंत्र्य मिळण्यास्तव ते ?
असा प्रश्न ऐकण्यास मिळाला. शिवकालीन होलिकामहोत्सवातील.

निजदेशाच्या, सद्भाग्याच्या स्वातंत्र्याच्या चोरांची, छेदुनि मुंडे रचिली होळी थोर नगाच्या साम्याची.

पुढे उडाला रिपुरक्ताचा रंग चांगला पंचमिला.

त्यासह सरला परवशतेचा गमे रंग हो लोकांला ।

झाल्या कुस्त्या पाहा शेवटी समर कड्यांमधि बहूपरी गुलाम जन ते स्वतंत्र होउनी बसले अरिच्या उरावरी.

असे ' मंगल विहार ' बघता आले.

संपूर्ण स्वातंत्र्य हे ध्येय व सशस्त्र क्रांति हे साधन हा विचार जनमनात पक्का ठसविण्यासाठी गोविंदाने वरीलप्रमाणे ऐतिहासिक प्रसंगाचा जसा उपयोग करून घेतला तसाच तो पौराणिक प्रसंगाचाही केला. आपल्या ध्येयाकांक्षेला व साधनाला फार मोठी प्रतिष्ठा व पवित्र परंपरा आहे असेच जणू त्याला दाखवायचे होते.

' रावण विभीषण संवाद ! ' ' अंगदशिष्टाई ' ' यमाचा दरबार ' इत्यादी कवनांतून गोविंदाने अन्यायी, जुलमी परसत्तेला उखडून टाकण्यासाठी काय केले पाहिजे हे सुचविले व अन्यायाविरुद्ध निकराने सामना देण्यास जनतेला प्रवृत्त केले. ' अंगद शिष्टाई 'त.

कोठे ? काळा काळा राम रे, करितो बंड गुलाम.
नम्र होउनि अर्ज लिहूनी करूनी मज प्रणाम रे ।
कोणकोणते हक्क मागतो तुझा नाथ तो राम रे ?

असा प्रश्न रावणाने विचारल्यावर अंगद जे उत्तर देतो ते ह्या दृष्टीने उल्लेखनीय आहे. तो म्हणतो,

' अर्ज नव्हे तरवार धाडिली त्याने करण्या साम रे ।
आर्यमही ती सोड म्हणे तुज धनुर्धारि श्रीराम रे ।
कितीक जणाला दाविशील तू मुर्खा बंदीधाम रे ।
बंदीतूनचि तरवारी त्या रणी शिरतील वेफाम रे ।

साधारणतः १९१० पर्यंतच्या ह्या काळातील गोविंदांची कवने म्हणजे स्वातंत्र्य-प्रीतीच्या व देशभक्तीच्या ज्या एकमेव भावनेने त्यांचे अवघे चित्त व्यापले होते, भारले होते त्या उत्कट भावनेचाच स्वाभाविक व सरस आविष्कार होय. नाना रूपांनी, विविध मार्गांनी ही त्यांच्या अंतःकरणातील धगमग प्रकट होऊ लागली व अनेकांची अंतःकरणे पेटवू लागली.

' शौर्याग्ने तुझिया जपाना स्वातंत्र्यांकुर फुटले आमुच्या आशावल्लींना '

अशा शब्दात आपल्या पराक्रमाची चुणुक दाखविणाऱ्या जपानचे स्तवन करून तर कधी ' वाहवा ' ! साधुवृत्ति ' असे म्हणून स्वकीयांची कानउघडणी करून कधी ' रामाच्याच समान अमुचे इंग्रज नितिमान ' अशी व्याजस्तुती करून तर कधी बोधपर पुरातन मौज दाखवून

जलात माते बुडवायची असेल युष्मन्मनीषणा ।
तरी बुडवी वा राष्ट्ररिपूंची रक्ततरंगिणी तरताना ।

अशी प्रतापराव गुजराची मरणाची प्रार्थना ऐकवून कवी गोविंदाने विनायकाप्रमाणेच जनतेत जे विचार, जे भाव, ज्या मनःप्रवृत्ती जागृत होत होत्या त्यांना तोंड फोडिले.

' स्वातंत्र्य सकल सुखविधि समर्पूनी कधी पुरवशील काम '

अशी आर्तस्वराने भगवंताजवळ प्रार्थना केली व अखेरीस ' रणावीण स्वातंत्र्य कोणा मिळाले ? असा खडा सवाल विचारुन ' स्वराज्येच्छूने पाहिजे युद्ध केले ' हा संदेश निर्भयपणे दिला आणि जनतेच्या स्वातंत्र्यप्रीतीला कारागृहात डांबून ठेवू पाहणाऱ्या दडपशाहीला

' शोभे यशाची यशवंत माला । ती शृंखला चुंबुनी यत्पदाला ।
देवालयत्वा धरी बंदीशाला कारागृहाचे भयकाय त्याला ? ।
जाचा खलांनो ! मृगराज बाला । घाला चला बंदित पावकाला ।
यांच्या पुढे व्याल उपायनाला । कारागृहाचे भय काय त्याला ?

असा धीरोदत्त प्रश्न विचारुन जबाब दिला. गोविंदाची ती कविता वाचल्यानंतर सावरकरांच्या ' माझे मृत्युपत्र ' व कुसुमाग्रजांच्या ' गर्जा जयजयकार क्रांतिचा ' ह्या ओजस्वी कवितांचे कोणास स्मरण होणार नाही ? गोविंदांची असली कवने सरकारने अर्थातच जप्त केली.

पारतंत्र्याच्या जाणिवेने गोविंदांचे हृदय कसे पोळत होते व स्वातंत्र्यासाठी कसे तळमळत होते ह्याची साक्ष त्यांची प्रत्येक कविता देते असे म्हटले तरी चालेल. स्वातंत्र्यावर इतक्या मनापासून प्रेम करणारा गोविंदासारखा दुसरा कवी फक्त सावरकरच !

' स्वातंत्र्य लक्ष्मीस्तवात ' स्वांतर त्वन्मय बनले ।
हृदय विदारुनि जननि बघावे ।
मग राज्यक्रांतीच्या सदये । रक्तोत्पलातुनी उद्भूत व्हावे । '

असे जेव्हा तो म्हणतो तेव्हा नंतरच्या काळात केवळ लोकप्रिय ठरली म्हणून ज्यांनी स्वातंत्र्यप्रीती वा देशभक्ती आपली म्हटली अशा कवींच्या स्वातंत्र्यगीतां ( ! ) पेक्षा गोविंदांची स्वातंत्र्यसूक्ते कशी वेगळी आहेत हे लक्षात येते.

केवळ कवने करुनच गोविंद कवीने आपली स्वदेशप्रीती व्यक्त केली असे म्हणता येणार नाही. मित्रमेळ्याच्या कार्याचा ' अभिनव भारत ' ह्या संस्थेच्या रूपाने विस्तार होण्यासही त्यांचे श्रम कारण झाले. नाशिक हे ह्या चळवळीचे केंद्रस्थान. तेथील कार्याची बरीचशी जबाबदारी कवी गोविंदांवर होती. ही कामगिरी त्यांनी इतकी चोख बजाविली की, त्यांच्या सहकाऱ्यांनी त्यांना अभिनव भारताचा बुवा अशी विनोदगर्भ पण यथार्थ संज्ञा दिली.

अभिनव भारताची चळवळ अधिकाधिक प्रभावी होऊ लागली. स्वदेशी, स्वराज्य, बहिष्कार, राष्ट्रीय शिक्षण ह्यांचा धडाक्याने प्रचार होऊ लागला. हळूहळू वातावरण तापू लागले, दडपशाहीचा वरवंटाही जोराने फिरू लागला.

अनुक्रमणिका

१९०७ मध्ये नासिकला 'वंदेमातरम्'चा खटला झाला. बंगाल्यात बॉम्बस्फोटाचा धडाका सुरू झाला. लो. टिळकांना १९०८ मध्ये शिक्षा झाली. हे वृत्त कळल्यावर 'अमुचा वसंत कोणी नेला' ही कविता लिहून गोविंद कवीने जनमनातील हळहळ व्यक्त केली. पण ह्यापेक्षाही तीव्र हळहळ वाटण्यासारखा प्रसंग कवींवर आला. श्री. बाबाराव सावरकर ह्यांच्यावर खटला भरला व बादशहाविरुद्ध बंड करण्याच्या आरोपावरून त्यांना जन्मठेपेची सजा दिली गेली. गोविंद कवींची कविता प्रकाशित केली हे निमित्तही शिक्षा देताना पुढे करण्यात आले. गोविंद कवीला ह्याचा मनस्वी खेद झाला. नाशिकला जॅक्सनचा खून झाल्यानंतर तर सरकार पिसाटासारखे वागू लागले. संशयावरून अनेकांचा छळ झाला. गोविंद कवीने ह्या दुर्धरप्रसंगी सहकाऱ्यांना नाना प्रकारे साहाय्य केले. खटल्याचा निकाल लागल्यानंतर तुरुंगात गेलेल्या सहकाऱ्यांच्या कुटुंबियांची व्यवस्था लावणे, हताश झालेल्या मित्रपत्नींना धीर देणे ही कामे त्यांना करावी लागली. खटल्यात त्यांनाही गोवण्याचा सरकारचा इरादा होता, पण जॅक्सन खुनाच्या वेळी ते इतके आजारी होते की, त्यांना त्या प्रकरणी गोवणे शक्यच झाले नाही.

जॅक्सन खून प्रकरणानंतर नाशिकवर अवकळाच आली. सर्वत्र भीतीचे, संशयाचे व दहशतीचे वातावरण निर्माण झाले. कवी गोविंदाचे मन निराश झाले. आपल्या कवितांमुळे सावरकरांना शिक्षा झाली ह्या कल्पनेने ते कष्टी झाले. कविता लिहिण्याचे त्यांनी टाकून दिले. सर्वस्वी प्रतिकूल परिस्थितीच्या गारठ्याच्या कडाक्यात हा स्वातंत्र्यकोकिळ मूक झाला. परमार्थ विचाराकडे व तत्त्वज्ञानाकडे त्यांचे मन वळले. ज्ञानेश्वरी, तुकोबाची गाथा, विवेकानंदांचे ग्रंथ ह्यांचे अध्ययन सुरू झाले. ध्यानधारणा सुरू झाली. नाशिक शहर तर निश्चेष्टच झाले. इतके की, १९१४ मध्ये तुरुंगातून सुटून आल्यावर लो. टिळक नाशिकला आले, त्या वेळी त्यांचे प्रकट स्वागतही झाले नाही. पण १९१७ च्या बेताला नासिक शहर ह्या मूर्च्छेतून सावध होऊ लागले. पुन्हा हालचाल सुरू झाली. नव्या उत्साहाचा वसंत अवतरला व मित्रांच्या आग्रहाने कवी गोविंदांचे कूजन पुन्हा सुरू झाले. ह्या काळात त्यांनी रचलेल्या कवितांतील उल्लेखनीय कविता म्हणजे लोकमान्य टिळकांच्या षष्ट्यब्दिपूर्तीनिमित्त रचलेली भूपाळी व सरस्वतीची भूपाळी या होत. ह्या दोन्ही कवितांत त्यांनी योजलेली रूपके मनोहर आहेत.

> आत्मवेलीच्या स्फूर्तिफुलांवर वसंत जे विकसती ।
> बुद्धीचे । वसंत जे विकसती ।
> त्याच वसंता तदिय विकासा । सरस्वती बोलती ।।
> विश्वकाव्य वाचीत बैसली चित्तमयुरावरी ।
> दीप्ति जी । चित्तमयुरावरा ।
> त्या दीप्तीला त्या शक्तीला वदती वागीश्वरी ।।

असे सरस्वती वर्णन कवी करतो.

लोकमान्य टिळकांविषयी कवीला वाटणाऱ्या आदराला व भक्तीला जर कशाची जोड असेल तर ती शिवाजीमहाराजांविषयी त्याला वाटणाऱ्या आदराची व भक्तीचीच होय. टिळकांच्या कार्याचे व योग्यतेचे अतिशय यथार्थ वर्णन कवीने पुढीलप्रमाणे केले आहे. लो. टिळकांवर सुंदर उपमांची व रूपकांची फुले उधळीत तो म्हणतो—

> ' टिळक नव्हे हे श्रीगीतेचे हृदय प्रकट जाहले।
> ज्ञानमय हृदय प्रकट जाहले।
> कर्मयोग तो शिकवायाला आर्यजनी धावले '

ह्या देशभक्तीपुढे

> ' असंख्य तरवारींचे मुजरे झडावे ' असे त्याला वाटते आणि
> ' मुक्या मनाने किति उधळावे शब्दांचे बुडबुडे।
> तुझ्यावर शब्दांचे बुडबुडे।
> तुझे पवाडे गातिल पुढती तोफांचे चौघडे। '

अशी भविष्यवाणी त्याला स्फुरते.

' प्रभु या एका खांद्यावर उभी महाराष्ट्र द्वारका ' ह्या एका ओळीत लो. टिळकांच्या अद्वितीय नेतृत्वाचे कवीने जे प्रभावी चित्र उभे केले आहे ते अपूर्व आहे.

' देशाचा पालनवाला ' ह्या कवीतेत शिवछत्रपती, रामदास व तुकाराम व ह्यांच्या-संबंधी अशीच उत्कट आदराची भावना त्यांनी प्रकट केली आहे.

उत्कट देशाभिमान व स्वातंत्र्यप्रीती ही गोविंदांच्या अंतःकरणातील स्थायी भावना आहे. त्यांचे काव्य म्हणजे क्रांतीचा उद्गार व स्वातंत्र्याची सूक्ते. पण वीररसप्रधान स्वातंत्र्यगीते एवढेच त्यांच्या काव्याचे स्वरूप आहे असे मानणे आणि केवळ स्वातंत्र्या-गीतावरूनच त्यांच्या काव्यसौन्दर्याचे व्यक्तिमत्त्वाचे व तत्त्वज्ञानाचे संपूर्ण दर्शन झाले असे मानणे योग्य होणार नाही. त्यासाठी ' श्रीकृष्णजन्मोत्सव ', ' पक्षिदूत ', ' प्रीति-देवीचा उत्सव ' व विशेषतः ' मुरली ' आणि ' तनुक्रांतिगीत ह्या काव्याकडे आपणास वळले पाहिजे. ह्या गीतातील नादमाधुर्य, उत्तुंग कल्पना व उत्कट भावना मनोहर आहेत.

' गा कवे। स्फुर्तीची राष्ट्रगींते नवी।
लोकहृदयांतरी वीररस नाचवी।

नाचवी तरुण ते चमकवी तेज ते हिंदभू वांछिते विसंगत स्वातंत्र्य ते। ' ह्या वृत्तीतून निर्माण झालेल्या गोविंदांच्या कवितेत असिलतेचे तेज आहे. तर ' मुरली ' व ' सुंदर मी होणार ' ह्या गीतात काव्यलतेची कोमलता आहे.

अनुक्रमणिका

'देवा देवा। मी। मी देऊळ तुमचे।
बांधिले करुणा काव्याचे। त्यावरी चित्रे।

चित्रे दुःखाची। कोरिली रडत्या हृदयाची.

'प्रभो तुज कळते। कळते पूर्णपणे। जीवविहगाचे चिवचिवणे।
प्रभो तुज कळते।कळते निःशब्द। स्फुन्दणे श्रद्धेचे मुग्ध।'
'प्रीतीची भिक्षा। भिक्षा मागाया। हिंडलो जगाजवळ वाया।
मला जग कळले। कळले ते स्वार्थी भिकारी मजसम प्रेमार्थी.'

ह्यासारख्या करुणरम्य पंक्ती वाचताना वाचक आनंदित होतो व उदासही होतो. ह्या 'विकलांग' भिकाऱ्याचे' आर्त स्फुंदणे त्याला समजते व विव्हल करते. प्रभूला शरण जाऊन हा कवी त्याच्या स्वागतासाठी सिद्ध होतो, पण आत्मनिष्ठ भावना व व्यक्तिगत दुःख आणि आपली वेदांतप्रवणता व्यक्त करीत असताही स्वातंत्र्यप्रीतीचा नंदादीप त्यांच्या हृदयात तेवत आहेच. म्हणूनच तो म्हणतो—

सलामी द्याया। द्याया तुज भूपा।
आमुच्याजवळ नाही तोफा।
झडाया मुजरे मुजऱ्यांची फैर।
आमुच्या जवळ न दलभार।
प्रभू रे आम्ही। आम्ही परतंत्र।कशाचे नाही स्वातंत्र्य।

खास स्वतःचें असे त्यांचे हृदयस्थ भाव, त्यांची मनोव्यथा, त्यांचा आनंद व एका दृष्टीने त्यांचे संपूर्ण अंतरंग जर कोणत्या गीतात प्रकट झाले असेल तर ते त्यांच्या तनुक्रांतिगीतात. मृत्यूपूर्वी क्षयासारख्या रोगाने तीन वर्षे गोविंद कवी झिजत होते. शरीराच्या व मनाच्या यातना असह्य होत होत्या. मृत्यू नजिक येऊन ठेपल्याची जाणीव कवीला झाली. पण कवीला मृत्यूचे भय वाटले नाही. उलट 'सुंदर मी होणार' असेच त्याला वाटले व त्याने मृत्यूचे आनंदाने स्वागत केले. आयुष्यभर मूकपणाने सहन केलेले पंगूपणाचे दुःख आनंदोद्गारातून व्यक्त केले. आपल्या अतृप्त इच्छाआकांक्षांना प्रथमच वाचा दिली.

'सुन्दर मी होणार' आता मरणाने जगणार। माझा मृत्यू माझा सारा अश्रुपूर गिळणार,

जुनी इंद्रिये जुना पिसारा सर्व सर्व झडणार,
नव्या तनूचे, नव्या शक्तिचे पंख मला फुटणार.
या जन्मी मला मोद लाभला नाही, अनिवार.

खेदच झाला पण आता मृत्यू म्हणजे वसंत माझा मजवरती खुलणार, तनुक्रांती

होणार' ह्या करुणरम्य शब्दांत त्यांनी करुणाघन मरणाने त्यांना होणाऱ्या अलौकिक आनंदाचे वर्णन केले.

पण कवी गोविंदांसारख्या स्वातंत्र्य शाहिराला जो आनंद होणार तो सामान्य माणसांना त्यांच्या सामान्य दुःखाचा परिहार व सामान्य सुखांची प्राप्ती ह्यामुळे होणाऱ्या आनंदासारखा असणे शक्य आहे काय ? गोविंदाला मृत्यू प्रिय वाटतो, कारण मृत्यू त्याला नवे ओज, नवे तेज देईल व मग तो

'भूमातेला हुडकुन काढुन तद्दर्शन घेणार,
उडत उडत मग, रडत रडत मग प्रभुपाशी जाणार.
स्वतंत्र तिजला करा म्हणूनी तच्चरणी पडणार'
आणि 'परवशतेचे जाल तोडूनी उडवूनी तिज नेणार.'

शनिवार ता. २८ फेब्रुवारी १९२६ ह्या दिवशी स्वातंत्र्यसूर्याचे सारथ्य करणारा हा पंगू अरुण हसत हसत मरणाधीन झाला.

मृत्यूपूर्वी पंधरा दिवस रचलेली वरील कविता म्हणजे त्याने आमरण केलेल्या स्वातंत्र्यपूजेच्या समाप्तीची मंत्रपुष्पांजलीच होय.

## रत्नमालेव राजते

शिवाजी मातृभाषायाः ।
'मालाकारे'ति विश्रुतः ॥
जनको नैकसंस्थानाम् ।
विष्णुशास्त्रिन्, विराजसे ॥ १

विष्णुपादात् यथा गङ्गा ।
निःसृता लोकपावनी ॥
गद्यगङ्गा विष्णुशास्त्रिन् ।
तथा ते मुखपद्मतः ॥ २

निबन्धमाला भवतः ।
वाङ्मयी मूर्तिरुत्तमा ॥
रुचिरा रत्नमालेव ।
मनोज्ञा नित्यनूतना ॥ ३

—नी. शं. नवरे

अनुक्रमणिका

# ग्रंथ परीक्षण

## बखर : एका राजाची

लेखक : त्र्यं. वि. सरदेशमुख,
मौज प्रकाशन, मुंबई ४, किंमत ११ रु.

### (१) प्रा. सरदेशमुखांचा साहित्य संसार :

'ससेमिरा' या दीर्घकथेने प्रा. सरदेशमुखांनी आपल्या वाङ्मयीन संसारास प्रारंभ केला असला तरी 'वैशाख' या नावाखाली 'अभिरुचि' मासिकांतून त्यांचे काव्य-लेखन चालू होते. तथापि 'उत्तररात्र' हा त्यांचा छोटासा काव्यसंग्रह प्रकाशित होईपर्यंत वैशाख म्हणजेच सरदेशमुख ही हकीकत त्यांच्या विशेष परिचिताखेरीज अन्य कोणास ठाऊकही नसावी. मात्र उमेदवारीच्या काळातील त्यांच्या प्रतिभेची कविप्रकृती आधुनिक मराठी कवितेचा अन्वयार्थ शोधू पाहणाऱ्या 'अंधार यात्रे'त व राम गणेशांच्या 'संसार नाटका'त विशेष जोमाने बहरली. वाङ्मयसमीक्षेच्या कोंड्या क्षेत्रात' उपऱ्या गौऱ्याचा बोजवारा 'छिलून-तासुन' नसत्या व्यंगांची काल्पनिक वाळवी खरवडून काढणारी सरदेशमुखांची समीक्षा पद्धती अभ्यासकांचे लक्ष वेधून घेत असतानाच 'बखर : एका राजाची' ही त्यांची कादंबरी प्रकाशित झाली. अर्थातच तिच्यात सरदेशमुखांच्या वाङ्मयीन प्रकृतीचे सारे गुणदोष एकवटलेले असावेत यात अनपेक्षित असे काहीच नाही.

### संस्थान साइखेड :

कोल्हापूर, सांगली, मिरज या संस्थानांच्या दक्षिणेला महाराष्ट्र, कर्नाटक, मराठवाडा यांच्या सीमारेषेवर सोलापूर-विजापूर रस्त्यावर असणाऱ्या संस्थान अक्कलकोटच्या आसपास सरदेशमुखांचे साइखेड यावे. जत, लच्याण, माजनहळ्ळी आणि घटप्रभेच्या उत्तर किनाऱ्यापर्यंतचा मुलूख यांचे उल्लेख प्रसंगवशात येतात त्यावरून महाराष्ट्राच्या नकाशावर संस्थान साइखेडचे अक्षांश रेखांश सहज दाखविता येतील. साइखेड म्हणजे अक्कलकोट अशी मनोमय खुणगाठ परिचितांनी मनाशी खुशाल ठरवावी पण ऐति-हासिक वस्तुस्थिती आणि वाङ्मयीन सत्य यांतील लक्ष्मणरेषा नजरेआड होऊ देऊ नये.

वरुणा नदीच्या काठावर वसलेले साइखेड संस्थान. राजवाडा हा केंद्रबिंदू. राजवाड्या-मागे उतरणीखाली केसरओढा. तो गावाबाहेरून उत्तरेकडून खंडोबाच्या देवळामागून वाहात गेलेला. ओढ्यापलीकडच्या घनदाट जंगलातून मोरांचा टाहो, रात्रीच्या प्रशांत समयी राजवाड्यातही सहज कानी यावा. राजवाड्यामागील डोंगरावर वेताळ मंदिर. दक्षिणेस पसरलेले मैदान. स्टेशन रस्त्यावर लीला–कमळा ही सरोवरांची आवळीजावळी जोडी. साइखेडापासून अडीच तीन मैलांवर तारकेश्वरीच्या जंगलाच्या सीमेवर एक त्रिपुरांतकाचे व दुसरे देवीचे अशी दोन पुरातन देवालये.

खुद्द साइखेड संस्थान आखीव रेखीव. ब्राह्मण आळी, मानकरी पेठ, हत्तीबाग, खासबाग, सिद्धमठ, आवळीबन, उत्तरेची वेस ही त्या गावकुसातील स्थलनामे त्याची रचनात्मक मांडणी डोळ्यासमोर सहज उभी करू शकतील इतकी बोलकी आहेत. या प्रादेशिक वातावणात फसफसून आलेले राजकारण म्हणजे त्या मातीचा प्रकृतिधर्म आहे. उत्तरेकडील वेशीवर किंवा देवळाच्या भिंतीवर समशेरबहाद्दराने फडकविलेल्या जाहीरनाम्यावर विरुद्याच्या उलट्या बाहुल्यांचा नटनाच चाललेला दिसावा. अक्कलकोट-हून आलेल्या कापडी पार्सलातील नवनाथाच्या पोथीत देसायांना विषारी साप आढळावा किंवा खासबागेत कोण्या बुरखाधारी माणसाने विषाचे पाणी पाजलेल्या फरशीचा प्रहार रंगनाथावर करावा ही कपट कारस्थानं एतद्देशीय संस्थांनी वातावरणाशी सुसंगत म्हटली तरी राजसाला आणि तिच्या मावशीला भिवविण्यासाठी राणीसरकारच्या हितचिंतकांनी देवीच्या कोपाचे रचलेले नाटक आणि देसायावर दबाव आणून सव्यापसव्य मार्गाने त्यांचे चारित्र्यहनन करून त्यांना देशोधडीला लावण्यासाठी केलेले कपटकारस्थान म्हणजे एका विशिष्ट प्रादेशिक संस्कृतीचे शबल दर्शनच होय. साइखेडचा 'भूगोल' ध्यानी घेतल्याशिवाय ह्या इतिहासाचा गुंता सुटणार नाही. थॉमस हार्डीच्या 'वेसेक्स' गटातील कादंबऱ्यांबद्दल म्हटले जाते – "Wessex is not a geographical entity; it is a special element, an enveloping ether, in which the world of the book has its being" ( The Novel : Elizabeth Drew ) संस्थान साइखेडच्या संदर्भातही असेच म्हणावे लागेल.

'साइखेड' म्हणजे कळसूत्री बाहुली. ज्ञानेश्वरांनी 'साईखेडेनी कां प्रार्थवें। सूत्र-धाराते' ( अ. ९.३० ) असे म्हटले आहे. सरदेशमुखांनी मांडलेल्या संस्थानाच्या पटावर राजा व राजस यांच्या भोवती वावरणारी पात्रसृष्टी अशीच कळसूत्री कठ-पुतळ्यांची आहे. दैवी संपत्तीने युक्त अशा सज्जनांचा एक मेळावा तर आसुरी गुणांची उपासना करणारा दुर्जनांचा दुसरा मेळावा. अशी ही एकसुरी व एकरंगी व्यक्तिचित्र-णाची पद्धती प्रा. सरदेशमुखांनी का स्वीकारली ? संस्थानाच्या रंगमंचावर मांडलेल्या या लीलानाटकाचा सूत्रधार 'तो काइ बाऊलेयांचा काजा नाचवी ?' हे तर त्यांना सिद्ध करावयाचे नसेल ? रघुराजाच्या वाट्याला आलेले त्रुटित, विद्ध आणि शापित जीवन

पाहून त्यांनी स्वतःच 'उत्तररात्री'त कवी वैशाखाच्या मुखाने विचारल्याप्रमाणे –

'असुंदराच्या गवसणीत
गुदमरुन सुंदरास,
अमंगळाचे रोगण
फास फासून मंगळास
अनीप्सित मूढतेचे
आणि करंट्या कर्तव्याचे
हिजडे पैंजण पायी बांधून
कोणाच्या विनोदनार्थ
कोणाच्या डोळ्यांचे पारणे फिटाया
जगताच्या या
लुप्तहर्ष रंगभूमीवर
कोण नाचवीत आहे आम्हांस ?

असाच सवाल या बखरीतील राजासकट सर्व पात्रांचा आहे. या प्रश्नांचे उत्तर शोधणे म्हणजे या कादंबरीचा रचनाबंध उलगडून पाहणे होय.

बखरीला जोडलेल्या प्रास्ताविकात प्रा. सरदेशमुख ह्या कादंबरीला 'राजकुळातल्या एका स्मृतिशेषाची कहाणी' असे म्हणतात. मात्र तेवढ्यावरुन ह्या कादंबरीत प्राचीन बखरीचा आकृतिबंध शोधू पाहणे किंवा कहाणी वाङ्मयाची लक्षणे कितपत आढळतात याचे संशोधन करणे म्हणजे तर्कदुष्ट टीकेचाच एक प्रकार म्हणावा लागेल.

खुद्द खुराजांच्या तोंडून ही कथा वदविताना सरदेशमुखांना कादंबरीसाठी रोज-निशीवजा रचनाबंध स्वीकारावा लागला. राजाच्या हृदयाविष्करणाला गहिऱ्या आत्म-निष्ठेचे रंग चढविण्यासाठी गतस्मृतींचा चित्रपट त्याच्या डोळ्यासमोरुन तरळून गेलेला सरदेशमुख दाखवितात तेव्हा आपणही त्याचे साक्षी होतो. सरदेशमुखांच्या 'ससेमिरा' या कादंबरीचे लेखनही याच तंत्रात बसणारे आहे. आत्मनिवेदनासाठी तयार झालेली ती नायिका म्हणते 'सांगायचंच तर अगदी सुरुवातीपासून सांगते सबंध कुळकथा. नाही तरी कुणाजवळ तरी बोलायचंच होतं मला. या जगातून त्या जगाकडे प्रवास करताना हलकं हलकं वाटेल एकदा मन मोकळं केल्यानं. एवढ्या मोठ्या पर्यटनाला निघाल्यावेळी ही असली ओझी तरी काय करायचीत घेऊन ?'...वस्तु-स्थिती अशी आहे की, आपल्या उनाड प्रियकराला पहिलं अन् शेवटचं पत्र लिहून ठेवणाऱ्या त्या कोण्या 'अज्ञात स्त्रीची स्टिफन झ्वाइगने सांगितलेली ती अमर, करुण कहाणी प्रा. सरदेशमुखांच्या भावजीवनात अढळ स्थान मिळवून बसली आहे. त्यामुळे 'His very life was a lyric tragedy' असे ज्या बायरनबद्दल म्हटले जाते त्याच्याप्रमाणे ज्या बखरीतील राजाचे जीवनचरित्र घडले ते त्याच्याच तोंडून वदविणे

सरदेशमुखांना अटळ ठरले. आपल्या जीवनचरित्रातील 'मुस्कटदावीच्या' आणि 'बदकिस्मतीच्या' हळव्या कथा राजा जेव्हा कडवट जिभेने गातो तेव्हा इटालियन कवी डान्टे याच्या करंट्या जीवनाचे चित्रण करताना तो 'डिव्हाइन कॉमेडी' हे आपले जगद्विख्यात काव्य लिहिण्यास उद्युक्त का झाला ह्याचे स्पष्टीकरण देताना विल ड्युरान्टने काढलेल्या उद्गारांची आठवण होते – 'This bitter world was unbearable except, as Nietzsche would phrase it, to the red eye that consider it dramatic and esthetic spectacle, to look at it as a scene to be pictured would take some of its sting away.' 'बखरी'च्या नायकाचे व्यथित जीवन म्हणजे दुर्दैवाच्या दशावताराचे 'लीलानाटक' कसे होते हे त्याच्या तोंडून वदविताना सरदेशमुख लिहितात – 'जाणूनबुजून दिल्या धडका बुरुजाला आणि छिनून घेतला टवका टवका. रात्र रात्र वितळून गेली हंड्या झुंबरांच्या साक्षीनं. रांजणाच्या तळाशी साचत राहिला प्राक्तनाचा गाळ आणि भविष्याच्या दिशा देखोदेखी भेगाळून गेल्या.' (पृष्ठ : १६८) अटळ नियती त्याला आत्मदहनाचा रस्ता दाखविते. या दारुण शोकांतिकेतील अनुभवकथन प्रथमपुरुषी एकवचनात सादर करीत असताना राजा आपल्या आठवणींना जणू विनवितो, 'so choose and speak for me, ye memories and at least give some reflection of my life before it sinks into the dark! (The World of Yesterday : Stefan zweig)

## व्यामिश्र जीवनदर्शन

सरदेशमुखांनी राजाच्या चित्रणातून आपला अस्तित्वानुभव, त्याशी संगत असलेले जगदस्तित्व व त्यांच्या संबंधातून निर्माण झालेले जीवनचिंतन यांचे आविष्करण केले आहे. त्यांची 'बखर' एका अंगाने व्यक्तींचे मनोमंथन करीत विकसू पाहते, व दुसऱ्या अंगाने नैतिक-आत्मिक समस्यांचे उलट-सुलट फासे मांडून संसाराचा सारीपाट विकट कसा आहे याचे दर्शन देऊ पाहाते. अस्तित्ववादाकडे झुकलेल्या कादंबरीच्या नायकाला राजससारख्या 'रोमॅन्टिक' नायिकेचा स्वीकार करायला लावून वाङ्मयीन संकेतांना सरदेशमुखांनी मोठाच धक्का दिला आहे. शेक्सपीयरच्या नाट्यतंत्रात बसतील अशी कृष्ण कारस्थानं आणि हळव्याभावना विवशतेतून भुळभुळणारे भडक नाट्य यांचाही संकर-अढळ अभिजातवाद व सौंदर्यवाद यांचा वास्तवाशी केलेल्या संमिश्र रसायनातून होत राहतो. त्यात पुन्हा राजाच्या चरित्रचित्रणात 'अंशतः वास्तव व अंशतः स्वप्निल' अशा दोन स्तरांवर कथौघ वाहात ठेवल्यामुळे ही दोन विश्वे जेव्हा एकमेकावर आदळतात तेव्हा त्याचा होणारा परिणाम मोठा भयानक असतो. विशेषतः 'रोमँटिसिझिम'-च्या सांकेतिक कल्पनांना कुरवाळीत बसलेल्या मराठी समीक्षेची त्यामुळे मोठीच कुचंबणा होते.

'गडकऱ्यांची संसारनाटके' या आपल्या समीक्षा ग्रंथाला लिहिलेल्या 'प्रास्ताविक टिपणांत सरदेशमुख लिहितात— 'काव्यात्म म्हणजे रोमँटिक असायला हरकत नाही. पण तसे असून एकाच वेळी क्लासिसिस्ट आणि एक्झिस्टेन्शॅलिस्टही असायला अडचण नाही, असे मला वाटते. रोमँटिसिझम' काय 'एक्झिस्टेन्शॅलिझम' काय, माणसाच्या मनोवृत्ती आहेत. जीवनदृष्टी आहेत. आणि माणसात एकच वृत्ती किंवा दृष्टी वास करते असे नाही, किंवा एकच प्रबळ असते असेही नाही. अनेक असू शकतात. आणि त्याही कमी-अधिक तुल्यबळ, एकाच वेळी कमी-अधिक कार्यशील.'

व्यामिश्र स्वरूपाच्या जीवनदर्शनातून या कादंबरीचे स्वरूप आकार घेत असल्यामुळे तिला सांकेतिक मोजमापात बसविता येणार नाही. लॅारेन्सच्या 'विमेन इन लव्ह' चे परीक्षण करीत असता अर्नोल्ड वेनेटने त्या कलाकृतीच्या विस्कळित रचनेबद्दल त्याला दोष दिला तेव्हा लॅारेन्सने उत्तर दिले होते— All rules of construction hold good only for novels that are copies of other novels. ह्या स्फोटक उद्‌गारातून लॅारेन्सने श्रेष्ठ कलाकृतीचे एक गमकच सांगितले आहे.

सरदेशमुखांच्या बखरीतून जे संघर्षनाट्य जाणवते ते मुख्यतः मानसशास्त्राच्या पातळीवरचे आहे. ज्याला इंग्रजीत Psychic drama असे आपण म्हणतो त्या प्रकारच्या मनोमंथनातून कथेतील नाट्यबीज फुलवीत नेले आहे. रघुवीरसिंहाच्या मनाची स्पंदने टिपताना सरदेशमुखांनी हलुवार हाताने त्याच्या व्यथांचा चित्रपट उलगडला आहे–'झोळेला चिरफाडून सदाच एक खवीस समंध दिसायचं कोपऱ्या कोपऱ्यात. झुंबरातल्या मेणबत्त्या जायच्या स्फुन्दत स्फुन्दत वाऱ्याच्या झुलुकांवरून ... आणि तावदानांच्या सळया दिसायच्या वेड्याबागड्या होऊन हालत असलेल्या ... गच्चीवर वाजायची सडक पाऊल घोटं...कुणाची!' (पान १६८) क्वचित हे मनोवगाहन गूढ गुंजनाच्या पातळीवर जाते. राजसविषयी मनाशी सुखसंवाद करणारा राजा विचारतो– 'माझी राजस आणि माझी कल्पनेतली राजस ही एक असतील का? मी आणि मला आवडणारा मी ही एक असतील! मी स्वतःला धिक्कारतो तेव्हा आतून एका सूक्ष्म गौरवाने उळून का येतो? आत्मनिंदा ही भुयारवाटेसारखी जळत्या आगीतून दूर कोठे जंगलातल्या तलावाकाठी स्वतःला पळवून नेल्याचा आभास रचते (पान ६५) की काय!

भयाण आणि भीषण स्वप्नसृष्टीच्या चित्रणाने ह्या मनोविश्लेषणाला गहिऱ्या रंगाची डूब दिली आहे. स्वप्नाच्या मायाकार आभासात वावरणारा हा राजा कधी दिवास्वप्न पाहतो, कधी रविवर्म्याच्या चित्रातील अप्सरेशी स्वप्नभोगात रंगून जातो तर कधी टी. ई. लॅारेन्स व फ्रान्सिस मार्लबरो यांच्या समवेत पिरामिडच्या मुलखातून फेरफटका करून येतो. स्वप्नात काव पिवडीनं रंगलेले भयानक मुखवटे त्याला भेटतात. बांबूचे उंचच उंच पाय घेऊन चालणाऱ्या प्रतिमा त्याला दिसतात. कधी

शहामृगाच्या पाठीवर बसलेलं माकड आणि त्याच्या हातात असलेली 'गोल्डन ईगलची' बाटली दिसावी तर कधी व्हीनसच्या पुतळ्यासमोर निभ्रांतपणे हस्तमैथुन करणारा एक धिप्पाड काळभैरव आणि उडालेली रेताची चिळकांडी...

फ्राइडच्या मानसशास्त्रीय सिद्धांतावर उभारलेली ही स्वप्नसृष्टी मराठी साहित्यात तरी अभूतपूर्व आहे.

## सेक्स : चित्रणातील धिटाई व भेदकता :

राजा दमयंती आणि राजस यांच्या परस्पर संबंधाच्या चित्रणातून सरदेशमुखांनी मराठी कादंबरीला अज्ञात असलेली सेक्स चित्रणातील धिटाई प्रथमच दाखविली आहे. स्त्री-पुरुष संभोगाची शृंगारबहळ वर्णने तशी मराठी साहित्यात गवताऐसी उदंड वाढली आहेत. ती नवलाई मराठी मनाला आता उरली नाही. पण लेडीज चॅटर्लीज लव्हर मध्ये डी. एच्. लॉरेन्सने उत्तान किंवा अश्लील प्रवृत्तींचा आश्रय न घेता ज्या पद्धतीने शृंगार-चित्रण केले आहे, तीच प्रांजल पण भेदक रीती सरदेशमुखांनी अवलंबिली आहे. 'स्वामींद्रियाचा ताठर खोडसाळपणा' किंवा पदराआडचे 'भरलेले आतुर असे ते मांसल स्पंदन' यांचे उल्लेख उघडच सांकेतिकतेला आव्हान करणारे आहेत. स्वतःच्या मैथुनात रमून जाणारा रघुराजा आपल्या विचित्र उन्मादक अनुभवांचे कथन करताना सांगतो, 'रविवर्म्याची, चोळी न घातलेली मोहिनी कदंबाच्या फांदीवर झोके घेताना पाहायची...बेंबीच्या खाली वस्त्र ओघळतं आहे अशा उर्वशीचं रूप अर्ध्या मिटल्या डोळ्यांनीं बघायचं...व्हीनसचा पुतळा कुरवाळायचा...आणि स्वतःला ओघळून घ्यायचं...रितं करून शांतवायचं...' (पृष्ठ : १७१) पण यामुळे नायकाविषयी मनात जुगुप्सा किंवा घृणा निर्माण होत नाही. कारण 'शय्या सखीविना – निर्माल्य झाले जीव फुलांचे' अशा त्या राजाच्या मनात मन्मथाचा पेटलेला पोत जळत असताना – प्रिय-दर्शनाची, प्रियमीलनाची अनिवार लालसा मानसी प्रबळ असताना – त्याचे मन दमयंतीचा स्वीकार करू शकत नाही. माणसाच्या मनानं एकदा का गहनाचा आणि सुंदराचा वेध घेतला की त्याला ढोबळ आणि असुंदर कोणत्याही मिषानं रिझवू शकत नाही, हेच खरं. टेबल लॅंपच्या सोनाळ उजेडात प्रथम पाहिलेली राजसची ती मोहमयी 'प्रोफाइल' – तिच्या देहाभोवतीचे ते अद्‌भुतरम्य घनश्यामवलय – वेढिंग करणाऱ्या निळ्या लखख ज्वालेप्रमाणे निळसर झाक फेकणारी राजसच्या डोळ्यांतल्या बुबुळांची ती वलयं – आणि रात्री पाकळ्या पाकळ्यांनी उमलणाऱ्या चंद्रविकासी कमळाप्रमाणे असणारे ते राजस लावण्य – मीलनाची ती चांदणी रात्र – तळ्याकाठच्या जंगलातून कानी येणारी ती मयूराची केका – राजा त्या उन्मादाच्या क्षणी आणभाक घेऊन राजसला सांगतो, 'तुझ्या चांदण्यात माझा मोर एक तर टाहो देत जगेल, नाही तर उरी फुटून जाईल.'

अस्तित्ववादाच्या प्रभावाखाली असणारा राजा असा 'रोमॅंटिसिझम' बरोबर जखडला

जावा – त्याच्या काव्यात्मक मनाने ( Poetic soul ) व्यवहारवादाशी तडजोड करणाऱ्या Commercial soul शी फटकून वागावे हा सारा प्रकार परंपरागत वाङ्मय-समीक्षेला गोंधळात टाकणारा आहे. पण संकेतनिष्ठ समीक्षकांना टॉलस्टॉयच्या भाषेतच सांगावे लागेल : ' Happy families are all alike; every unhappy family is unhappy in its own way. ' ॲना करेनिनाच्या ह्या मर्मग्राही उद्‌गारातच राजाचे दुःख आणि त्याच्या दुःखाचे विश्लेषण यांचे रहस्य सामावलेले आहे.

## रघुराजाचा शेवट :

इतिहास असा आहे की, ज्या संस्थानच्या राजाच्या चरित्रातून सरदेशमुखांना आपल्या कथानायकाची व्यक्तिरेखा स्फुरली असण्याची शक्यता आहे तो राजा हॉस्पिटलमध्ये विषप्रयोगाने मरण पावला. बुजर्गांची साक्ष अशी आहे खरी, पण प्रत्यक्ष पुराव्याने सिद्ध झालेली ती हकीकत आहे असे मात्र म्हणता येणार नाही. सरदेशमुखांचा रघुराजा ऑपरेशन यशस्वी होऊन घरी परतला तरी हॉस्पिटलमध्ये रुग्णशय्येवर असतानाच त्याचं अस्तित्ववादी मन मरणाचा कानोसा घेऊ पाहात होतं. ऑपरेशनमध्ये काही झालं तर? उरी सलणारं हे शल्य बोलून दाखविताना तो म्हणतो—

' राजवर्खी चांदण्या रात्रीचा ध्यास नको.
दमयंतीचं आख्यान नको
ग्रहणाच्या वेदनेचा फास नको
राजा परीक्षिताला तक्षकाच्या डोळ्यास डोळा भिडवायची
वेडी तहान आहे.
त्या तहानेनं त्याच्या भविष्याला नपुंसक केलं आहे.
त्याच्या पोटी जनमेजय येणार नाही म्हणून त्याच्या
मरणाचा सूड कोणी घेणार नाही ! '

सर्जन किलपॅट्रिक त्याला म्हणतो. ' अगदी काळजी करू नकोस. आठ दिवसांत खणखणीत होऊन जाशील गावाला. '

राजाचं मन सवाल करतं, " कोणता गाव माझा ? कोण आहे माझं तिथं ? .." भयाण एकलेपणाच्या पोकळींत आत्मकेंद्र हरवून बसलेल्या राजाला ॲलिनिएशनचा येणारा हा अनुभव झ्वाइगच्या आत्मवृत्तातील ' My to-day and each of my yesterdays, my rises and falls are so diverse that I sometimes feel as if I had lived not one but several existences each one different from the others...My feeling is that the world in which I grew up e world of to-day and the world between the two are entire-

ly separate worlds...All the bridges between our to-day and our yesterday and our yesterdays have been burnt : ह्या दाहक अनुभूतीच्या जातीचाच आहे. अशा अनुभूतीची अखेरी आत्मघातात होणे अटळ आहे.

'अंधारयात्रे 'त स्वतः सरदेशमुखांनीच म्हटल्याप्रमाणे 'अस्तित्ववादाच्या प्रभावाखाली विचाराला मरणाच्या शिवेपर्यंतच सरपटता येते. मरण हा जीवनाचा अंतबिंदू ठरल्याने तेच जीवनातील महनीय सत्य मानण्याकडे कल होतो. शिवाय ते अपरिहार्य आणि अस्वाधीन असल्याने सगळे जीवनच निरर्थक आणि अहेतुक असल्याचा भुंगा घुमत आणि पोखरीत राहतो.

...खिडकीच्या तावदानातून दिसणाऱ्या सप्तर्षींच्या तांड्याला साक्ष ठेवून राजा निघाला आहे.

पण त्याच्या मरणात विलक्षण काव्य आहे. सौन्दर्य आहे. आर्सेनिक घेऊन आत्महत्या केलेल्या अठराव्या शतकातील तरुण कवी चॅटर्टनशी कुठे तरी त्याच्या मनाच्या तारा जुळलेल्या आहेत. त्याच्या अस्तित्ववादी जीवनाला छेद देऊन जातो त्याचा हा रोमँटिक मृत्यू...

इथे सरदेशमुख बोलत नाहीत. बोलतो आहे त्यांच्या सुप्त मनातील कवी वैशाख, असुन्दर मरणाला सुन्दर बनविणारी कविप्रतिभा !

कवी शैलीच्या मृतदेहाला चिताग्नीच्या ज्वाला आपल्या कवेत घेत असताना त्याच्या कोण्या मित्राने त्याच्या हृदयाचा भाग काढून घेतला. ते कविहृदय आजही रोमच्या स्मशानभूमीत कीटसच्या शेजारी चिरविश्रांती घेत आहे. समाधिशिळेवर शब्द आहेत cor cordium ( Heart of Hearts ) सरदेशमुखांच्या त्या उमद्या राजाच्या कबरीवर ह्यापेक्षा दुसरी कोणती अक्षरे शोभून दिसतील ?

## सरदेशमुखांची शैली :

१९४४ साली लिहिलेल्या आपल्या पहिल्या कादंबरीला जोडलेल्या प्रास्ताविकात सरदेशमुख सांगतात,... 'या लेखनात बराच नवखेपणा आणि त्या मानाने अनुभवाची कमतरता आहे, याची मला जाणीव आहे. तरी पण त्या वेळी जसे आणि जे लिहिले तसे आणि तेच छापले आहे—नव्हाळीच्या गुणदोषासह. '

१९७२ साली लिहिलेल्या या कादंबरीत हा 'नवखेपणा ' कितपत बुजला आहे, अनुभवांची कक्षा कितपत रुंदावली आहे आणि मुख्य म्हणजे 'नव्हाळीचे गुणदोष ' परिपक्व आणि विकसित प्रतिभेने कितपत ' अधिक उणे ' केले आहेत हा खरा प्रश्न आहे.

– मनोहर माळगावकर यांच्या 'प्रिन्सेस ' मध्ये वापरलेला अनुभवाचा 'कॅनव्हास ' आणि सरदेशमुखांच्या ' बखरी 'त वापरलेला अनुभवचित्रणाचा फलक यांची तुलना

करू पाहणे कदाचित सरदेशमुखांना अन्यायमूलक होईल. तरीही दोहोंतील विषय-साधर्म्यामुळे अशी तुलना काही मर्यादेपर्यंत अटळ ठरते. विशेषतः ' प्रिन्सेस ' मधील राजकुमार अभय व बखरीतील ' राजा ' यांच्यात एक फरक प्रकर्षाने जाणवतो. तो म्हणजे अभयचे चित्रण ' बहिरवर्तित ' म्हणजे Extrovert पद्धतीचे तर बखरीतील राजाचे चित्रण ' आंतर-वर्तित ' म्हणजे Introvert पद्धतीचे झाले आहे. याचे कारण एकच. सरदेशमुखांची कविप्रकृती त्यांच्यातील ' वैशाख,' त्यांच्यातील 'कादंबरीकारा '-वर सदैव मात करू पाहतो. त्यामुळे व्यक्तिदर्शनात किंवा अनुभवकथनात जी एक ' कलात्मक अलिप्तता ' असावयास हवी ती सरदेशमुखांच्या कलाकृतीत अभावाने दिसते. म्हणूनच त्यांच्या कथेतील नायकनायिकांच्या-जीविताची ' शोकांतिका ' प्रत्यक्ष त्यांची ' स्वतःची ' असावी असा एक सूर त्यांच्या कलाकृतीतून अपरिहार्यपणे उमटतो.

यामुळेच सरदेशमुखांची ' काव्यात्मक शैली ' त्यांच्या बखरीच्या संदर्भात विवाद्य ठरू पाहते. स्वतःच्या प्रतिबिंबाच्या प्रेमात पडलेल्या नार्सिससप्रमाणे स्वतःच निर्माण केलेल्या राजाच्या प्रेमात तर सरदेशमुख पडले नसावेत ना, असाही संशय घेतला जावा इतके ' अद्वैत ' त्या उभयतांत दिसावे हा खरोखरच एक ' चिंत्य प्रश्न आहे.

' हॅम्लेट आणि बखरीतील रघुराजा यांचा मनःकोश एकाच धाग्यानी विणल्यासारखा दिसावा इतके साधर्म्य दोघांत खचित आहे. विशेषतः दोघाच्याही ठिकाणची कृति-शून्यता. अतिविवेकशीलतेतून निर्माण झालेला अकर्तेपणा किंवा क्रियाशीलत्वाचा अभाव. राजाचीही 'हॅम्लेटी ' वृत्तीच त्याला क्षणात कवी, तर क्षणात तत्त्वज्ञ बनवित. क्वचित तो ' सिनिक बनतो तर क्वचित व्याज-उपरोधाचा आश्रय घेऊन बोलतो. एकात राजाच्या मनाचे हे संमिश्र स्वरूप न्याहाळून पाहिले म्हणजे ब्रॅडलेने हॅम्लेटविषयी काढलेले उद्गार आठवतात —

' Hamlet had speculative genius without being a philosopher, just as he had imaginative genius without being a poet ' ( page 91 )

हॅम्लेटच्या वाणीतील व्याजविखाराचे स्पष्टीकरण देताना ब्रॅडले म्हणतो—

' This tendency in Hamlet betokens a nimbleness and flexibility of mind which is characteristic of Hamlet.' ( Shakesperean Tragedy : Page 120 )

... ' बखरी 'तील राजाच्या व्यक्तीमत्त्वाचा पोत याच विणीचा असल्यामुळे ब्रॅडलेने केलेले हे स्पष्टीकरण सरदेशमुखांनी ज्या शैलीत ही कथा सादर केलेली आहे तिचा अन्वयार्थ उलगडून सांगण्यास पुरेसे आहे.

—प्रा. गो. रा. कामतकर



अनुक्रमणिका

## माधवराव पटवर्धन : वाङ्मयदर्शन

लेखक : डॉ. चु. रा. चुनेकर,

मौज प्रकाशन गृह. पृष्ठे. ३९८ + २०. मूल्य २१ रु.

कै. डॉ. मा. त्रिं. पटवर्धन ऊर्फ कविवर्य माधव ज्यूलियन यांच्या समग्र वाङ्मयाचा एक समावेशक अभ्यास डॉ. चुनेकर यांनी या ग्रंथात मांडला आहे. प्रत्येक साहित्यिकाचे वाङ्मय त्याच्या जीवनाशी कमीअधिक संबद्ध असतेच. पण माधवराव पटवर्धनांच्या बाबतीत त्यांचे वाङ्मय, विशेषतः त्यांचे काव्य त्यांच्या जीवनाशी विलक्षण रीतीने गुंतलेले होते, असे म्हणावे लागेल. म्हणूनच आपल्या या समावेशक अभ्यासात डॉ. पटवर्धनांच्या वाङ्मयाचा जीवनसंबद्ध अभ्यास डॉ. चुनेकरांनी दुर्लक्षिलेला नाही. पटवर्धनांच्या जीवनाचा एक . धावता पण साक्षेपी आढावा त्यांनी प्रारंभी घेतला आहे आणि पुढे त्यांचे विविध वाङ्मय त्या त्या वेळच्या त्यांच्या परिस्थितीशी, विचारांशी, भावभावनांशी कसे निगडित आहे ते दाखवून दिले आहे. वाङ्मयाचा जसा जीवनाशी ( म्हणजे वाङ्मयेतर जीवनाशी ) संबंध असतो तसाच एका प्रकारच्या वाङ्मयाचा दुसऱ्या प्रकारच्या वाङ्मयाशी संबंध असतो; आणि एकाच प्रकारचे वाङ्मय घेतले तरी त्यात काही अंतर्गत संगती व विकास दिसून येतो. ही गोष्ट लक्षात घेऊन डॉ. चुनेकरांनी पटवर्धनांच्या काव्यातील, कोशरचनेतील, छंद : शास्त्रीय संशोधनातील, भाषाशुद्धी विचारातील किंवा साहित्यविमर्शातील अंतर्गत संगती व विकास यांचा मागोवा घेतला आहे आणि हे विविध वाङ्मयप्रकार एकमेकांशी कसे नि किती संबंधित होते त्याचा अभ्यास केला आहे. या प्रकारच्या प्रयत्नांतून एखाद्या लेखकाच्या एकंदर वाङ्मयाचे स्वरूप विशिष्ट तऱ्हेचे का झाले ते समजायला मदत होते; पण त्या वाङ्मयाचे मूल्यमापन होतेच असे नाही. पण डॉ. चुनेकरांनी पटवर्धनांच्या विविध वाङ्मयाचे मूल्यमापनही त्या त्या वाङ्मयप्रकाराचे मानदंड वापरून केले आहे; आणि आपल्या ग्रंथाला पूर्णता आणली आहे.

पटवर्धनांच्या कवितेचे ' कालानुसारी निरीक्षण ' करीत असता डॉ. चुनेकर म्हणतात, " १९११ ते १९१८ या काळातील कवितांमध्ये स्वानुभूतीपेक्षा होतकरू कवीला स्वाभाविक अशी अनुकरणशीलताच आढळते. " (पृ. १०३) पण या काळातील कवितांत, डॉ. चुनेकरांनी तपशीलवार दाखवून दिल्याप्रमाणे, अनुकरणशीलता आहे हे मान्य केले, तरी ' स्वानुभूतीपेक्षा अनुकरणशीलता ' जास्त आहे की काय, याविषयी शंका घेता येईल. पटवर्धनांचे जीवन व काव्य यांचा समांतर अभ्यास केला तर या काळात स्वानुभूतीचेच चित्रण काव्यात ते विशेषत्वाने करीत होते, असे आढळून येते.

अनुक्रमणिका

ही स्वानुभूती कधी साध्या पडद्यात झाकलेली असेल, तर कधी झिरझिरीत जाळीच्या पडद्याआड झाकलेली असेल, पण ती होती याविषयी शंका वाटत नाही. 'चिमुकली शांता' 'ज्या छायेस्तव'...( किंवा 'ते पुष्प') 'श्यामा-रजनी' 'आशान्त क्षण...' 'प्रेमाची परीक्षा नको', 'मुग्धे तू तर...', 'आत्मनिवेदन' 'येथे गीत सुरेल...' 'वाग्यत मोहिनी' 'निराशेतील समाधान' वगैरे कविता स्वानुभूतीवर आधारलेल्या आहेत, हे दाखवून देता येईल, आणि डॉ. चुनेकरांनाही ते बहुधा मान्य होईल. पटवर्धनांच्या ज्या अप्रकाशित कविता आहेत त्यांपैकी बहुसंख्य कविता फार व्यक्तिपर असल्यामुळेच अप्रकाशित राहिल्या असाव्या. ज्या कविता पटवर्धनांनी प्रकाशित न करता नष्ट केल्या त्या तर फार आत्मचरित्रपर होत्या म्हणून त्यांनी नष्ट केल्या, असा कयास करता येईल. कवीच्या व्यक्तित्वाचा व अभिव्यक्तीचा जो स्वाभाविक विकासक्रम आहे त्याच्या अनुरोधाने बघितल्यास पटवर्धनांच्या प्रारंभीच्या कविता स्वानुभूतीचे चित्रण भरपूर प्रमाणात करीत असाव्यात हेच सरळ वाटते. तेव्हा "अनेकदा स्वतःची अनुभूती इतरांच्या घाटांतून प्रकट होई" असे जे डॉ. चुनेकर नंतर एके ठिकाणी (पृ. १०३) म्हणतात, तेच पटवर्धनांच्या प्रारंभिक कवितांविषयी अधिक बरोबर होते, असे म्हणता येईल.

प्रारंभकाळ सोडून पुढे गेल्यावर पटवर्धनांच्या कवितेने जो विकास साधला, वळणे घेतली, त्याचे अनेक मार्मिक वेध डॉ. चुनेकरांनी घेतले आहेत. विवाहापूर्वीच पटवर्धनांची वात्सल्यभावना जागी झाली होती, ती डॉ. चुनेकरांनी टिपली आहे; आणि अपत्यप्राप्तीनंतर वात्सल्य हीच पटवर्धनांची एक प्रधान भावना झाली, हेही डॉ. चुनेकरांनी हेरले आहे. फर्ग्युसन प्रकरणात दुर्दैवाचा जबरदस्त तडाखा पटवर्धनांना सहन करावा लागला, याचा निर्देश करून "या काळात पटवर्धनांची कविता पूर्णपणे स्वतःशी एकनिष्ठ राहिली; बाह्य सजावट, आवरणे यांपासून ती मुक्त झाली" असे मोलाचे निरीक्षण डॉ. चुनेकरांनी नोंदविले आहे. १९२८ नंतरच्या वैवाहिक जीवनात, प्रारंभी पटवर्धनांच्या कवितांत "पूर्व उद्रेकाच्या खुणा दिसतात" पण पुढे त्या कविता कमी आत्मपर व अधिक समाजपर होत गेल्या, ही गोष्टही चुनेकरांच्या नजरेतून सुटलेली नाही. १९३० पासून पटवर्धनांचे काव्यलेखन मंदावले हे चुनेकरांनी साधार दाखविले आहे आणि त्याची मीमांसा करताना म्हटले आहे, की "त्यांच्या काव्यलेखनाची आद्य प्रेरणा प्रेमविषयक अनुभूती व्यक्त करण्याच्या इच्छेमध्ये होती; कालांतराने ही प्रेरणाच दडपली गेली." ही मीमांसा सर्वसाधारणपणे मान्य होण्यासारखी आहे. पण तीविषयी दोन शंका येथे सांगून ठेवाव्यात, असे वाटते. एक म्हणजे पटवर्धनांच्या काव्यप्रेरणेचा डॉ. चुनेकरांनी दिलेला इतिहास पाहिला तरी "प्रेमविषयक" अनुभूती व्यक्त करण्याच्या इच्छेत "आद्य" म्हणजे पहिली काव्यप्रेरणा दिसत नाही. पटवर्धनांची पहिली कविता हात मोडला असता देवाला आळवणारी, किंवा चंद्रप्रकाशाबद्दल

आल्हाद व्यक्त करणारी आहे. ( पृ. ९२ ) तेव्हा प्रेमविषयक अनुभूती ही ' आद्य ' प्रेरणा म्हणण्यापेक्षा ' मुख्य ' प्रेरणा म्हणणे बरे नव्हे का ? दुसरे असे, की प्रेमविषयक कविता लिहिण्याची प्रेरणा " दडपली गेली " हे म्हणणे कितपत खरे आहे ? पटवर्धनांनी आपल्या प्रेमभावनेवर विवेकपूर्वक नियंत्रण घातले होते आणि पुढे वयानुसार ती भावना मंदही झाली असावी. तेव्हा प्रेमभावनेचा जोर कमी झाला ही घटना निराळ्या शब्दांनी सांगणे उचित ठरणार नाही का ?

पटवर्धनांच्या कवितेचे ' कालानुसारी निरीक्षण ' करीत असता, पटवर्धन कवितांचे जे परिष्करण करीत त्याचा सूक्ष्म विचार चुनेकरांनी केला आहे. अनेक विद्वानांना व मित्रमंडळींना पटवर्धनांचा परिष्करणाचा हव्यास आवडत नसे. तरी " बहुतेक स्थळी परिष्करण, समर्पक, सुयोग्य, काव्यहेतूशी सुसंगत झाले आहे. " असा धीट निष्कर्ष चुनेकर काढतात. ( पृ. १३८ ) त्यांचा निष्कर्ष योग्य असला तरी त्यांच्या विवेचनात एकदोन त्रुटी राहिलेल्या दिसतात. " पूर्वीच्या कवितांत पटवर्धनांनी फिरवाफिरव केली ती आपल्या विफल प्रणयजीवनाच्या खाणाखुणा नष्ट करण्यासाठी तर नव्हे ना, अशी शंका व्यक्त केली जाते. " ती शंका काही मर्यादेपर्यंत खरी असल्याचे चुनेकर सांगतात. ( पृ. १३० ) पण आपल्या विधानाला उदाहरणांनी ते बळकटी आणीत नाहीत. पटवर्धनांच्या कवितांतील ' वैयक्तिक व प्रासंगिक संदर्भ ' ची चर्चा त्यांनी केली आहे. ( पृ. १३४–१३५ ) पण तीवरून प्रणयजीवनाच्या खाणाखुणा पटवर्धनांनी कोठे नष्ट केल्या ते स्पष्ट होत नाही. दुसरे असे, की ' मुरली ' कवितेतील बंडखोर विचार तिच्या पूर्व पाठात नाहीत, असे उचित विधान पृ. १३२ वर चुनेकरांनी केले आहे. पण पृ. १०३ वर या विधानाचा आवाका त्यांना आलेला नाही. तेथे तेच बंडखोर विचार ' मुरली 'च्या पूर्व पाठातही होते अशा अर्थाचे विसंगत निवेदन त्यांनी केले आहे !

पटवर्धनांच्या स्फुट कवितांचे ' अंतरंगदर्शन ' घडवताना डॉ. चुनेकर खूप खोलात जातात आणि ठायी ठायी मर्मस्पर्शी विवेचन करतात. त्या कवितांतील प्रीतिकल्पना प्रियकराचे व प्रेयसीचे व्यक्तिमत्त्व, वास्तवता व प्रत्यक्षगोचरता, हळवेपणा, पोरकेपणाची व्यथा, वात्सल्यभावना, मित्रप्रेम, सामाजिकता, मराठपणा, आंतरिक अस्वस्थता वगैरे अंगे निवडून काढून त्यांचे स्वरूपाविष्करण त्यांनी केले आहे. शिवाय त्या कवितांची पद्यरचना व भाषा यांकडे लक्ष दिले आहे. पटवर्धनांच्या कवितांकडे वरवर बघितले तर त्या कवितांची नायिका चंचल, स्वयंतुष्ट, पुरुषाला उत्तेजन देऊन फशी पाडणारी, रूपगर्विष्ठ युवती आहे असा ग्रह होतो. पण, तिच्याकडे काव्य-लेखन करणाऱ्या नायकाच्या दृष्टीने न बघता चुनेकर तिच्याच उद्‌गारांतून बघतात व ' नायकाबद्दल तिच्या मनात दृढ सहानुभाव आहे,...दोघांचे नाते विशुद्ध मैत्रीचे असावे अशी तिची अपेक्षा आहे. परिचयाचे परिणयात रूपान्तर व्हावे असे तिला वाटत नाही " हे दाखवून देतात. ( पृ. १४२ ) " वैशिष्ट्यपूर्ण अनुभूती आणि तिची वैशिष्ट्यपूर्ण

अभिव्यक्ती " हा पटवर्धनांच्या प्रेमकवितेचा विशेष होता, हा मुद्दा चुनेकरांनी चांगल्या रीतीने विशद केला आहे. ( पृ. १४९ ) पटवर्धनपूर्व कवितेमध्ये पद्यप्रकारासंबंधी साचे-बंदपणा येऊ लागला होता. पण फार्शीतून अनेक पद्यप्रकार मराठीत आणून पटवर्धनांनी तो साचेबंदपणा मोडून काढला. त्यांनी मराठी कवींना रचनेसाठी नवीन पद्यप्रकार उपलब्ध करून दिले. ' छंदोरचनाकार ' पटवर्धनांची ही कामगिरी चुनेकरांनी सांगितली आहे; पण त्या कामगिरीच्या मर्यादाही स्पष्ट केल्या आहेत. ते म्हणतात, " या पद्य-प्रकारांत कृत्रिमता व बंधकताही अधिक असल्यामुळे पुढे पुढे त्यांचा वापर कमी होत गेला...त्यांत मूलभूत क्रान्तिकारकत्व नव्हते...अभिव्यक्तीची कुचंबणा होऊन त्या अपरिहार्यतेतून [ त्यांचा ]...स्वीकार झाला असे नाही. " ( पृ. १६४ ) पटवर्धनांच्या भाषारीतीविषयी चुनेकर म्हणतात, की " पटवर्धनांच्या भाषारीतीत सहजता नाही " पण ' कणखरपणा, ठाशीवपणा व अर्थसघनता ' आहे. शेवटी पटवर्धनांच्या स्फुट कवितांच्या सिंहावलोकनात, चुनेकर त्या कवितांचे सामर्थ्य व मर्यादा यांवर नेमके बोट ठेवतात. पटवर्धनांच्या कवितांत " जिवंतपणा, चैतन्य आहे "... " त्यांनी काही वेधक सौंदर्यचित्रे काढली; भावनेच्या अभिनव मनोरम छटा दाखविल्या "... " कविते-तील अनुभूती त्यांची स्वतःची आहे...जीवनाकडे बघण्याच्या त्यांच्या दृष्टीतही अधिक मोकळेपणा, व्यक्तिविशिष्टता आहे. "... " त्यांच्या कवितेत व्यक्तिवादाची ऊर्जस्वल जाणीव आहे "... " व्यक्तिजीवनात, समाजपरिस्थितीत झालेला बदल ओळखून, नव्या पिढीच्या नव्या आकांक्षा, नवी स्वप्ने बोलकी करणारा कवी...हवा होता. पटवर्ध-नांच्या कवितेत नवजीवनाची ही साद ऐकू आली "... " १९२० ते १९३५ या कालखंडातील...[ मराठी ] कवितेचा सर्वाधिक विकास पटवर्धनांच्या कवितेमध्ये दिसून येतो "–वगैरे मुद्दे पुढे आणून चुनेकर पटवर्धनांचे सामर्थ्य चांगले स्पष्ट करतात. ( पृ. १७१, १७४, १८०, ३३७ ) पण सामर्थ्याबरोबर मर्यादा दाखविण्यास ते चुकत नाहीत. पटवर्धनांची अनुभूती जिवंत असली तरी फार खोल नाही, अनेकदा अनु-भूतीच्या तळापर्यंत ते जाऊ शकत नाहीत, त्यांची अनुभूती जीवनाच्या एकूण संदर्भात गौण ठरणारी आहे, त्यांच्या कवितेने हृदयविस्ताराचा अनुभव येत नाही आणि ती जीवनाच्या अंतस्तत्त्वाला स्पर्श करीत नाही, काव्याच्या अंतःसामर्थ्यापेक्षा बहिरंगाच्या नावीन्याचा प्रभावच तीत कित्येकदा अधिक होतो, काही वेळा तीत भिन्न भावनांचे अकलात्मक मिश्रण होते, वगैरे उणिवा चुनेकरांनी अचूक दाखविल्या आहेत. ( पृ. १७१ ते १७४ ) मात्र सामर्थ्य व मर्यादा यांच्या चर्चेत ' सर्वं खल्विदं माया ! ' या कवितेची रेंदाळकरांच्या ' अजुनि चालतोचि वाट ' या कवितेशी ते जी तुलना करतात, ' कंचनी ' कवितेत जो दोष काढतात, तो पटत नाही; अप्रस्तुतही वाटतो. शिवाय, त्यांचे पुढील विधान साहसी म्हणावे लागेल. ते म्हणतात : " १९२० पूर्वीच्या मराठी कवितेच्यापुढे काही अंगांनी पटवर्धनांच्या कवितेने प्रगती केली असली तरी

अनुक्रमणिका

त्या कवितेतील आत्मीयता, उत्कटता, आवेग ही कविता गाठू शकली नाही." (पृ. १७९) पटवर्धनांचे हे अवमूलन चुनेकरांसारख्या सच्च्या चाहत्याने करावे, याचे आश्चर्य वाटते.

पटवर्धनांच्या दीर्घ-काव्यावर लिहिताना, चुनेकरांनी 'विरहतरंगा'चे स्वरूप व गुण-वैशिष्ट्य चांगल्या रीतीने उकलून दाखविले आहे. नायिकेची वैशिष्ट्यपूर्ण व्यक्तिरेखा, प्रीतिकल्पनेमधील अभिनवता व आदर्शवाद, वातावरणातील तरल काव्यात्मता, दोन पातळ्यांवर राहून केलेले दोन प्रकारचे कुशल कालनिर्देश-नायिकेची मोहक मूर्तिवर्णने, रमणीय निसर्ग-चित्र, विदग्ध वाङ्मयाचे विपुल निर्देश वगैरे सर्व काव्यगुण त्यांनी विशद केले आहेत. विरहतरंगाची नायिका इंदू हिच्याविषयी आजवर अनेकांनी अनेक प्रकारे लिहिले असले, तरी चुनेकर त्या सर्वांच्याही पुढे एक यवभर का होईना पण नक्कीच गेले असावेत. इंदूच्या स्वभावातील गूढता पुष्कळांना उमगलेली नाही आणि त्या गूढते-विषयी अनेक तर्कवितर्क त्यांनी लढविलेले आहेत. पण पटवर्धनांनीच इंदूविषयी केलेले एक निवेदन चुनेकरांच्या बरोबर लक्षात आलेले आहे व "पूर्ववैवाहिक जीवनातील काही अनुभवातही तिच्या गूढवृत्तीचे बीज असणे शक्य आहे. या गोष्टीचे योग्य भान त्यांनी ठेवले आहे." (पृ. १८९) चुनेकरांच्या समावेशक व सूक्ष्म अभ्यासाचा प्रत्यय जसा या ठिकाणी येतो तसाच तो विरहतरंगाच्या परिष्करणाची जी चर्चा त्यांनी केली आहे तीमध्येही येतो परिष्करणामुळे काल व प्रसंग यांच्या उल्लेखात एक विसंगती कशी उत्पन्न होते ती त्यांनी नेमकी दाखविली आहे. (पृ. १९७)

'विरहतरंग' व 'सुधारक' या खंडकाव्यांची तुलना करताना चुनेकर म्हणतात की "विरहतरंग आत्मपर अधिक आहे. वैयक्तिक भावजीवनाचा आविष्कार त्यात अधिक आहे." (पृ. २२०) चुनेकरांची ही तुलना योग्य असली तरी 'विरहतरंगा'ची आत्मपरता जाणल्यावर पटवर्धनांच्या प्रतिभाशक्तीचा, कलानिर्मितीचा जो आणखी शोध त्यांना घेता आला असता तो त्यांनी घेतलेला नाही, असे मनात येऊन जाते. 'विरहतरंगा'चा विस्तार ज्या बीजांमधून झाला ती बीजे पटवर्धनांच्या चरित्रातून चुनेकरांना निवडता आली असती आणि त्या बीजांचा जो विस्तार झाला, त्या विस्ताराला जो आकार मिळाला, त्यांमध्ये पटवर्धनांची प्रतिभा व कलाकुसर त्यांना सापडली असती पण पटवर्धनांच्या प्रतिभेचा किंवा कलाकुसरीचा असला मागोवा घेण्याकडे त्यांचे लक्ष गेलेले दिसत नाही. विरहतरंगाची अखेरी पटवर्धनांनी सध्याच्या विशिष्ट पद्धतीनेच का केली, असा प्रश्नही चुनेकरांना पडलेला आहे (पृ. १९६). पण पटवर्धनांची प्रतिभा व कलाकुसर या गोष्टी प्रत्यक्षाचे रूपान्तर कसकसे करीत, त्याकडे त्यांनी लक्ष दिले असते, तर तो प्रश्न त्यांना पडला नसता, असे वाटते. 'मुक्तपक्षी' 'मुरली' 'वाग्यत मोहिनी' वगैरे स्फुट कवितांच्या उत्तरोत्तर बदललेल्या पाठावरूनही पटवर्धनांच्या प्रतिभेचे व कारागिरीचे परिणाम अभ्यासता आले असते. पण अभ्यासाच्या त्या क्षेत्राकडे चुनेकर फारसे वळत नाहीत.

अनुक्रमणिका

'सुधारक' या खंडकाव्याचा विचार चुनेकरांनी पुष्कळ केला आहे आणि पुष्कळ प्रकारांनी केला आहे. पण तो नक्की कोणत्या भूमिकेवरून करावा, याविषयी त्यांचा निश्चय झालेला दिसत नाही. प्रथमतः सुधारकाच्या कथा-रचनेचा ते विचार करतात व म्हणतात, की त्यातील कथांची सांधेजोड नीट झालेली नाही; त्यातील कित्येक अध्यायांत कुठे कथानकच नाही तर कुठे संघर्षाचा पत्ताच नाही; त्यात गौण पात्रे प्रमाणापेक्षा अधिक जागा व्यापतात, त्यात सरलेच्या एका कहाणीखेरीज कोणताही कथाभाग उत्कटतेच्या पातळीला पोहोचू शकत नाही; किंवा एकूण काव्य "एककेंद्री उत्कट परिणामकारकता" साधू शकत नाही. (पृ. २०८ ते २१०). कथारचनेप्रमाणे 'सुधारका'तील समाजटीकेची रीतही चुनेकरांना सदोष वाटते. ते म्हणतात, की "काही सामाजिक समस्या काव्यद्वारे पुढे मांडावयाचा पटवर्धनांचा प्रयत्न जाणवतो, पण जे सांगावयाचे आहे ते निश्चित ठरवून त्याच्या मर्यादा व पथ्ये सांभाळून सांगितले न गेल्याने हा प्रयत्न व्हावा तितका यशस्वी होत नाही... प्रसंग येईल त्याप्रमाणे कथा वळणे घेत जाते, आणि त्यामुळे पटवर्धनांना अभिप्रेत असणाऱ्या समस्या बाजूला पडतात." (पृ. २११–२१२) चुनेकरांच्या मते, समस्या बाजूला पडतात म्हणजे काय होते, ते बघण्यासारखे आहे. त्यांच्या लिहिण्याचा सारांश असा की, प्रचलित विवाहपद्धतीतील सदोषत्वामुळे सरलेचा रंगरावाशी झालेला विवाह दुःखकारक होतो, व पटवर्धन त्या विवाहपद्धतीवर टीका करतात असे म्हणावेसे वाटते. पण दुसरीकडे त्याच विवाहपद्धतीने व अधिक गर्ह्य प्रकार होऊन तरलेचा जो विवाह होतो तो सुखकारक ठरल्याचे ते दाखवितात ! परित्यक्त अवस्थेत सरलेला जे दुःख भोगावे लागते ते तिला लग्नविच्छेदाचे स्वातंत्र्य नसल्याने भोगावे लागते, असे पटवर्धनांना कदाचित सूचित करावयाचे असेल. पण तिचे मेजर गोखल्यांवर जे प्रेम जडते ते लग्नविच्छेदानेही सफल होण्यासारखे नसते. त्यामुळे पटवर्धन लग्नविच्छेदाचाही धड पुरस्कार करतात, असे दिसत नाही ! श्यामाच्या व्यक्तिरेखेतून जन्माने पतित अशा युवतींची विवाह-समस्या पटवर्धनांना साकार करता आली असती पण "श्यामाच्या व्यक्तिरेखेतून तिची समस्या उभी राहण्याऐवजी तिच्या प्रीतिभक्तीचे चित्रणच प्रभावी होते." सगुणा ही विधवा स्वावलंबी जीवन जगत असता पुरुषी प्रलोभनाला बळी पडते आणि तिच्याशी धैर्याने लग्न करून तशा स्त्रियांच्या उद्धाराचा एक मार्ग वासू दाखवितो. पण पटवर्धन अल्पावधीत सगुणा मृत्युमुखी पडल्याचे सांगतात आणि "त्यामुळे तिच्याद्वारे उभ्या करावयाच्या समस्येला धक्का" लावतात. कथारचना व समस्यांचा परिपोष या दोन दृष्टींनी 'सुधारकां'त एवढे दोष काढल्यावर चुनेकर 'सामाजिक उपहासकाव्य' म्हणून 'सुधारका'कडे पाहतात व त्या दृष्टीने मात्र ते काव्य यशस्वी झाले आहे, असा निर्वाळा देतात. ते म्हणतात, "कथाकाव्य म्हणून 'सुधारक' अयशस्वी ठरले असले तरी ते त्याचे खरे स्वरूप नव्हेच. ते वेगळ्या जातीचे काव्य आहे... समाजदर्शन आणि

संसृतिटीका हे या समग्र काव्याला एकत्र सांधणारे सूत्र आहे, हे ध्यानी घेतल्यावर त्यातील विस्कळीतपणा, कथेचा अपुरेपणा हे दोष जाणवेनासे होतात, आणि या काव्यातील संगती दिसू लागते. ''

चुनेकर याप्रमाणे, निरनिराळ्या तीन दृष्टींनी ' सुधारका ' कडे पाहतात व त्याचे तीन प्रकारे मूल्यमापन करतात, यातच त्यांच्या भूमिकेमधील डळमळीतपणा जाणवतो. सुधारकाची जात, ते शेवटी म्हणतात त्याप्रमाणे, खरोखरच वेगळी आहे. तेव्हा त्याची जात ओळखूनच त्यावर टीका व्हावी. एक ' कथाकाव्य ' म्हणून त्याचे परीक्षण केल्यास किंवा ' समस्या-पूर्ति-काव्य ' म्हणून त्याचे मूल्यमापन केल्यास तो अप्रयोजकपणा होईल. चुनेकरांनी तीन विविध दृष्टींनी ' सुधारका ' ची महती मापल्यामुळे अशा अप्रयोजकपणाचा दोष त्यांना अल्पांशाने का होईना पण चिकटतो. ' सामाजिक उपहास-काव्य ' ही सुधारकाची जात आहे हे सांगताना चुनेकर स्पष्ट म्हणतात, की ' कथा-काव्य हे त्याचे खरे स्वरुप नव्हे. ' त्यामुळे त्याच्या कथारचनेत जे दोष ' कथाकाव्य ' या दृष्टीने आधी त्यांनी काढले त्यामधून ते थोडेफार मुक्त होतात. पण ' समस्यापूर्ति-काव्य ' म्हणून जे दोष त्यांनी आधी काढले त्यांचे काय ? तसे दोष काढणे अयोग्य होय, असे ते म्हणत नाहीत व ते दोष आपणाला मान्यच आहेत अशी वाचकांची समजूत होऊ देतात. पण सुधारक हे उपहासकाव्य असले तरी समस्यापूर्तिकाव्य नाही, हे स्पष्ट झाले पाहिजे. समाज आणि व्यक्ती जशा असतात तशा दाखवीत दाखवीत त्यांच्या अंतरंगातील असंगती, विसंगती, दंभ, स्वार्थ, लपवाछपवी, हीण वगैरेंची हृदय-भेदक जाणीव करुन देणे हा सुधारकाचा मुख्य उद्देश आहे. त्यामुळे, एखादे सुधारकी मत किंवा ग्रांथिक विचारसरणी सिद्ध करण्यासाठी त्यातील कथानकाला किंवा व्यक्ति-चित्रणाला कृत्रिम आकार पटवर्धनांनी दिलेले नाहीत, समस्यापूर्तीचा तो मार्ग अव-लंबिलेला नाही, हे योग्यच म्हटले पाहिजे. सद्विचारांचा, न्यायाचा, दयाबुद्धीचा किंवा तार्किक विचारांचा पक्ष नियती घेत नाही, लोकव्यवहार व व्यक्तिमन ही आपापल्या नियमांनी बांधलेली असतात, या रोकड्या वस्तुस्थितीत एक फार मोठी irony दडलेली आहे. -आणि ती irony सुधारकातील साऱ्या सामाजिक उपहासामागे अध्याहृत आहे. तेव्हा चुनेकरांच्या अपेक्षेप्रमाणे निरनिराळ्या सामाजिक समस्यांचा कृत्रिम परि-पोष किंवा निर्णय पटवर्धनांनी केला नाही यातच त्यांच्या काव्याची थोरवी आहे, असे म्हटले पाहिजे. सुधारकी विचार यशस्वी दाखवून, ध्येयनिष्ठ व सद्वर्तनी व्यक्ती सुखी करुन, पटवर्धनांनी काव्यलेखन केले असते तर कदाचित समस्यांचा परिपोष झाला असता, समस्यांची पूर्तीही झाली असती, पण तो सारा प्रकार तकलूपी ठरला असता संसृतीचे सत्य स्वरूप विदारक रीतीने दाखविण्याची ' सुधारका ' ची आजची शक्ती मग नष्ट झाली असती. सारांश, ' सुधारका ' कडे संसृतिटीका किंवा सामाजिक उपहास-काव्य म्हणून बघण्याची जी सुयोग्य दृष्टी ती चुनेकरांना काही मर्यादेपर्यंत जाणवली

अनुक्रमणिका

असली तरी पूर्णांशाने त्यांनी ती जाणलेली नाही आणि डळमळत्या भूमिकेवर ते उभे आहेत असा निष्कर्ष नाइलाजाने काढावा लागतो.

' नकुलालंकार ' या पटवर्धनांच्या तिसऱ्या खंडकाव्याचा विचार आपल्या समावेशक भूमिकेवरून चुनेकरांनी अनेक तऱ्हांनी केला आहे व त्याचे स्वरूप चांगल्या रीतीने उकलून दाखविले आहे. पण काव्य म्हणून नकुलालंकार विरहतरंगापेक्षा किंवा सुधारका-पेक्षा फार खालच्या दर्जाचे आहे हे त्यानी कुठेतरी स्पष्ट शब्दात नोंदवावयास हवे होते असे वाटते. ते त्यांनी सूचित केले आहे, पण तेवढ्याने वाचकाचे समाधान होत नाही.

पटवर्धनांच्या काव्येतर कर्तृत्वात त्यांची कोशरचना, छन्दःशास्त्रीय संशोधन, भाषा-शुद्धीची चळवळ, रुबायांची भाषान्तरे व साहित्यसमीक्षा यांचा प्रामुख्याने समावेश करावा लागेल. त्या सर्वांचा परामर्श चुनेकरांनी साक्षेपाने घेतला आहे. पण एकंदरीने बघितल्यास काव्यकर्तृत्वापेक्षा काव्येतर कर्तृत्वाकडे त्यांनी कमी लक्ष दिले आहे, असे म्हणता येईल. पटवर्धनांचा ' फार्शी-मराठी-कोश ' म्हणजे ऐतिहासिक साहित्यसंभाराचे आलोडन करून स्वतंत्रपणे केलेली नवनिर्मिती आहे; तीत पटवर्धनांची परिश्रमशीलता, चौरस व्यासंग, व भाषाशास्त्रीय सूक्ष्म दृष्टी यांचा उत्तम प्रत्यय येतो; या कोशामुळे मराठी अभ्यासकांची एक मोठी गरज पुरवलेली आहे;–हे चुनेकरांनी योग्य रीतीने स्पष्ट केले आहे. शिवाय, त्या कोशातील काही अपुरेपणावर व दोषांवरही त्यांनी बोट ठेवले आहे. पण इतिहास-संशोधक श्री. ग. ह. खरे यांनी १९४० साली लोक-शिक्षणाच्या मार्चच्या अंकात या कोशाचे जे समालोचन केले त्यात चुनेकरांनी काही मोलाची भर घातली आहे, असे दिसत नाही. कोशातील अपुरेपणा किंवा दोष दाखव-ताना ते आपल्या विधानांना आधार देत नाहीत, हेही आक्षेपार्ह होय. उदाहरणार्थ ' पटवर्धनांनी स्वतः पत्करलेला शब्दक्रमही...काटेकोरपणे पाळलेला नाही " " पट-वर्धनांची शब्दसामर्थ्यदृष्ट्या दुर्बलताही कोशात अर्थ देताना लक्षात येते " मराठीत येणारा शब्द प्रथमतः संस्कृतच्या वाटेने येणे अधिक संभवनीय आहे, याकडे पटवर्धन दुर्लक्ष करतात. " वगैरे महत्त्वाच्या विधानांची उदाहरणे चुनेकरांनी दिलेली नाहीत. (पृ. २६७ ते २६९)

' फार्शी-मराठी-कोशा'च्या मानाने छन्दशास्त्रीय संशोधनाचे अधिक व्यापक व खोल समालोचन चुनेकरांनी केले आहे. " मराठीतील लक्षावधी पदे पटवर्धनांनी सुमारे अडीचशे जातिप्रकारांत बसविली आणि जातिरचनेचे शास्त्र प्रथमच सिद्ध केले "; " छंदातील नियमितता पटवर्धनांनी दाखवून त्या लगत्वभेदातीत अक्षरसंख्याक पद्य-प्रकारातही कशी लयबद्धता असते ते दाखविले " " पटवर्धनांनी समग्र पद्यरचना-शास्त्राची उभारणीच पद्यातील अंतर्गत लयीच्या अनुरोधाने करून त्याप्रमाणे सर्व उपलब्ध पद्यरचनेची व्यवस्था लावून दाखविली, यात त्यांच्या कार्याचे मूलभूत क्रांतिकारकत्व आहे " " वृत्तनामकरणातील...घोटाळा पटवर्धनांनी अतिशय परिश्रमपूर्वक दूर करून

त्यात एकसूत्रीपणा आणला ” वगैरे चुनेकरांचे निष्कर्ष डोळस अभ्यासावर आधारलेले असून विद्वन्मान्य होण्यासारखे आहेत. (पृ. २९६ ते २९८) मात्र पटवर्धनांच्या छन्दःशास्त्रीय संशोधनावर जे मूलगामी आक्षेप घेतले गेले त्यांचा पुरेसा परामर्श चुनेकर घेत नाहीत व आपल्या विवेचनात एक महत्त्वाची उणीव राहू देतात. उदाहरणार्थ, ‘पद्य म्हणजे लयबद्ध अक्षररचना’ या पटवर्धनांच्या आद्य सिद्धान्तावर जो आक्षेप सहस्रबुद्धे व खाजगीवाले यांनी घेतला त्याचे निराकरण चुनेकर करीत नाहीत; तर डॉ. ना. ग. जोशांच्या ग्रंथाचा निर्वाळा देऊन त्यावर काम भागवितात (पृ. ३००) खुपेरकरशास्त्र्यांनी लयतत्त्व प्राचीनांना माहीत होते, तो पटवर्धनांचा नवा शोध नव्हे, हे लोकशिक्षणामधील ‘छंदोरचने’वरील आपल्या परीक्षणलेखात सविस्तर दाखवून दिले होते; आणि पटवर्धन खुपेरकरशास्त्र्यांच्या त्या टीकेला समाधानकारक उत्तर देऊ शकले नव्हते. पण चुनेकर तिकडे कानाडोळा करतात. “पद्यरचनेतील लयतत्त्वाचे प्रतिपादन पटवर्धनांनी प्रथम केले की तत्पूर्वी ते इतरांनी केले, हा प्रश्न गौण ठरावा” असा आपातरमणीय शेरा मारून ते खुपेरकरशास्त्र्यांच्या टीकेची शुद्ध बोळवण करतात. (पृ. २९५)

पटवर्धनांच्या भाषाशुद्धिविषयक भूमिकेचे मर्म चुनेकरांनी नीट जाणले आहे व उलगडून सांगितले आहे. “पटवर्धनांची चळवळ सर्वस्वी भाषिक होती. धार्मिक भेदाचे अधिष्ठान त्यात [ = तीत ] नव्हते;” “या चळवळीचा मुख्य रोख स्वभाषेविषयीची उपेक्षाबुद्धी नष्ट होऊन तिच्याविषयी अभिमान जागृत व्हावा हा आहे,” “भाषाशुद्धीवरील एक प्रमुख आक्षेप असा असतो, की या चळवळीतून अनेक विद्रूप शब्दांची कृत्रिम निपज होऊन भाषेचे स्वाभाविक सौंदर्य बिघडविले जाते”... “पण हा आक्षेप तपशिलासंबंधी आहे, त्याचा तत्त्वाशी संबंध नाही;” “भाषाशुद्धीच्या चळवळीवरील ...आक्षेप मुख्यतः भाषाशास्त्रीय किंवा साहित्यशास्त्रीय दृष्टिकोणातून घेण्यात आलेले आहेत, परंतु ही चळवळ केवळ भाषाशास्त्रीय, केवळ वाङ्मयीन नव्हती; ती सांस्कृतिक चळवळ होती” वगैरे अवतरणांवरून चुनेकरांनी पटवर्धनांची भूमिका वाचकांसमोर कशी मर्मग्राहीपणाने मांडली आहे, ते लक्षात येईल. (पृ. ३११ ते ३१३) पटवर्धनांची साहित्यसमीक्षा किंवा त्यांनी केलेली रुबायांची निरनिराळी भाषांतरे यांचे विवरणही चुनेकरांनी समावेशक रीतीने, नेमकेपणाने व तोलदारपणे केलेले आहे. जिज्ञासूंनी ते मुळातूनच बघावे.

**डॉ. द. न. गोखले**

## नववाङ्मयीन प्रवृत्ती व प्रमेये

लेखक : **प्रा. रा. ग. जाधव**

कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे ३० पृ. १७४ किंमत सहा रुपये

'नववाङ्मयीन प्रवृत्ती व प्रमेये' हे पुस्तकाचे नाव पुष्कळशी आश्वासने घेऊन आपल्या समोर येत असले तरी त्यात हाताळलेले विषय व नावातील आश्वासने यात पुष्कळच अंतर आहे. खरं म्हणजे या लेखसंग्रहाचे प्रमेयात्मक प्रश्नांची चर्चा करणारा भाग, विशिष्ट वाङ्मयीन वादांसंबंधीचा भाग व काही कलाकृतींची समीक्षा करणारा भाग असे तीन भाग करणे अधिक सुसंगत झाले असते. कारण एकतर या लेखांतील आशयानुरूप लेखांची तशी मांडणी होऊ शकेल आणि शिवाय जाधवांना सर्व लेखांना एका सूत्रात गोवणारा एखादा सिद्धांत वा दुवा मांडता आलेला नसल्याने लेखांची गटवारी करून त्या अनुषंगाने योग्य ठरणारे शीर्षक अधिक समर्पक ठरले असते असे वाटते.

जाधवांचा 'दलित साहित्याचा दृष्टिकोण' हा एक कसदार लेख आहे असे म्हणता येईल. दलित साहित्य व समाजाच्या आजच्या स्थितीचे जाधवांना झालेले दर्शन आणि आकलन, दलित साहित्यिकांना आजच्या कोंडीतून कसे बाहेर येता येईल व कशाच्या आधारावर या प्रश्नासंबंधीचे त्यांचे विवेचन विचारात घेण्यासारखे आहे. वास्तविक आज घडणाऱ्या पुष्कळशा सामाजिक घटनांमुळे दलितांचे प्रश्न व दलितांचे साहित्य हा अवघड विषय होऊन बसला आहे. त्यावर साधकबाधक वा मर्मभेदी चर्चा करणे व विचार व्यक्तविणे आजच्या स्फोटक परिस्थितीमुळे अशक्य झाल्यासारखेच आहे. त्यामुळे टीकाकारात दलित साहित्यासंबंधी एकतर शांतता आढळते किंवा भीतीपोटी वा अपराधी भावनेपोटी एखाद्या पुस्तकाचे व लेखकाचे अवास्तव कौतुकही ऐकायला मिळते. दलित साहित्यिकांनी घेतलेल्या काहीशा आक्रमक भूमिकेचा हा परिणाम. अशा वेळी जाधवांनी अतिशय निःपक्षपातीपणाने व पुरेशा गंभीरपणे या विषयाकडे पाहिले हीच फार मोठी गोष्ट आहे.

दलित समाज व निग्रो समाज दलित साहित्य व निग्रो साहित्य यांतील साधर्म्य शोधून निग्रो साहित्याकडून दलित साहित्याने स्फूर्ती घेण्याचा प्रयत्न करणे फारसे हितावह किंवा फायदेशीर नाही हे जाधवांनी स्पष्ट केले असून आंबेडकरांनी केलेल्या बौद्ध धर्म स्वीकाराचा सामाजिक, सांस्कृतिक व साहित्यिक संदर्भ लक्षात आणून दिला आहे. आंबेडकरांसारखा द्रष्टा बौद्ध धर्माकडे वळतो या घटनेतच एक सांस्कृतिक व साहित्यिक मार्गदर्शन गृहीत आहे. म्हणूनच बुद्धतत्त्वज्ञान दलित विचारवंतांचे व साहित्यिकांचे दार्शनिक अधिष्ठान होईल असे जाधवांना वाटते. मराठी दलित साहित्यास

अनुक्रमणिका

(व एकूण दलित साहित्यास) नव्या धर्मग्रंथांची व पुराणांची जरुरी आहे हे त्यांचे म्हणणे मान्य केले तरी पुराणे, दंतकथा व धर्मग्रंथ आज विसाव्या शतकात कसे उभे राहू शकतात हाच खरा प्रश्न आहे व जाधवांनी तो लक्षात घेतलेला दिसत नाही. मला वाटते की, अशी पुराणे, दंतकथा व धर्मग्रंथ आवश्यक असले तरी कालबाह्य आहेत. कोणी ती निर्मिण्याचा कृत्रिम प्रयत्न केला तर तो अल्पजीवी ठरेल.

पुराणे, दंतकथा व धर्मग्रंथांना आजचा कालखंड अनुकूल नाही हे उघडच आहे. आज शास्त्र उद्योग व अर्थक्षेत्रातील घडामोडींमुळे आयुष्याचा रचनाबंध ( Pattern ) इतका भरभर बदलत आहे की पुराणे, धर्मग्रंथ व दंतकथा निर्मितीस आवश्यक असणारे काहीसे स्थिर समाजचित्र ( Social Pattern ) आजच्या लेखकास उपलब्ध होणे अशक्य आहे. शिवाय अशा प्रकारच्या निर्मितीस ज्या समाजमान्यतेची आवश्यकता असते तीदेखील आजच्या संशययुगात ( age of doubt ) मिळणेही कठीण आहे. एक ऐतिहासिक कारण असणेही संभवनीय आहे. पुराणे, दंतकथा व धर्मग्रंथ ही बव्हंशी सरंजामदारीपूर्व काळाची किंवा फार तर सरंजामदारीच्या सुरुवातीच्या काळाची अशी खास निर्मिती आहे. वर्गविरहित समाजाचा तो सांस्कृतिक आविष्कार असून त्यामागील प्रेरणा ही एकसंध समाजाची आहे. आजच्या वर्गाधिष्ठित लोककल्याणकारी व लोकशाही समाजरचनेच्या संदर्भात अशी एकसंधता आणणेच अशक्य असल्याने पुराणे, धर्मग्रंथ व दंतकथांची निर्मिती अशक्य आहे. म्हणून दलितांनी आपल्या 'दुःखयात्रेच्या अर्थतीर्थाचे' दर्शन घडवावे हे जाधवांचे म्हणणे योग्य असले तरी त्यासाठी पुराणकथा इ. सुचवलेले मार्ग अव्यवहार्य वाटतात.

दलितांनी आपल्या इतिहासाचा खरा शोध घ्यावा. आपले एकसंध सामूहिक मन जाणून घ्यावे. त्याचबरोबर आजूबाजूच्या घटनांशीही संपर्क साधून आपल्याला जाणवलेल्या विषयांवर आपणच लिहावे हे जाधवांचे म्हणणे कोणालाही स्वीकार्य वाटावे. दलित साहित्यात एखादी लिऑन युरिसच्या 'एक्झोडस' किंवा होमरचा 'ऑडिसी' सारखी कलाकृती निर्माण होईल तेव्हाच दलित साहित्य आपल्या समाजाच्या स्वत्वशोधनाच्या करुणोदात्त भटकंतीचे चित्रण करण्यास समर्थ झाले असे बहुतेकांना म्हणता येईल, हे जाधवांचे म्हणणे मान्य होईल. दलित साहित्यिकांनी किती दूरवरचे ध्येय आपल्यासमोर ठेवायचे आहे व हा रस्ता किती लांबचा आणि अवघड आहे हेच जाधवांनी दाखवून दिले आहे. जाधवांचे दलित साहित्यासंबंधीचे विवेचन त्यांच्या अभ्यासाची, तळमळीची व आस्थेची साक्ष देते.

यानंतर जाधवांच्या पुस्तकातील अखेरचा लेख 'ऐतिहासिक साहित्याचा सांस्कृतिक संदर्भ' विचारात घेऊ. हा लेख वाचल्यावर एक गोष्ट लगेच जाणवते की, जाधव एखाद्या प्रश्नाचा फार मोठा आवाका लक्षात घ्यायची महत्त्वाकांक्षा बाळगतात व त्याचा परिणाम म्हणून अनेक प्रश्नांची व संकल्पनांची गल्लत करतात किंवा

अनुक्रमणिका

संकल्पनाप्रसरण करतात. या लेखात जाधव ऐतिहासिक साहित्य व त्याच्या साहित्यिक संदर्भापुरतेच मर्यादित विचार व विवेचन करते तर त्यांच्या अपेक्षेप्रमाणे एतिहासिक प्रवत्तीचे 'सांस्कृतिक व वाङ्मयीन संदर्भातील अर्थ' त्यांना सापडण्याची शक्यता होती. परंतु विशिष्ट चौकटीत विचार व विवेचन करण्याचे भान न राहिल्याने अधिकाधिक व्यापक स्वरूपाची विधाने ( General statements ) करण्याचा त्यांना मोह होतो. उदा. 'इतिहासाची वाङ्मयक्षमता स्थूलमानाने तात्त्विक स्वरूपाची असते' (पा. १५५) किंवा 'प्रादेशिकतेची प्रवृत्ती व ऐतिहासिक प्रवृत्ती यांच्यात काही एक अर्थपूर्ण पौर्वापर्य संभवते काय?' (पा. १६५) असला स्वीकृत चौकटीबाहेरचा प्रश्न घेऊन त्याला उत्तर शोधण्याचा अनावश्यक व कृत्रिम खटाटोप करीत बसतात. म्हणूनच त्यांना 'सोयीने' वाटते की, प्रादेशिक साहित्य हे प्रादेशिक संस्कृतीच्या इतिहासाचे साहित्य आहे. वास्तविक प्रादेशिक साहित्यात आज विशिष्ट प्रदेशात असलेली वैशिष्ट्यपूर्ण मानवी संस्कृती व तिचे आविष्कार आणि तेथील वैशिष्ट्यपूर्ण निसर्ग यांचे चित्रण व त्यांचे परस्परावलंबित्व असते असे म्हणता येईल. परंतु ऐतिहासिक वाङ्मयाचा विचार करताना प्रादेशिक संस्कृतीचा इतिहास व प्रादेशिक वाङ्मय यांची तुलना करण्याचीच जाधव ईर्षा बाळगतात.

स्वातंत्र्योत्तर काळात ऐतिहासिक वाङ्मयाचे जे अलोट पीक आले आहे त्याची कारणे ( Genesis ) जाधव शोधतात. त्यांच्या मते ( १ ) लोकशाही जीवनपद्धतीचा स्वीकार, ( २ ) भारतीय समाजाची स्वत्व समजण्यासाठी इतिहासातल्या प्रेरणा शोधण्याची धडपड, ( ३ ) आपले जीवनविषयक इत्यर्थ इतिहासावर लादण्याचा प्रयत्न ही तीन कारणे अलीकडील ऐतिहासिक वाङ्मय-निर्मितीमागे आहेत. जाधवांचा हा विचार हायपॉथेसिसच्या स्वरूपाचा असल्याने त्याच्याकडे फार काटेकोरपणे न पाहता त्यांचा पुढला मुद्दा पाहू. सद्यःकालात अभिजात मनोवृत्तीचा कलह आहे असे विधान जाधव करतात. आता अभिजात मनोवृत्ती या संज्ञेने जाधव काय मांडतात हे स्पष्ट होत नाही. जर अभिजात हा क्लासिकलला समानार्थी म्हणून शब्द मानला असेल तर जाधवांच्या शब्दयोजनेत काहीतरी गडबड होत आहे. ते तर चक्क मराठीतल्या स्वच्छंदतावाद्यांनाच ( Romantics ) अभिजातप्रवृत्तीचे ( Classicists ) मानतात. शिवाय अभिजात मनोवृत्तीचा कलह नेमका कसा होत आहे किंवा चालू आहे हे जाधव दाखवीत नाहीत. त्यांच्या मते रणजित देसाई, वसंत कानेटकर, इनामदार, यशवंत वगैरे ऐतिहासिक साहित्य निर्मिणारे 'अभिजाततेच्या शोधाची सफर' करतात, म्हणजे ते नेमके काय करतात ? 'अभिजाततावादाच्या दृष्टीने सांस्कृतिक संदर्भात वाङ्मयीन ऐतिहासिकतेला महत्त्व आहे' ( पा. १५८ ) हे जाधवांचे म्हणणेही फारच संदिग्ध ( vague ) असून त्यातून नीट अर्थनिष्पत्ती होत नाही.

अशा प्रकारची विधाने करण्याची जाधवांना सवयच लागल्याची साक्ष या पुस्तकात

सर्वत्र दिसते. उदा. इतिहासाच्या वास्तवात अभिजात मनोवृत्तीला व्यवस्था आढळते. कारण इतिहास हा शास्त्रात काय वा वाङ्मयात काय गतकालाची एक पुनर्रचना करीत असतो. अशा पुनर्रचनेचा प्राथमिक सांगाडा योग्य त्या इतिहासाभ्यासाने लेखक कवीला तयार करता येतो ! हे जाधवांचे विधान. वस्तुत: जाधवांनी उल्लेखिलेले ऐतिहासिक साहित्यकार अभिजात मनोवृत्तीपासून खूप दूर आहेत असे मला वाटते. मूलत: हे सर्व लेखक स्वच्छंदतावादी प्रवृत्तीचे व स्वप्नजग निर्माण करणारे आहेत. त्यांना अभिजात मनोवृत्ती चिकटविण्याचे काय कारण ?

नायकाच्या शोधात असलेली मनोवृत्ती ( जाधवांच्या मते अभिजात ) इतिहासाकडे वळताना निर्नायकी वर्तमानकाळाच्या प्रेरणा विसरू शकत नाही. म्हणून नायकातील न नायकी सामान्यपणही ती दाखविते व यातून एक अर्थपूर्ण विरोधाभास होतो असे जाधवांना वाटते. याच संदर्भातील त्यांचा एक परिच्छेद त्यांच्या विवेचनपद्धतीचा व शैलीचा विचार करण्यास उपयोगी पडेल.

' साधारणाच्या म्हणजे सर्वसामान्य लौकिक विचारविकारांच्या व गुणदोषांच्या काळकचाट्यात सापडलेली ऐतिहासिक वैभूतिकता म्हणजे विभूतिमत्त्वाचे अवमूल्यन नव्हे किंवा त्याविषयीची उपेक्षा वा आशंकाही नव्हे. असामान्याच्या अस्तित्वाची ती विरोधात्मक प्रचीती आहे. नायकत्वाच्या ध्यासाची ती प्रतीकात्मक प्रतिलिपी आहे. एका मनोमय संघर्षाच्या विरोधी दाबाचे ते चिन्हांकन आहे. विद्यमानांच्या अंत:सत्त्वाचा ( ethos ) हा उलटा ताण आहे. ' (पा. १६३) ह्यात जाधवांना म्हणायचे आहे की, आधुनिक ऐतिहासिक साहित्यकार ऐतिहासिक नायकाचे जे चित्रण करतात त्यात काही प्रमाणात नायकांना सामान्य माणसासारखे जाणता अजाणता दाखविले जाते, कारण हे लेखक विसाव्या शतकातील असून विसाव्या शतकाचा प्रभाव त्यांनी केलेल्या व्यक्तिचित्रणांवर पडणे अटळ आहे. आता हा अर्थ वरील परिच्छेदात स्पष्ट होत नाही, यालाच मी संदिग्धता म्हणतो व ही संदिग्धता भाषेच्या आत्यंतिक अलंकारिक वापरामुळे व प्रभावी लेखनाच्या भ्रामक कल्पनेमुळे आलेली आहे. गुणदोषांचा कालकचाटा ' ' नायकत्वाचा ध्यास ', ' विरोधी दाबांचे चिन्हांकन ', ' विद्यमानाच्या अंत:सत्वाचा उलटा ताण ' ही अलंकारिक शब्दयोजना व असामान्यांचे अस्तित्त्व, प्रतीकात्मक प्रतिलिपी यासारखी अनुप्रासात्मक शब्दरचना संदिग्धतेत व क्लिष्टतेत भरच घालते. मूळ अर्थाचे वहन (Communication) करण्यासाठी त्यांचा काहीही उपयोग होत नाही.

सध्याच्या भारतीय समाजास सांस्कृतिक पुनरुज्जीवनाचा नीट अर्थ समजला नसल्यामुळे ऐतिहासिक साहित्यिकांनाही तो समजला नाही. पण यातून मार्गही साहित्यिकच काढू शकतील असे जाधवांना वाटते म्हणून ते ' एक दिशा ' सुचवितात. येथील ' प्रांतविशिष्ट समाजाला ' असलेला इतिहास भारतीय इतिहासाचे प्रतीक म्हणून साहित्यकृतीद्वारा चित्रित केल्यास त्या सांस्कृतिक पुनरुज्जीवनाची ' नीटस व नेमकी

अभिज्ञता ' समाजास व त्याआधी साहित्यिकांस होईल असे जाधव मानतात. ह्या ठिकाणी जाधवांची इतिहास ही शब्दयोजना चुकीची आहे असे वाटते. ( त्याएवजी संस्कृती हा शब्द योग्य होईल.) त्यांमुळे ' सांस्कृतिक पुनरुज्जीवनाचा जो अर्थ समाज करू शकत नाही तो कदाचित एतिहासिक साहित्य करू शकेल ' हे त्यांचे मतही ग्राह्य नाही. खरे म्हणजे या ठिकाणी त्यांना क्लासिकल लिटरेचर म्हणजे अभिजात साहित्य असे म्हणायचे असावे व तसे म्हणणे मान्य होण्यासारखे आहे. परंतु ते तर स्वच्छंदतावाद्यांनाच अभिजात प्रवृत्तीचे मानतात. यामुळे वरील शंकेला वाव नाही.

जाधवांच्या विवेचनातील संदिग्धतेमुळे, अलंकारिक आणि काव्यात्म भाषेमुळे त्यांचा या संग्रहातील मध्यवर्ती लेख व्यस्ततावादी मनोवृत्ती आणि वाङ्मय विस्कळित बनला आहे. जाधवांनी आपले आधार ( Sources ) कोठेही दिलेले नाहीत. त्यामुळे काही वाचनानंतर केलेले हे विचारांचे संकलन आहे की काय असे वाटते. व्यस्त हा absurd व व्यस्ततावादीमनोवृत्ती हा absurdism ला प्रतिशब्द जाधव वापरीत असावेत. जाधवांचे प्रतिशब्द या अर्थाने घेतल्यास व्यस्ततावाद ही एकसंध प्रणाली आहे असे मानणे चूक होईल. व्यस्ततावादाला एकच प्रणाली मानण्यात जाधवांनी चूक केलेली आहे. व्यस्ततावादाची अनेक रूपे आहेत, अनेक व्याख्या आहेत. त्यासंबंधीचे विवेचन आवश्यक होते. ही मूलभूत चूक झाल्यामुळे सर्व लेखभर सर्वसामान्य विधानाचे अस्तित्व का आहे हे स्पष्ट होते. नेमकेपण व शास्त्रीय मांडणी आढळत नाही. व्यस्ततावादासाठी मागील वेगवेगळ्या विचारवंतांच्या जाणिवांत काहीसे साधर्म्य आहे. म्हणून व्यस्ततावाद ही एकसंध चीज असावी असा जाधवांचा तर्क दिसतो. त्यामुळे व्यस्ततावादाचे प्रश्न ' देह असण्याचे आहेत, देह कसा असावा याचे नाहीत ' अशी विधाने जाधव करतात. व्यस्ततावादासंबंधीचे वेगवेगळ्या तत्त्वज्ञांचे वेगवेगळ्या संदर्भात मांडलेले मुद्दे जाधव एकामागून एक पण आधार न देता मांडतात. त्यामुळे व्यस्ततावादातही आत्मविसंगती कशी निर्माण होते, हे ते समजू शकत नाहीत. एकाकीपणा, विद्रोह, आत्मद्रोह इत्यादी पूर्णपणे व्यक्तिवादी कसोट्या स्वीकारल्यानंतर व प्रचलित कसोट्या नाकारल्यानंतर (पा. ९९ ) तसेच वाङ्मयाची स्वतंत्र व्याख्या दिल्यानंतर अन्यत्र मानण्यात आलेली श्रेष्ठ वाङ्मयाची संकल्पना व्यस्ततावादाच्या चौकटीत कशी बसू शकते ? श्रेष्ठ वाङ्मय हा शब्द वापरण्याचा व्यस्ततावादी अट्टाहास करीत असले तर त्यांनी सर्वसाधारणपणे मानण्यात आलेले श्रेष्ठ वाङ्मय व व्यस्ततावादाला अभिप्रेत असलेले श्रेष्ठ वाङ्मय असे श्रेष्ठ वाङ्मयाचे दोन प्रकार स्पष्टपणे दाखविणे आवश्यक आहे. पण असे काही न करता व्यस्ततावादी ( की जाधव ? ) श्रेष्ठ वाङ्मयाची व्याख्या देतात. ' व्यक्तिजीवनातील व्यस्ततेचा गुण व संख्या या दृष्टीनी ' विस्तृत, सूक्ष्म प्रत्यय देणारे जे वाङ्मय ते श्रेष्ठ वाङ्मय होय. ' ( पा. ९९) ही व्याख्या कोणा व्यस्ततावादी विचारवंताने दिलेली आहे की आपण स्वतः दिलेली आहे हे जाधवांनी स्पष्ट करणे आवश्यक होते. म्हणजे ही आत्मविसंगती व्यस्ततावादी

अनुक्रमणिका

विचारात आहे की जाधवांच्या विवेचनात आहे हे वाचक समजू शकला असता. जाधवांचे यापुढील व्यस्ततावादी वाङ्मय व समीक्षेसंबंधीचे विवेचनही खूप 'गोंधळाचे (Confused) आहे.

या पार्श्वभूमीवर जाधव 'केशवसुतांची व्यस्ततावादी प्रस्फुरणे' या लेखात केशवसुतां-सारख्या स्वच्छंदतावाद्याला 'व्यस्ततावादी प्रस्फुरणांचा' जनक का बनवितात हे समजते. वास्तविक एकाकीपणाची जाणीव, निराशा, दैहिक बंधनांची जाणीव या गोष्टी काही केवळ व्यस्ततावादी प्रणाली वा व्यस्ततावादी वाङ्मयाची मक्तेदारी नाही. स्वच्छंदतावाद, अध्यात्मवाद व काही प्रमाणात अभिजाततावादातही वरील गोष्टींचा आदळ होणे स्वाभा, विक आहे. जाधवांनी वरील जाणिवा व्यस्ततावादी वाङ्मयात कशा वेगळेपणाने अभिव्यक्त होतात हे सांगितले असते तर त्यांचे विवेचन महत्त्वपूर्ण ठरले असते. याऐवजी स्वच्छंदतावादी वाङ्मयात अलग एखादी इत्यादी शब्द अथवा 'संकल्पना आल्या' की ते व्यस्ततावादी प्रस्फुरण' आहे असा शिक्का मारण्याचा टोकलेबाज प्रयत्न दुर्दैवाने जाधव करतात. उदा०

(१) सूर्यचंद्रादिक दूर इथूनि तारे,
तसे जग हे मानितो अलग सारें। (पान १०४)

(२) काळोखाच्या जगामध्ये या। मृत आशांच्या चितांवरुनिया
पिशाच माझे भटकत आहे– शांति नसेचि तया। (पा. १०५)

(३) मी संध्यासमयी खुशाल गिरणातीरावरी बैसुनी
कालक्षेप करीन उन्मन असा वेड्यापरी गाउनी। (पा. १०६)

वरील उदाहरणांतील अलग, मृत, आशांच्या चितांवरचे पिशाच, उन्मन असा-वेड्यापरी हे उद्गार इत्यादी गोष्टी स्वच्छंदतावादातही असू शकतात हे जाधवांना माहीत असावे यात शंका नाही. तेव्हा स्वच्छंदतावादी प्रस्फुरण व व्यस्ततावादी प्रस्फुरणे यातील साम्यभेद दाखविणे आवश्यक होते. नाही तर स्वछंदतावादी प्रस्फुरण व व्यस्ततावादी प्रस्फुरण यांतील भेदरेषा अत्यंत अस्पष्ट होतात. तेव्हा स्वच्छंदतावादी वाङ्मयातील प्रस्फुरणांना व्यस्ततावादी प्रस्फुरणे' मानताना योग्य ते स्पष्टीकरण (सैद्धांतिक) आव-श्यक होते. पण हे स्पष्ट न केल्यामुळे केशवसुतांना 'व्यस्ततावादी प्रस्फुरणांचा' जनक दाखविण्याचा हा सारा खटाटोप ओढाताणीचा व निरर्थक वाटतो.

**अशोक कृष्णाजी जोशी**



## वैदिक संस्कृतीचे पैलू

लेखक : **चिंतामणि गणेश काशीकर**, वाङ्मयविशारद,

**डी. लिट्.**, टिळक महाराष्ट्र विद्यापीठ सुवर्ण महोत्सव ग्रंथ क्र. ७, पुणे, १९७२.

डॉ. काशीकर यांच्या वैदिक वाङ्मयविषयक ५४ लेखांचा हा संग्रह. यांतील पुष्कळसे लेख १९६७–६८ साली रविवारच्या साप्ताहिक 'केसरी' मधून प्रसिद्ध झाले होते. त्यांत आणखी काही लेखांची भर घालून लेखकांनी या पुस्तकाचे रूपाने एकत्रित स्वरूपात ते वाचकांच्या पुढे ठेविले आहेत. 'केसरी' तून प्रसिद्ध झालेल्या मूळच्या काही लेखांच्या मांडणीत थोडाफार फरक केल्याचा व मूळचे काही स्वतंत्र असलेले लेख एकत्र केल्याचा उल्लेख लेखकांनी प्रस्तावनेत केला आहे.

या लेखसंग्रहाचे प्रयोजन व त्यातील विषयप्रतिपादनाच्या मर्यादा यांचा लेखकांनी प्रस्तावनेत निर्देश केलेला आहे. संशोधकाच्या भूमिकेवरून हे पुस्तक लिहिलेले नाही असा स्पष्टपणे खुलासा करून ते सांगतात की, वैदिक वाङ्मयात संस्कृतीच्या विविध अंगांचे जे दर्शन होते त्याला शब्दरूप देऊन त्यांच्या आधारे बहुश्रुत शिक्षित वाचकांपुढे वैदिक मनुष्याचे एक संकलित चित्र उभे करावे असा या पुस्तकाचा उद्देश आहे( प्रस्तावना पृ. १५–१६ ).हे चित्र अधिक स्पष्ट व्हावे म्हणून योग्य अशी पार्श्वभूमी तयार करण्याच्या दृष्टीने त्यांनी प्रस्तावनेमध्ये वैदिक संस्कृती भारतात आणणाऱ्या आर्य लोकांची पूर्वपीठिका, वैदिक वाङ्मयाचा विस्तार, वेदशाखांची उत्पत्ती व सद्यःस्थिती इ. विषयांची वाचकांस माहिती करून दिलेली आहे.

या संग्रहातील लेखांचे स्वरूप सामान्यतः पुढीलप्रमाणे सांगता येईल. प्रारंभी एक निवडक वैदिक अवतरण उद्धृत केले असून नंतर त्याचा अर्थ दिला आहे व पुढे त्यावर सुगम असे विवरण केलेले आहे. अनुक्रमणिकेवर सहज दृष्टिक्षेप टाकल्यास लेखांच्या मांडणीत एक सुसंगत व तर्कशुद्ध असा क्रम ठेवल्याचे दिसून येते. विषय विभागाच्या दृष्टीने संग्रहातील लेखांचे स्थूलमानाने पुढीलप्रमाणे वर्गीकरण करता येईल. पहिले दोन लेख प्रास्ताविक स्वरूपाचे असून ३–२२ या लेखांत निसर्गशक्तींची प्रतीके असलेल्या प्रमुख वैदिक देवतांची ओळख करून दिलेली आहे. त्यांतील शेवटची प्रजापति ही देवता विचारमंथनातून स्वाभाविकपणे उत्क्रांत झालेली असून पुढील यज्ञकांडात तिचे स्थान महत्त्वाचे असल्याने तिला देवताविचार व यज्ञकांड या विभागांना जोडणारा दुवा मानता येईल. २३–३७ या लेखांत इष्टी, सोमयाग, चयन असे श्रौत तसेच विवाहादि गृह्य विधी आणि त्यांशी निगडित असे आनुषंगिक विषय चर्चिले आहेत. ३८–४० या लेखांत वेदकालांतील ज्ञान आणि विज्ञान हे विषय येतात. त्यापुढील

अनुक्रमणिका

४१–५३ या लेखांत व्यक्ति, कुटुंब व समाज यांशी निगडित अशा कला, व्यवसाय, आकांक्षा इ. विविध विषय चर्चिले आहेत. शेवटच्या लेखात ऋग्वेदातील अंतिम ( १०-१९१ ) संज्ञानसूक्तामधील मंत्राच्या आधारे उपसंहार केला आहे. मूळचे लेख स्फुट स्वरूपाचे असले तरी त्यांची पुस्तकरूपाने फेररचना करताना एक विशिष्ट सूत्र ठेवल्याने संकलित स्वरूपातही ते तसेच वाचनीय झाले आहेत.

डॉ. काशीकरांच्या या लेखांची भाषा अत्यंत प्रवाही व सुबोध आहे. आवश्यक तेथे संक्षेप व विस्तार हे त्यांच्या शैलीचे विशेष म्हणून सांगता येतील. वैदिक देवतांची शब्दरूपे त्यांनी वेचक विशेषणांच्या द्वारे आणि मोजक्या शब्दात उभी केली आहेत. तर यज्ञकांडासारखा गुंतागुंतीचा विषय किंवा वेदांतील ज्ञान आणि विज्ञान हे विषय आवश्यक तेवढ्या विस्ताराने त्यांनी मांडले आहेत. तसेच श्रौत हा त्यांच्या विशेष अभ्यासाचा विषय असल्याने या संग्रहांतील लेखावर त्याची छाप जागोजाग पडलेली आहे, याचीही त्यांना जाणीव आहे ( प्रस्तावना पृ. १५ ).

या संग्रहातील लेखांचा धावता परामर्श डॉ. रा. ग. हर्षे यांनी ' संपादकीय मनोगतात ' ( प्रस्तावना पृ. ४–५ ) घेतला आहे. काही निवडक स्थळांचा येथे उल्लेख करणे अनाठायी होणार नाही.

डॉ. काशीकरांनी रंगविलेली वैदिक देवतांची शब्दचित्रे अगदी बोलकी आहेत. इंद्राचे दर्शन ( प्र. ७ ) त्यांनी सर्व कोनांतून घडविले असून त्याच्या वैदिक व वेदोत्तर काळातील बदलत्या रूपाचाही ते निर्देश करतात. मात्र त्याची वेदांतील दुर्दम्य उत्साहमूर्तीच त्यांना विशेष विलोभनीय वाटते. समाजाच्या प्राथमिक अवस्थेत पूषन्च्या रूपाने सूर्याच्या विशिष्ट कार्याची ऋषींनी केलेली मनोहर अशी दैवतकल्पना डॉ. काशीकरांनी चांगल्या तऱ्हेने उकलून दाखविली आहे ( पृ. २६ ). तथापि या सर्व चित्रांत देवमाता अदिति ( प्र. १६ ) हिचे चित्र अत्यंत उदात्त व रमणीय आहे. विजेच्या लखलखाटाने उजळलेला गर्जना करणारा मेघ हे रुद्र-शिवाचे ( प्र. १९ ) निसर्गरूप असल्याचे म्हणून त्या उग्र रूपाला सौम्य रूपाचीही जोड असल्याचे ते सांगून टाकतात. कालिदासाच्या कुमारसंभवात पार्वतीच्या तोंडी घातलेल्या शिवाच्या परस्परविरोधी रुपांची या ठिकाणी सहजच आठवण व्हावी.

श्रौत हा डॉ. काशीकरांचा विशेष तयारीचा विषय. त्यांच्या श्रौतग्रंथांच्या सखोल चिकित्सक अभ्यासाला अनेक यागांच्या अनुष्ठानात प्रत्यक्ष भाग घेतल्याने मिळालेल्या अचूक प्रायोगिक ज्ञानाची जोड लाभलेली आहे. असे असताही या तांत्रिक व जटिल विषयाच्या विवेचनात पारिभाषिक क्लिष्टता न आणता तो त्यांनी अत्यंत सोप्या शब्दांत समजावून दिलेला आढळेल. येथे आपणास त्यांच्यामधील कुशल शिक्षकाची ओळख होते.

जीवनविषयक तत्त्वज्ञान हे प्रत्येक संस्कृतीचे महत्त्वाचे अंग असते. जीवनाची मूल्ये ( प्र. ३५ ) या लेखात प्राचीन भारतीयांनी जोपासलेल्या दयादानादि नीतितत्त्वांचे

विवरण केल्यावर कृतज्ञतेवर आधारलेल्या ऋणकल्पनेवर डॉ. काशीकरांनी भर दिला आहे. तसेच प्राचीन भारतीयांनी ऐहिकापेक्षा पारलौकिकाची चिंता अधिक वाहिली हा सार्वत्रिक समज खरा नव्हे ( पृ. ३६ ), असे म्हणून त्याउलट भौतिक जीवन तुच्छ नसून ते चांगल्या तऱ्हेने जगावे, जीवनाचा आनंद भोगावा अशी त्यांची धारणा होती असे ते आवर्जून सांगतात ( पृ. १२३ ).

वैदिक काळात झालेल्या वैज्ञानिक प्रगतीचा आढावा घेताना डॉ. काशीकरांनी आपला दृष्टिकोण आग्रही स्वरूपाचा ठेवलेला नाही. वैद्यकाच्या वैदिक वाङ्मयातील दिसून येणाऱ्या स्वरूपावरून त्यास शास्त्र म्हणता येणार नाही; तथापि त्यात शास्त्राची सुप्त बीजे आहेत हे नाकबूल करता येणार नाही, असा समतोल अभिप्राय ते व्यक्त करतात ( पृ. १४० ).

पुस्तकात क्वचित किरकोळ स्वरूपाचे दोष राहून गेले आहेत. उदाहरणार्थ, पृ. ११-१२ वर पंजाब व अफगाणिस्थान येथे लागोपाठ ऊन व पाऊस अशा पावसाळी हवामानाचा अनुभव बारा महिने येत असेल अशा अर्थाचे विधान आहे. परंतु हे दोन्ही विषम हवामानाचे प्रदेश असल्याने वरील विधान वस्तुस्थितीशी विसंगत वाटते. पृ. १६ प्र. १० मध्ये आदित्य ही सूर्यदेवता असल्याचे म्हटले आहे. या म्हणण्यास वैदिक वाङ्मयात आधार नाही; मात्र वेदोत्तर वाङ्मयात आदित्य या १२ सूर्यदेवता असून त्या १२ महिन्यांशी संबंधित असल्याचा उल्लेख येतो, असे मॅक्डोनेल् म्हणतो Vedic Mythology, p. 42 ). पृ. १०० वर ३७ व्या प्रकरणाच्या आरंभीच्या) वैदिक अवतरणाचा अर्थ देण्याचे राहून गेले आहे.

याखेरीज काही मुद्द्यांसंबंधी मतभेद उत्पन्न होण्याजोगा आहे. प्रकरण ४ व ५ मधील नद्यांच्या संदर्भात ऋग्वेदातील प्रसिद्ध अशा विश्वामित्र-नदी-संवादाचा ( ऋ. ३·३३ ) उल्लेख यावयास हवा होता. ऋग्वेदातील मंडूकसूक्तास ( ७·१०३ ) प्राचीन ऋषींच्या रसिकतेचे द्योतक ( प्र. ४१ ) म्हणून म्हणण्यापेक्षा मिष्कीलपणाचे द्योतक म्हणणे अधिक समर्पक वाटते. मुखपृष्ठावरील चित्रातील करतलदर्शन वैदिक संस्कृतीचे प्रतीक आहे. वेदकाळात अन्न, वस्त्र व निवारा या मनुष्याच्या प्राथमिक गरजा सहज भागू शकत असे सुचविण्याचा त्यातील हेतू अगदी स्पष्ट आहे. मात्र वस्त्राचे प्रतीक म्हणून दाखविलेला चरखा कालदृष्ट्या विसंगत वाटतो. त्याऐवजी वेदकाळाला अनुरूप अशी दुसरी एखादी वस्तू अधिक स्वाभाविक वाटली असती.

पुस्तकाच्या शेवटी शुद्धिपत्र जोडलेले आहे. त्याखेरीज काही अशुद्ध स्थळे अधून-मधून आढळतात. शुद्धिपत्राप्रमाणे दुरुस्त करावयाचा 'मंत्रीत' हा शब्द पृ. ९ ओ. १ मध्ये मिळत नाही. तसेच पृ. ७ ओ. २. 'आप्' ऐवजी 'अप्', पृ. ५४ ओ. २४ 'ऋग्वेदात' ऐवजी 'ऋग्वेद्यात', पृ. १२६ ओ. ३ 'समृद्धी' ऐवजी 'समृद्ध', पृ. १३८ ओ. १४ 'सामर्थ' ऐवजी 'सामर्थ्य' अशा दुरुस्त्या करावयास पाहिजेत

मराठीत प्रसिद्ध होणाऱ्या पुस्तकात वेदविषयक साहित्याचे प्रमाण अगदीच कमी आहे. अशा स्थितीत वैदिक संस्कृतीच्या व्यापक स्वरुपाची यथार्थ कल्पना देणाऱ्या या पुस्तकाच्या रूपाने मराठीच्या ग्रंथसंपत्तीत एक उपयुक्त अशी भर घातल्याबद्दल डॉ. काशीकर यांचे अभिनंदन करणे उचित आहे.

**डॉ. पु. द. नवाथे**

## मराठी बखरीतील फार्सीचे स्वरूप

लेखक : **डॉ. युसूफ महम्मद पठाण, औरंगाबाद.**

( १९७३ ), पृष्ठे ८४२, किंमत रु. ३५.

वरील पुस्तक हा मुळात पुणे विद्यापीठात लेखकाने लिहिलेला पदव्युत्तर परीक्षेचा प्रबंध होता. तो आता मुद्रित व सुधारलेल्या स्वरुपात आपल्यापुढे येत आहे. डॉ. पठाण यांचे हे काम पुणे विद्यापीठातील विद्यार्थ्यांनी डॉ. शं. गो. तुळपुळे यांच्या मार्गदर्शनाखाली मराठी अध्ययनात जी उत्कृष्ट भर घातली त्यांपैकी एक होय.

पुस्तकाचा विषय स्पष्ट व मर्यादित आहे. मराठीत १९२५ मध्ये प्रो. माधवराव पटवर्धनांनी आपला फार्सी–मराठी कोश प्रसिद्ध केला, त्यामध्ये त्यांनी बखरी या एकाच साहित्यामधल्या फार्शीचा कोश केला नव्हता तर, " ऐतिहासिक कागदपत्रांत म्हणजे तवारिखा, वाके, बखरी, कैफियती, रोजनिशा, अखबारींच्या फर्दा, तहनामे, याद्या, अर्जदास्ती, रोखे, कौलनामे, सनदा, पर्वाने, खुर्दखते, तकिरा, करिणे, राजीनामे, महजर, निरखपत्रे, जामीनकतवे, हिशेबकितेब, मेस्तके, रहदारींची व जकातमाफीची दस्तके, कबजे, हुज्जती व इतर चिठ्याचपाट्या यांत आणि लावण्यापोवाडे यांत येणाऱ्या बेसुमार फार्शी शब्दांचे अर्थ या फार्शी–मराठी कोशात सापडतील ", असे लिहिले होते. त्यांनी आपल्या या पुस्तकाला जोडलेल्या प्रस्तावनेच्या पुढील भागात फारशी शब्द मराठीत येताना त्यांची परिणती कशी झाली याचीही मीमांसा केली होती. प्रस्तुत ग्रंथ हा अशाच विषयावरील असून आधुनिक ज्ञानप्रगतीच्या दृष्टीने त्यातील विचार दर्शविण्याची तऱ्हा आधुनिक पद्धतीला अनुसरूनच केलेली आहे.

पुस्तकाच्या प्रस्तावनेत सर्व ग्रंथाचे स्वरूप विशद केलेले आहे व मुख्य निष्कर्ष पण स्पष्टपणे सांगितलेले आहेत. इतर सहा प्रकरणे व शेवटली शब्दसूची यांनी ग्रंथास पूर्णता आलेली आहे.

अनुक्रमणिका

'फारसी' या संज्ञेची व्याप्ती प्रो. माधवरावांप्रमाणेच श्री. पठाण यांनी मानलेली असून–"मराठीत आलेल्या अरबी व तुर्की शब्दांचा अंतर्भाव 'फार्सी' या व्यापक संज्ञेत त्यांनी केलेला आहे. मराठीच्या दृष्टीने ही व्यापकता इष्ट आहे. ती काटेकोर नसेल, कारण आजची पर्शियन अथवा जुनी इराणी असा मुळात त्या शब्दाचा जो अर्थ मर्यादित होतो तो मराठीदृष्ट्या टाळण्याची आवश्यकता होती.

ह्या प्रबंधात मूळ 'फार्सी' शब्दांना मराठीत येताना जे विकार झाले त्याचे स्वरूप मूळतः दर्शविले असल्याने असे वाटण्याचा संभव आहे की, हा अभ्यास मग मराठी भाषेचा नसून त्या यावनी भाषेचा आहे. पण असे मानण्यात चूकच होईल. एक तर उलट्या पद्धतीने मराठीत प्रचलित म्हणजेच ज्यांचे कमी-अधिक मराठीकरण झाले आहे अशा शब्दांच्या परिणतीचेच विवरण येथे स्पष्टतेने केलेले असल्याने तो मराठी भाषेचाच अभ्यास आहे; परंतु मराठी उच्चारांमध्ये पडलेली भर अथवा मराठी उच्चारणावर या परकीय उच्चारांचा जो परिणाम झाला, यांचा पण परामर्श या प्रबंधात घेतलेला आहे. (उदा. अनुच्छेद २५ आणि ३२ मध्ये मराठी स्वरोच्चारण आणि व्यंजनोच्चारण यामध्ये मराठीने स्वीकारलेल्या नवीन विशेषांचे विवेचन आढळते.) उच्चारप्रक्रियेनंतर रूपप्रक्रिया (प्रत्ययप्रक्रिया, प्रकरण दुसरे) या प्रकरणात मराठीला ज्या परकीय फार्सी प्रत्ययांनी वैविध्य, अधिक अर्थक्षमता आली अशा महत्त्वाच्या विषयाचे विवेचन आले आहे. हे विवेचन अतिशय विस्तृत असून ग्रंथकाराचे अध्ययन कसे पक्के आहे, याचा प्रत्यय येथे सहज येतो. मराठीत फार्सी शब्दांनी काय भर पडली हे प्रकरण पाचवे आणि सहावे यावरून लक्षात येईल. मराठीत पुढे पुढे डॉ. माधवराव पटवर्धन, डॉ. वि. दा. सावरकर, अत्रे इत्यादी मंडळींनी मराठीतून हकालपट्टी केलेल्या शब्दांतून आणि दर्शविलेल्या शब्दसंख्येपेक्षा केवढी तरी विस्तृत सामग्री या दोनही प्रकरणात आहे, ती वाचून सामान्य वाचकालासुद्धा ती उद्बोधक वाटेल. उदाहरणार्थ, खूप, पुष्कळ, हा शब्द परकीय आहे हे सर्व लोकांना कोठे ठाऊक आहे ! शेवटची जवळपास पाचशे पाने शब्दसूचीने व्यापलेली आहेत, व हा एक स्वतंत्र द्विस्तंभीय कोशच झालेला आहे. माधवरावांच्या कोशासारखाच हा कोशही उद्धरणाचे मूलस्थान दर्शविणारा असल्याने आणि बखरींच्या दृष्टीने व्यापक असल्याने मराठी भाषेच्या अभ्यासकांना या सूचीचा फारच चांगलाच उपयोग होणार आहे यात शंकाच नको.

ग्रंथ काळजीने लिहिला गेला असला तरीही त्यातील काही उणिवा स्पष्टपणे दाखवणे अतिशय महत्त्वाचे आहे, पण त्यामुळे ग्रंथाची उपयुक्तता किंवा त्यामागली विद्वत्ता अथवा परिश्रम यांचा कोणताही अधिक्षेप येथे अभिप्रेत नाही. केवळ ज्ञानाची पूर्तता अथवा वस्तुस्थिती नीट लक्षात यावी एवढ्याचसाठी पुढील भाग लिहिला आहे.

'ला' प्रत्यय फारशीतून आलेला नाही याविषयी होर्नले, बीम्स, भांडारकर व ब्लोक यांनी लिहिलेले असून ब्लोकने दिलेले पुरावे आणि वरील सर्वांनी दिलेल्या

अनुक्रमणिका

व्युत्पत्त्यांनी आता राजवाड्यांचे मत स्वीकारण्याचे काही कारण उरले नाही. त्याचा संदिग्धतेने उल्लेख परकीय म्हणून झाला आहे. तो नको आहे; त्याविषयी संशयास काहीच स्थळ नाही ( पृ. ११०–१११ ). जातीने ( स्वतः ) या शब्दाविषयीची भूमिका अजूनही संदिग्ध आहे असे वाटते ( पृ. १२४–१२५ ). मराठीचे ऐतिहासिक व्याकरण रचले जाईल ( व कदाचित अधिक काही साहित्य उपलब्ध झाले तर ) त्या वेळी या आत्मवाचकाची जातकुळी स्पष्ट होईल.' नरम ' ( पृ. १२६ ), नामी ( पृ. १२७ ) संख्यावाचक एक–यक व त्याची सामासिक व इतर रुपे ( पृ. १३० व पुढे शब्दसूची ), अंशवाचक निमे ( निमा–मी–मे पृ.१३१ ), अजविणे(मिळवणे पृ.१३२), जमणे ( पृ.१३२ ), दमणे ( दमऽध्या, तमक ) श्वास; तमक शब्द पाणिनी,सुश्रुत इतका जुना आहे), शिलगावणे ( ऽ शलाका ) असे काही शब्द अधिक विचारान्ती परकी समजणेच आवश्यक होईल. देखील(पृ. १०५ ), की ( पृ. १५५ ) याविषयी मुळातच शंका अशी आहे की, जसे ' जे ' नी येणारे वाक्य अलीकडील आहे, तसेच ते की–नंतर आले किंवा की नंतर आले ? बखरीतील अनुस्वार–लेखनाला फारसा अर्थ नाही. त्याचे मूळ ठरविणेच आता अशक्य आहेसे वाटते. या अव्ययांविषयीचा निर्णयही स्पष्टपणे करणे सध्या तरी अशक्य दिसते. या थोडया विशेषांव्यतिरिक्त प्रो. पठाण यांचे सर्व विवेचन संपूर्णपणे ग्राह्य वाटते. मराठीत आलेले उच्चार–प्रत्ययविक्षेप यांचे त्यांनी केलेले विवेचन त्यांच्या विद्वत्तेची साक्ष पटविणारे आहे.

पुस्तकात जवळ जवळ पाचशे पानांची शब्दसूची बहुशः निर्दोष आहे. अगदी अत्यल्प मुद्रणप्रमाद दिसले तरी ( पृ. ४५९ चदीद– = जदीद, ७७४ साख = साफ ) ते उपेक्षणीय आहेत. लोणी अक्त्यार ( पृ.७१७ )हे विशेषनाम ऑक्टरलोनी असे आहे. काही शब्द ( उदा. फिरंग, लाल, मण ) अधिक संशोधनार्ह आहेत. भावप्रकाश-ग्रंथाच्या काळापासून फिरंग ( रोग ) येतो, त्यापूर्वी माझ्या अवलोकनात आलेला नाही. मण, शेर आदी लीलावतीत येतात, परंतु ते मागाहून घातले असण्याचा फार संभव आहे. लाल शब्दाच्या संशोधनात बराच वेळ जाण्याचा संभव दिसतो. येथे काहीसे परिचयात्मक कामच मला अभिप्रेत आहे.

प्रो. पठाण यांनी मराठीच्यावर झालेल्या परिणामांपैकी या एका परिणामाचा विस्तृत अभ्यास येथे सादर केलेला आहे. त्यांनी मराठीवर झालेल्या उर्दूच्या परिणामाविषयी असेच लेखन करावे अशी विनंती त्यांना करावीशी वाटते. त्यांचे हे पुस्तक मराठीच्या सर्व अभ्यासकांना अनुकरणीय वाटेल यात मला शंका वाटत नाही.

**डॉ. म. अ. करंदीकर**



## नाट्याचार्य कृ. प्र. खाडिलकर

लेखक : **प्रा. न. र. फाटक**

प्रकाशक : मौज प्रकाशन गृह, मुंबई ४, किंमत १२–५० पैसे.

खाडिलकरांच्या निकट सहवासात अनेक वर्षे असलेले सिद्धहस्त लेखक प्रा. न. रा. फाटक यांनी प्रस्तुत चरित्रग्रंथ लिहून खाडिलकरविषयक वाङ्मयात मोलाची भर घातली आहे यात शंका नाही.

खाडिलकरांचे चरित्र व नाट्यवाङ्मय यांचा आटोपशीर पण महत्त्वपूर्ण आलेख या ग्रंथात काढण्यात आला आहे. याचे एकूण चार विभाग आहेत. काकासाहेबांनी 'केसरी'त पहिला लेख लिहिला तोपावेतोचे आरंभीचे जीवनचित्र पहिल्या प्रकरणात दिले आहे. वृत्तपत्रातील तेजस्वी कामगिरीचा परिचय दुसऱ्या प्रकरणात व नाट्यवाङ्मयाचा धावता परामर्श तिसऱ्या प्रकरणात घेण्यात आला आहे. "संसार आणि स्वभाव" हे चौथे प्रकरण. ते अत्यंत वाचनीय व उद्बोधक असे झाले आहे. त्यात खाडिलकरांच्या स्वभावाचे अनेक उज्ज्वल पैलू आपणास दिसून येतात. त्यांच्या त्यागी, तपस्वी व मनस्वी स्वभावाचे धागेदोरे स्पष्ट करण्यात प्रा. न. र. फाटक यांची लेखणी रंगली आहे व उदात्त भावाचे ठायी ठायी दर्शन घडविण्यात ती अत्यंत यशस्वी झाली आहे.

खाडिलकरांच्या चरित्रविषयक विवेचनाचा भाग १३०–३१ पानांत संपतो. तदनंतर पुढे पाच उपयुक्त परिशिष्टे (५४ पाने) देण्यात आली आहेत. त्यांतून चरित्रनायकाच्या लेखणीचे विविध गुणधर्म आपणास दिसून येतात. येथे खाडिलकरांचे काही महत्त्वपूर्ण लेख, अग्रलेखांतील उतारे, नागपूर साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदावरून केलेले भाषण इ. विषय देण्यात आले आहेत. त्या सर्वांमधून खाडिलकरांचे विचारसौंदर्य व ठाशीव विवेचनपद्धती यांचे साक्षात दर्शन आपणास घडते. खाडिलकरांचे समग्र साहित्य सहजी उपलब्ध होऊ न शकणाऱ्यांची फार मोठी सोय या परिशिष्टांमुळे झाली आहे. शेवटच्या परिशिष्टात दिलेल्या ठळक घटनांच्या कालपटामुळे एका दृष्टिक्षेपात खाडिलकरांच्या जीवनाचा आलेख नजरेसमोर उभा राहतो.

खाडिलकरांच्यासंबंधी स्वतःस ज्ञात असलेली चरित्रविषयक 'चक्षुर्वै सत्यं' हकीकत प्रा. फाटक विशेषत्वाने सांगतात. त्यांनी खाडिलकरविषयक आठवणींचा व खाडिलकरस्मरणींचाही यथोचित निर्देश केला आहे; व चरित्रनायकाची प्रतिमा वाचकांना सहज न्याहाळता येईल अशी सुस्पष्ट व रेखीव चित्रिली आहे.

काकासाहेब खाडिलकरांचे व्यक्तिमत्त्व हे एक असामान्य व्यक्तिमत्त्व होते, या लेखकाच्या म्हणण्याशी कोणीही सहमतच होईल. काकासाहेबांचा असामान्यपणा

अनुक्रमणिका

कोणत्या रीतीचा होता व प्रसंगाप्रसंगांतून तो कसा दिसून आला याचे बारकाईने केलेले वर्णन अत्यंत वाचनीय झाले आहे. निःस्पृहता, परोपकारित्व, स्वावलंबन, स्वाभिमान व तत्त्वचिंतनशीलता इ. गुण खाडिलकरांच्या जीवनप्रवाहात कसकसे प्रकट झाले ते लेखकाने पाल्हाळ न लावता मार्मिकपणे दर्शविले आहे. खाडिलकरांच्या अंगचे विविध गुण निदर्शनास आणून देणाऱ्या काही कसोटीच्या प्रसंगांचे निवेदन वाचीत असता हृदय हेलावून जाते. ज्या गोष्टी लेखकाने समक्ष अवलोकन केल्या होत्या त्यावर त्याने विशेष भर दिलेला दिसतो. त्यामुळे काही नवीन व तपशीलवार माहिती वाचावयास मिळून वाचक प्रभावित होतो.

उदाहरण म्हणून खाडिलकरांच्या तुरुंगयात्रेचा प्रसंग पाहावा. इंग्रजांच्या रोषास बळी पडून खाडिलकरांना तुरुंगवास भोगावा लागला. तेव्हाची त्यांची मनःस्थिती व परिस्थिती लेखकाने समग्रतेने वर्णिली आहे. भट्टीतून सोने तावूनसुलाखून बाहेर पडते तद्वत याही प्रसंगात खाडिलकरांच्या चारित्र्याचे सुवर्ण कसे लखलखीत होऊन बाहेर पडले हे आपण जणू समक्ष अनुभवू शकतो. कोणत्या परिस्थितीत, कोणत्या लेखावरून खटला भरण्यात आला, याची पार्श्वभूमी देऊन काकासाहेबांवर पकडवॉरंट कसे बजावण्यात आले, इ. वृत्तान्त लेखकाने सांगितला आहे. हा सारा प्रसंग एखाद्या उदात्त-गंभीर नाट्यप्रवेशासारखा डोळ्यांसमोर उलगडत जातो. प्रत्यक्ष लेख काकासाहेबांनी लिहिला नसला तरी, " मी तोंडाने उच्चारलेला मजकूर दुसऱ्याने लिहून काढला " हेच पोलिसांना काकासाहेबांनी निग्रहाने सांगितले व शिक्षेला निर्भयपणे तोंड दिले. या थोर देशभक्ताला तुरुंगात नेताना हातकड्या घालण्यासही ब्रिटिश नोकरशाहीने कमी केले नाही !

काकासाहेब साबरमतीच्या तुरुंगातून सुटले तेव्हा त्यांना आणण्याकरिता महात्मा गांधींनी वाहन पाठविले होते. परंतु कैद्याच्या सुटकेस अजून वेळ आहे असे सांगून अधिकाऱ्यांनी ते परत पाठविले व नंतर काही वेळाने काकासाहेबांना तुरुंगाबाहेर पाठविले ! अर्थात नंतर म. गांधींची भेट घेऊन त्यांच्याशी बोलणे करूनच काकासाहेब मुंबईस परतले...इ. मजकूर वाचीत असता अनेक संमिश्र भावना आपल्याही हृदयात दाटून आल्याशिवाय राहात नाहीत. थोर पुरुष निग्रहाने व निष्ठेने आल्या परिस्थितीशी कशी झुंज देतात आणि आपल्या जीवनाच्या अंतिम उद्दिष्टाकडे कशी दमदार पावले टाकतात हे या चरित्रात पानोपानी दिसून येते. खाडिलकरांनी हेतुपूर्वक ठरविलेले जीवनध्येय कसे गाठले, आधीव्याधींना कसे तोंड दिले आणि आपल्या जीवनाला यज्ञस्वरूप कसे प्राप्त करून दिले हे वाचीत असता आपणास या महान जीवनयात्रेपासून काही प्रेरणा मिळते हे मान्य केले पाहिजे व या दृष्टीने या चरित्रग्रंथाचे लेखन सफल झाले आहे, असे म्हणण्यास हरकत वाटत नाही.

प्रस्तुत चरित्रग्रंथात अनुषंगाने आलेले सौ. गौरकाकू यांचे व्यक्तिचित्रणही प्रभावी

अनुक्रमणिका

झाले आहे. खाडिलकरांच्या जीवनातील अटीतटीच्या व हर्षामर्षांच्या प्रसंगात त्यांच्या धैर्यसंपन्न सहचरीने त्यांना कशी साथ दिली ते लेखकाने वर्णिले आहे. खाडिलकरांच्या जीवनात द्रव्याच्या दृष्टीने ओढाताण असण्याचे प्रसंग अनेकवार आले. घरी अनेकांचे येणेजाणे व मोठा प्रपंचाचा व्याप, तरी सौ. गौरकाकू यांनी काटकसरीने व कुशलतेने संसाराचा गाडा कसा हाकलला याचे मोठे हृदयस्पर्शी चित्रण या चरित्रग्रंथात आले आहे. संसाराचा भार सांभाळून चरख्यावरील सूतकताईचे व्रत या माउलीने अखंड चालविले. आपल्या हातच्या सुताची एक पंचेवजा धोतरजोडी त्या म. गांधींनाही दरवर्षी पाठवीत असत. आयुष्याच्या उत्तरकालात शेवटी शेवटी प्राप्त झालेल्या आधी-व्याधी व घरातील प्रियजनांचे चिरवियोग; या गोष्टी सौ. गौरकाकू व स्वतः खाडिलकर यांनी मोठ्याच धीरोदात्तपणे पेलल्या. तो सारा निवेदनाचा भाग वाचीत असता एखादा अलौकिक जीवनयज्ञ तर आपण पाहात नाही ना असा मनास भास होतो!

खाडिलकरांची कीर्ती विशेषकरून त्यांच्या नाट्यसंपदेमुळे चिरकाल टिकणारी आहे. या नाट्यवाङ्मयाचा तपशीलवार नाही तरी धावता परामर्श "रंगभूमीची सेवा" ह्या प्रकरणात घेण्यात आला आहे. येथे नाटकांच्या चिकित्सक परीक्षणापेक्षा, नाटकाची कथावस्तू निश्चित करताना खाडिलकरांनी जी साधने योजिली ती नमूद करण्याकडे लेखकाने अधिक लक्ष दिलेले दिसते. पत्रकार या नात्याने खाडिलकरांची योग्यता काय होती व "नवाकाळ" पत्र त्यांनी किती दक्षतेने, कल्पकतेने व जिद्दीने चालविले याचेही वर्णन प्रा. फाटक यांनी केले आहे ते उद्बोधक आहे.

हे चरित्र लेखकाने समरसतेने व निष्ठायुक्त मनाने लिहिले आहे, तरी काही वेळा मात्र तटस्थपणाची भूमिका घेतल्याप्रमाणे अलिप्त वृत्तीने लेखन केले गेले आहे. अशा वेळी हवी ती ती त्या प्रसंगाची उत्कटता तीव्रतेने प्रत्ययास येत नाही असे वाटते अर्थात खाडिलकरांच्या जीवितकार्याचे यथार्थ मूल्यमापन करताना लेखकाने इष्ट ती विवेचकता सर्वत्र दर्शविली आहे. खाडिलकरांचे चरित्र व चारित्र्य समजावून घेणारास हा ग्रंथ बहुमोलाचा वाटेल यात संशय नाही. त्यांच्या नाट्यवाङ्मयाचा अभ्यास करणा-ऱ्यासही इष्ट ती खाडिलकरांच्या व्यक्तिमत्त्वाची ओळख करून देण्यास हा ग्रंथ समर्थ आहे.

**डॉ. वि. म. कुलकर्णी**

## हिंदी निर्गुण-काव्य का प्रारंभ और नामदेव की हिंदी कविता

लेखक : डॉ. शं. के. आडकर

डॉ. शं. के. आडकर यांनी या हिंदी प्रबंधात 'संत नामदेव हे हिंदी वाङ्मयातील निर्गुण काव्याचे प्रवर्तक आहेत' हा सिद्धान्त प्रस्थापित केला आहे. संत नामदेवांचे चरित्र, त्यांची अभंगरचना आणि त्यांनी उत्तर हिंदुस्थानात केलेली कामगिरी या तीनही बाबतीत आजवर पुष्कळ चर्चा झालेली आहे आणि विविध प्रकारची उलटसुलट मते आग्रहपूर्वक मांडली गेली आहेत. नामदेवांच्या हिंदी कवितेचीही थोडीफार चिकित्सा करण्याचे प्रयत्न अभ्यासकांनी केले आहेत; परंतु नामदेवांच्या हिंदी कवितेचे हिंदी वाङ्मयेतिहासाच्या संदर्भात एवढा तपशीलवार व सप्रमाण विवेचन करणारा हा पहिलाच ग्रंथ म्हणावा लागेल आणि केवळ या एकाच दृष्टीने पाहिले तरी डॉ. आडकर यांच्या प्रबंधाची अपूर्वता ध्यानात येते.

अनेक हिंदी विद्वानांनी संत कबीरांना निर्गुण काव्याचे प्रवर्तक मानले आहे. संत नामदेव हे कबीरांच्या पूर्वी होऊन गेले ही गोष्ट कबीरांनीच त्यांचा आदरपूर्वक निर्देश केलेला आहे, त्यावरून कोणालाही मान्य होणारी आहे. तथापि नामदेवांचे पूर्वकालीनत्व ही सिद्ध गोष्ट असतानाही संत नामदेवांच्या या विशिष्ट कार्याचे आकलन होऊ शकले नाही. डॉ. आडकर यांच्या मते नामदेवांची हिंदी रचना कबीरांच्या तुलनेने अल्प आणि कबीरांची शैलीही विलक्षण मर्मभेदी यामुळे कबीरांच्याच काव्याचा आजवर निर्गुण काव्याचा मूलस्रोत म्हणून गौरव झाला. परंतु अलीकडे नामदेवांच्या हिंदी काव्याचे संशोधन होऊन ते अभ्यासकांच्या नजरेस पडल्यावर संत नामदेवांचे कार्य विद्वन्मान्य होऊ लागले. डॉ. विनयमोहन शर्मा, डॉ. भगीरथ मिश्र व डॉ. राजनारायण मौर्य यांनी आपापल्या एकद्विषयक लेखनातून संत नामदेवांनी केलेल्या युगप्रवर्तक कामगिरीचे महत्त्व मान्य केलेले आहे. परंतु नामदेवांच्या सर्व काव्याचे बारकाईने परिशीलन करून आणि भिन्न भिन्न मतांचा परामर्श घेऊन डॉ. आडकर यांनी आपला सिद्धान्त मांडला असल्याने पूर्वसूरींच्या सूत्रबद्ध निष्कर्षापेक्षा डॉ. आडकर यांच्या विस्तृत चिकित्सेचे मोल विशेष अभ्यसनीय आहे.

नामदेवांच्या नामोल्लेखाबरोबर प्रत्यक्ष देवालाही आपलासा करणाऱ्या प्रेमळ व लडिवाळ भक्ताची आठवण होते, पण याहीपेक्षा नामदेवांनी हिंदी वाङ्मयालाही एक नवीन प्रेरणा दिलेली आहे, ही अधिक कौतुकाची घटना डॉ. आडकर यांच्या प्रबंधामुळे अभ्यासकांच्यासमोर येत आहे. आपले मतप्रतिपादन करताना डॉ. आडकरांनी समतोल विवेचन केलेले असले तरी त्यांची काही विधाने विवाद्य स्वरूपाची वाटतात. नामदेव

अनुक्रमणिका

प्रथम सगुणोपासक व मूर्तिपूजक होते आणि कालांतराने कट्टर निर्गुणोपासक झाले ( पृ. ३२२ ), हे त्यांचे मत, मराठी संतांच्या विचारसरणीचे वैशिष्ट्य ध्यानात न घेता व्यक्त केल्यासारखे वाटते. सर्व मराठी संत हे अद्वैती आणि त्याच वेळी भक्तिमार्गी आहेत. त्यांना परमेश्वराचे अंतिम निर्गुण–निराकार स्वरूप मान्यच आहे, पण तरीही भावभक्तीने रंगून जाऊन ते ईश्वराचे ' गोड रूप व गोड नाम ' पुन्हा पुन्हा आळवताना दिसतात. नामदेवांच्या मराठी काव्यातही असाच सगुण–निर्गुणाचा समन्वय झालेला आहे. डॉ. पेंडसे यांच्या ' ज्ञानदेव व नामदेव ' या ग्रंथात याची सांगोपांग चर्चा आलेली आहे.

नामदेवांच्या सगुण-निर्गुण विचारातील हे विनाधार पौर्वापर्य कल्पिल्यामुळे नामदेवांच्या मराठी व हिंदी भाषेतील काव्याबद्दलही डॉ. आडकर यांना अशीच भूमिका घ्यावी लागलेली आहे. ' नामदेवांचे मराठी अभंग ही प्रारंभीची रचना असल्यामुळे त्यात भक्तीची विव्हलता आणि वर्णनात्मकता दिसून येते तर हिंदी रचना उत्तरकालीन असल्याने त्यात अनुभूतीची परिपक्वता आहे ' ( पृ ६४ ). पहिल्या अवस्थेतील नामदेव हे भावुक भक्त आहेत, तर दुसऱ्या अवस्थेतील नामदेव हे विचारशील संत आहेत ( पृ. ९४ ). डॉ. आडकरांचे हे निष्कर्ष त्यांच्या विशिष्ट भूमिकेमुळे पटण्याजोगे नाहीत.

वारकरी संप्रदायात ' एक देवोपासनेचे ' महत्त्व आहे हा अभिप्रायही पारखून घ्यायला पाहिजे. संतांनी क्षुद्र देवतांना बाजूस सारण्याचा उपदेश केलेला असला तरी कोणत्या तरी एकाच देवाला पूज्य मानले पाहिजे असे मात्र कोठेही म्हटले नाही. म्हणूनच तर राम, कृष्ण, दत्त इ. दैवतांची त्यांनी एकाच वेळी स्तुतिस्तोत्रे गायिली. डॉ. आडकरांच्या मनात एक-देवोपासनेचा तसा अर्थ असेल तर त्याला वारकरी संप्रदायाच्या शिकवणुकीत आधार मिळणार नाही.

निर्गुण मत हे जातिव्यवस्थेचे उन्मूलन करणारे आहे ( पृ. १३४ ) हे त्यांचे मत फारच धाडसी वाटते. आपल्या संतांनी जातिव्यवस्था प्रमाण मानली होती यात यत्किंचितही संदेह नाही, मात्र परमेश्वरासमोर सर्वजण सारखे आहेत, सर्वांना भक्तिमार्ग आचरण्याचा अधिकार आहे अशी उदार दृष्टी ठेवून त्यांनी जातिभेदातील कटुता कमी करण्याचा प्रयत्न केला हे ऐतिहासिक सत्य आहे, आणि याच भूमिकेतून संतांच्या वाङ्मयाकडे, मग ते सगुणोपासक असो की निर्गुणोपासक असो, पाहिले पाहिजे.

डॉ. आडकरांच्या प्रतिपादनात अशी काही मतभेदाची स्थळे आहेत, परंतु त्यामुळे त्यांनी केलेल्या एकंदर अभ्यासाचे आणि आपल्या विषयाच्या सप्रमाण मांडणीचे महत्त्व कमी होत नाही. मराठी आणि हिंदी या दोन्ही भाषांचा चांगला व्यासंग असल्याने डॉ. आडकर यांच्या प्रबंधातील तुलनात्मक चर्चा अनेक ठिकाणी उद्बोधक झाली आहे. हिंदी वाङ्मयातील आणि ज्ञानदेवांच्या काव्यातील तत्त्वज्ञानविषयक लेखनाची

वैशिष्ट्ये नमूद करताना त्यांनी जो आढावा घेतला आहे तो हिंदी व मराठी या दोन्ही भाषेतील अभ्यासकांना वाचनीय आहे.

हा संशोधनात्मक प्रबंध असल्याने त्यातील लेखनामध्ये जी शिस्त अपेक्षित असते त्या दृष्टीने डॉ. आडकर यांनी अत्यंत दक्षतेने आपले लेखन केलेले आहे. बारीक-सारीक आधार देतानाही मूळ संदर्भ देण्यात त्यांनी जो काटेकोरपणा बाळगला आहे तो कौतुकास्पद आहे.

संत नामदेवांनी केलेल्या वैचारिक नव-युगप्रवर्तनाचे कार्य हिंदी भाषिकांना परिचित करून दिल्याबद्दल डॉ. आडकर यांना धन्यवाद देणे अवश्य आहे.

**डॉ. मु. श्री. कानडे**



## संशोधनमुक्तावलि : सर ६

लेखक : **महामहोपाध्याय डॉ. वा. वि. मिराशी**

प्रकाशक – विदर्भ संशोधनमंडळ, नागपूर. पृष्ठे १२+२४१ = २५३. मूल्य आठ रुपये.

संशोधन मुक्तावलीच्या या सहाव्या स्तरात एकंदर १८ लेख आहेत. पूर्वार्धातले नऊ लेख संस्कृत व मराठी वाङ्मय या सदरात पडतात, आणि उत्तरार्धातील नऊ लेख प्राचीन भारतीय इतिहास या सदरात येतात. पूर्वार्धातील पहिल्याच लेखात वाल्मीकी आणि अगस्त्य या दोन्ही ऋषींचे आश्रम कोठे असावेत याबद्दल विचार केला आहे. रामायणाच्या बालकांड आणि उत्तरकांड या दोन्ही भागांत हा आश्रम गंगेच्या दक्षिण तीरापासून दूर नसलेल्या तमासा नदीच्या काठी असल्याचे लिहिले आहे. पण ' तमसा ' या नावाने उत्तर भारतात तीन नद्या माहीत आहेत. पैकी एक यमुनेला मिळत असल्याने विचारात घेता येत नाही. दुसरी शरयू आणि गोमती यांमध्ये असल्याने तिच्या काठी जावयास गंगा पार करावी लागत नाही, तेव्हा तिही विचाराबाहेरच पडते. राहता राहिली तिसरी तमसा ( तोंस ) ही मात्र प्रयागच्या पूर्वेस गंगेला दक्षिणेकडून मिळते व गंगा पार केल्यावर फार लांब जावे लागत नाही. तेव्हा वाल्मीकीचा आश्रम याच तोंस नदीवर ती गंगेला मिळते तेथून फार दूर नसावा असा आपला सिद्धान्त निरपवाद म्हणून श्रीयुत मिराशी यांनी मांडला आहे.

याच दृष्टीने दण्डकारण्यातील गोदावरीजवळचा जो अगस्त्याश्रम त्याचे स्थान

निश्चित करण्याचा प्रयत्न याच लेखात केला आहे. केवळ रामायणाच्या आधारे हा निश्चय होत नसल्याने लेखकाने भवभूतीची मदत घेतली आहे. उत्तररामचरिताच्या तिसऱ्या अंकाचे आरंभी तमसा व मुरला या नद्यांचा संवाद विष्कंभक रूपाने दिलेला आहे. त्यावरून गंगेने जसे आपल्या तमसा नामक उपनदीस पाठविले तसेच गोदावरीने ज्या मुरलेस पाठविले ती तिची उपनदी असावी अशी कल्पना होते. डॉ. वेलवलकरांनीही अशीच कल्पना करून ती पंचवटीजवळची नदी असावी असे अनुमान केले आहे. पण नाशिकच्या परिसरात तशी नदी नाही म्हणून नगर जिल्ह्याचा विस्तृत नकाशा पाहून तेथे मुळा या नावाची जी नदी तीच मुरला असावी आणि या मुरला—गोदावरी संगमाजवळ अगस्त्याश्रम असावा, असे अनुमान लेखकाने काढले आहे. तसेच या पवित्र परिसरात जेथे श्रीज्ञानेश्वरी लिहिली ते नेवासे वसले आहे हेही त्याने दाखविले आहे.

'मूळ हरिवंशाचा काळ' या सरातला तिसरा लेख वाचून मी खूपच प्रभावित झालो. महाभारताच्या प्रचंड चिकित्सक आवृत्तीनंतर आता डॉ. प. ल. वैद्य यांच्या देखरेखीखाली तयार झालेला हरिवंश हा प्रसिद्ध झाला आहे. याच्या प्रस्तावनेत डॉ. वैद्य यांनी मूळ हरिवंश इ. स. ३०० ते ४०० या काळात लिहिला गेला असावा असे म्हटले आहे. या अनुमानापेक्षा प्रबळ प्रमाण प्रदर्शित करून हा काळ निश्चित करण्याचा सफल प्रयत्न या लेखात केला गेला आहे. प्रथम इ. सनाच्या पाचव्या शतकापूर्वी महाभारताची शतसाहस्री संहिता झाली होती व तिच्यात मूळ हरिवंश समाविष्ट होता हे दानपत्रांवरून सिद्ध केले आहे. मग हरिवंशातील पारिजातहरण ही महत्त्वाची घटना मूळ हरिवंशात पाचच श्लोकांत पण पुढे २३ अध्यायांत कशी विस्तारत गेली हे दाखविले आहे. हा विस्तार केल्याबद्दल आनंदवर्धनाने आपल्या ध्वन्यालोकात सर्वसेनाच्या हरिविजय ग्रंथाचा निर्देश केला आहे. भोजानेही आपल्या सरस्वतीकण्ठाभरणात त्यातील एक गाथा घेतली आहे. तिच्या अर्थाकडे व विशेषतः 'सुरकुसुमेदि' या पदाकडे लक्ष देता पारिजात हरणातील असावी असे स्पष्ट दिसते. या सर्व सनांचा काल डॉक्टरसाहेबांनी निश्चित केला आहे. दण्डीच्या अवन्तीसुन्दरीकथेतील प्रस्तावनापर श्लोकांवरून तो भासानंतर पण कालिदासापूर्वी झाला असे ठरवून वाकाटकांच्या एका ताम्रपटावरून तो वाकाटक सम्राट पहिला प्रवरसेन (सन २७० ते ३३०) याचा पुत्र होता असे सिद्ध केले आहे. या कालापर्यंत परिजातहरणाचे संक्षिप्त रूपच होते. तेव्हा चिकित्सक आवृत्तीतील संक्षिप्त रूप निदान शे-दीडशे वर्षे अगोदरचे म्हणजे इ. स. २०० पूर्वीचे असले पाहिजे हे अत्यंत मुद्देसूदपणे या लेखात सिद्ध झाले आहे.

या सरातील सहावा लेख 'कुन्दमालेचा कर्ता व काल' यावर आहे. कालनिर्णय करण्यात डॉ. मिराशींचा हात धरणारा दुसरा लेखक क्वचितच सापडेल. कुन्दमालेच्या नांदीत हेरम्बस्तुती आहे आणि गजानन ही देवता गुप्तकालाच्या शेवटी प्रचारात आली

अनुक्रमणिका

असल्यामुळे कुन्दमाला खिस्तोत्तर पाचव्या शतकाइतकी प्राचीन नाही हे या लेखात स्पष्टपणे दाखविले आहे. वैदिक देवता वाङ्मयात गणपतीची गायत्री आहे हे प्रमाण या बाबतीत नेहमी पुढे केले जाते. पण हा भाग प्रक्षिप्त का व कसा आहे हे त्या गायत्रीतील 'प्रचोदयात्' या पदात 'द' हे तिसरे अक्षर उदात्त म्हटले जात असल्याने स्वरूपक्रियेच्या नियमाविरुद्ध आहे हे सडेतोडपणे दाखवून महामहोपाध्यायांनी ते प्रमाण यशस्वीपणे मागे सारले आहे. तसेच या नाटकाचा कर्ता धीरनागच होता, वीरनाग नव्हे हेही दहाव्या-अकराव्या शतकाच्या अक्षरवटिकेत 'ध' आणि 'व' यांतला फरक दाखवून सुस्पष्ट केले आहे.

प्रस्तुत ग्रंथाच्या दुसऱ्या विभागातील शंभर पानांत इतिहासविषयक लेख आहेत. त्यातला पहिलाच म्हणजे दहावा लेख 'गुप्त कालातील एक समस्या–रामगुप्त' या नावाचा आहे. याने २४ पृष्ठे व्यापिली आहेत. असे सामान्यपणे समजले जात असे की, समुद्रगुप्तानंतर द्वितीय चंद्रगुप्तच गादीवर आला. रामगुप्त नावाचा त्याचा वडील भाऊ होता व तो समुद्रगुप्तानंतर गुप्तसम्राट झाला होता की नाही ही एक ऐतिहासिक समस्या होती. पण डॉ. मिराशी यांनी गुप्तांची नाणी व त्याविषयीचे सापडलेले कोरीव लेख यांच्या आधाराने ती समर्पकपणे सोडविली आहे.

आता हे सर्वमान्य झाले आहे की, समुद्रगुप्तानंतर रामगुप्त गादीवर बसला. त्याने अविचाराने एका शक राजावर स्वारी केली, पण त्यात तो अशा पेचात सापडला गेला की, शेवटी त्यास आपली स्त्री ध्रुव देवी हिला त्या शक राजाकडे पाठविण्याची काजिरवाणी अट स्वीकारून आपली सुटका करून घ्यावी लागली. त्याचा धाकटा भाऊ चंद्रगुप्त त्या प्रसंगी मोठ्या शिताफीने स्वतः स्त्रीवेश घेऊन आणि आपल्याबरोबर काही स्त्रीवेशधारी सैनिक घेऊन ध्रुवदेवी म्हणून त्या शक राजाकडे गेला व त्याला ठार करून परत आला. पुढे त्याने आपला भाऊ रामगुप्त यास दूर करून ध्रुवदेवीशी स्वतःच लग्न लावले व तो गुप्त सम्राट झाला.

या घटनेस खालील प्रमाणे मानली गेली आहेत – ( १ ) रामचंद्र आणि गुणचंद्र यांनी लिहिलेल्या नाट्यदर्पणात 'देवीचंद्र गुप्त' या अनुपलब्ध नाटकातील काही उतारे; ( २ ) बाणाच्या हर्षचरितावरील शंकराचार्याची टीका; ( ३ ) भोजाच्या शृंगारप्रकाश या ग्रंथातील उतारे; ( ४ ) राजशेखराच्या काव्यमीमांसेतील आणि ( ५ ) राष्ट्रकूट अमोघवर्ष याच्या ताम्रपटातील काही उतारे. यांच्या आधारे डॉ. अळतेकर, डॉ. देवदत्त भांडारकर, बडोद्याचे डॉ. शहा यांनी आपापली म्हणणी मांडली. पण या साऱ्यांचा समाचार घेऊन डॉ. मिराशी यांनी आपले म्हणणे अत्यंत समर्पकपणे मांडले आहे.

ग्वाल्हेरला अनेक वर्षांपूर्वी वाण्याघरच्या रद्दीत सापडलेली पाने एकत्र करून मध्यहीन पण आदि–अन्तयुक्त जो चांगदेवाचा तत्त्वसार नावाचा ग्रंथ सापडला व जो उज्जयनी येथील शिंदे प्राच्यग्रंथसंग्रहालयातर्फे प्रसिद्ध झाला त्यात हरिश्चन्द्रगड व शिव-

मंदिराचा उल्लेख आहे. या दोन्हीस ज्याचे नाव दिले गेले आहे तो हरिश्चंद्र पौराणिक नसून ऐतिहासिक आहे हे नाशिक जिल्ह्यात सापडलेल्या ताम्रपटावरून डॉ. मिराशी यांनी सिद्ध केले आहे. या हरिश्चन्द्राचा काल मात्र इ. स. ५५० ते ६२५ हा असावा एवढेच ते या सरातल्या बाराव्या लेखात सांगू शकले आहेत.

तेराव्या लेखात डॉक्टरसाहेबांनी 'माळव्याच्या प्राचीन इतिहासावर नवीन प्रकाश' टाकला आहे. आमचे हिंदू संस्कृत ग्रंथकार आपल्या ग्रंथात कालोल्लेख क्वचित करतात. जैन ग्रंथलेखक मात्र तसे करीत नाहीत. ते ब-याच वेळा आपल्या कालातील इतर गोष्टींचाही उल्लेख करतात. जिनसेन नावाच्या एका जैन ग्रंथकाराने आपल्या 'हरिवंश-पुराणात' जो उल्लेख केला आहे तो फार महत्त्वाचा आहे. आपला ग्रंथ जेव्हा व जेथे 'पर्याप्तशेष' केला तेव्हा आपल्या सभोवती कोणकोणत्या दिशांना कोणकोण राजे राज्य करीत होते हेही तो सांगतो. या उल्लेखांच्या आधारे डॉ. मिराशी यांनी फार महत्त्वाची माहिती शोधून काढली.

ज्या वर्धमान नगरात हा ग्रंथ जवळजवळ पुरा झाला ते वर्धमान सौराष्ट्रातले वढवाण समजले जात असे. या लेखाने निर्विवादपणे सिद्ध केले आहे की, ते वर्धमाननगर सौराष्ट्रातले वढवाण नसून उज्जयिनीच्या पश्चिमेस असलेले बधनावर आहे. यावर डॉ. उपाध्ये यांनी अनेक आक्षेप घेतले होते, पण ते सारे लेखकाने अत्यंत समाधानकारक रीतीने निरस्त केले आहेत. मी ही सारी गावे-बधनावर, दोतरिया, चंदोरिया, बडनगर इत्यादी माझ्या भूदानयात्रेत पाहिली आहेत. त्यामुळे डॉ. साहेबांचे विधान मला पूर्ण-पणे पटत आहे. शिवाय त्या वेळी अवंती देशावर कोण राजा राज्य करीत होता याचा नामनिर्देश जरी जिनसेनाने केला नसला तरी त्या वेळीच चन्द्रगुप्त नावाचा एक राजा किंवा त्याचा पिता राज्य करीत असावा व त्याचाच निर्देश जिनसेनाने केला असावा हे अनुमान बिनचूक वाटते.

या सरातला शेवटला लेख 'विदर्भातील प्राचीन नाणी' हा आहे. त्यात ख्रिस्तपूर्व जवळ जवळ पाचव्या शतकापासून ख्रिस्तोत्तर सोळाव्या शतकापर्यंतच्या काळातील सात नाण्यांचे सचित्र दर्शन व विवेचन केले आहे. यावरून नाणक शास्त्राची माहिती मराठी वाचकांस फारच चांगल्या रीतीने होण्यासारखी आहे. 'पंचमार्कड' म्हणून जे नाणे नुसते नावानेच माहीत असते त्याची बरोबर कल्पना चित्र पाहून येते. डॉ. साहेबांनी या नाण्यास 'आहत' असे नाव दिले आहे ते 'टंकाहत' म्हटल्यास अन्वर्थक होईल, असे वाटते. या शेवटच्या लेखाने मराठी वाचकांस एक अगदी नवे दालन दाखविल्या-सारखे होत आहे.

**डॉ. ह. रा. दिवेकर**



[ पृष्ठ ३२ वरून पुढे चालू

## विष्णुशास्त्री चिपळूणकर

भिन्नपणास, व्यवस्थेस व स्थितीस गैरवाजवी होती असे म्हणता येत नाही....... परंतु ज्याप्रमाणे लोकहितवादाचे लेख त्यांच्या विद्वत्तेचे दर्शक नसून त्या काळच्या स्थितीचे व्यंजक आहेत, तशीच ही गोष्ट का मानू नये ? " विष्णुशास्त्री जी टीका करीत होते ती त्या काळातल्या स्थितीवरच होती, हे मात्र देव सोईस्करपणे विसरले आहेत. त्यांना चिपळूणकरांची लोकप्रियतेची अनिवार तृष्णा जिथे तिथे दिसत असल्यामुळे दुसरी बाजू दिसूनही त्यांची निंदेची अनुवार तृष्णा कमी झालेली दिसत नाही. " वरच्यासारखाच प्रकार बहुतेक सार्वजनिक संस्थांवर टीका करताना झाला आहे. त्यांच्या प्रवर्तकांच्या दोषास ती अयोग्य नाही. पण नवीन पुष्कळ सत्कार्यास ती विघातक झाली आहे, आणि नवीन कार्यवाहकांस तीमुळे ती कार्ये विशेष दुःसाध्य वाटू लागली आहेत. " असेही देवांनी पुढे म्हटले आहे. पण कोणती सत्कार्ये चिपळूणकरांच्या टीकेमुळे टळली हे मात्र उदाहरणे घेऊन त्यांनी दाखविले नाही. खऱ्या धैर्याने समाजाचा त्रास सोसून केलेले पुनर्विवाह होऊ लागले, स्त्रीशिक्षणाचे पाऊल पुढे पडू लागले, जातिबंधने क्रमाक्रमाने शिथिल होऊ लागली, असे दृश्य पुढील काळाचा इतिहास पाहता दिसते.

पण देवांना हे लक्षात घ्यावयाचे नव्हते. त्यांची विरोधभक्ती अशा काही उमाळयाने बाहेर पडली आहे की, मालाकारांनी सुधारणेला विरोध केल्यामुळे त्यांचा निर्वंश झाला; आणि त्यांना पाणी देण्याला देखील कोणी राहिला नाही असे सुचविण्यापर्यंत तिची मजल गेली आहे. अशा रीतीने ४१ पाने विरोधभक्ती गाजविल्यानंतर मोठ्या उदार-पणाने शेवटची ३ पाने त्यांनी मालाकारांच्या गुणवर्णनाला दिली आहेत. त्यातही बराच भाग मालाकारांच्या लेखांनी जे ( त्यांच्या दृष्टीने ) दुष्परिणाम झाले ते वर्णन करण्यात खर्च केला आहे आणि बाकीच्या भागात ' पण-परंतु 'चे विरजण आहे. ' मालाकरांच्या हातून केवळ अप्रतिम भाषासेवा झाली असें कबूल केल्याशिवाय गत्यंतरच नाहीं ' असे एखादे नाइलाजाचे वाक्यच विरजणाशिवाय आहे.

देवांचा हा प्रयास प्रतिक्रियेशिवाय सुना गेला असे मात्र नाही. त्यांच्या लेखावर वासुदेव दामोदर मुंडले यांनी उत्तरादाखल ' कै. वि. शा. चिपळूणकर यांजवर रा० देव यांनी सोडलेले टीकास्त्र ' या नावाने दोन लेख लिहिले आणि शास्त्रीय व्याकरणकार मोरो केशव दामले यांनी ' हेतु कीं परिणाम ? ' हा लेख लिहिला ( ग्रंथमाला अंक ७९ ऑक्टोबर १९०० ). त्या काळात अत्यंत मुद्देसूद आणि तर्कघटित निबंध कसे लिहिले जात असत याचे उत्कृष्ट उदाहरण म्हणून तो लेख आजही संपूर्ण वाचण्याजोगा आहे. त्याचे अवश्य पुनर्मुद्रण व्हावे अशी इच्छा येथे व्यक्त करितो.

चिपळूणकरांविषयी प्रतिकूल मते व्यक्त होतच होती. न्यायमूर्ती का. त्र्यं. तेलंग, आगरकरांनंतरचा सुधारक, यांचे आवेशपूर्ण उद्गार त्या त्या वेळी प्रकाशात आले आहेत.

बहुधा प्रत्येक वेळी आक्षेपकांना समर्थकांकडून उत्तरे मिळाली आहेत. असे हे वादसंगर बराच काळ चालले होते. लोकहितवादींवर कोणी काही लिहिले की त्यात चिपळूणकरांवर हल्ला चढविलेला असावयाचा हे तर ठरल्यासारखेच झाले आहे आणि ही प्रथा आजवर चालू आहे.

तथापि या वादसंगरात गुणानुवादकांची आणि समर्थकांची बहुसंख्या राहिली, हे सत्य नाकारता येणार नाही. आक्षेपकांना व निंदकांना तडाख्यात उत्तरे मिळत गेली हेही आपल्या प्रत्ययास येते. चिपळूणकर पुण्यतितीला सभा भरून भाषणे करण्याचा उपक्रम त्यांच्या मृत्यूनंतर दहा वर्षांच्या आतच सुरू झाला. अनेक नामांकित वक्त्यांची भाषणे या सभांमधून झाली आहेत. लोकमान्य टिळकांनी १९०१ सालच्या पुण्यतिथीच्या सभेमध्ये त्यांच्या संबंधाने एक निबंध वाचला. तो अर्थात 'केसरी'मध्ये प्रसिद्ध झाला. प्रस्तुत लेखकाने 'विष्णुपदी' या नावाने चिपळूणकर लेखांची त्रिखंडात्मक आवृत्ती नुकतीच काढली आहे, तिच्या तिसऱ्या खंडात हा निबंध बहुतेक सबंध छापला आहे. आक्षेपकांचा प्रत्यक्ष उल्लेख न करिता त्यांच्या आक्षेपांना अतिशय मुद्देसूद रीतीने व अधिकार वाणीने दिलेले उत्तर त्यात आढळेल. तिसऱ्या खंडाच्या उपोद्घातात आणखी चिपळूणकरविषयक बरीच सामग्री दिली असून त्यांच्या कार्याचे विवेचनही प्रस्तुत लेखकाने तेथे केले आहे.

## सूचना

— तांबे विशेषांक हा १८७–१८८ असा जोड अंक होता.
— ज्यांची सभासद वर्गणी संपली असेल त्यांनी तत्काल वर्गणी पाठवून द्यावी
— वर्गणी जमा झाली असेल त्यांनाच अंक पाठविण्यात येतो.
— मनिऑर्डरने वर्गणी पाठविताना सभासदाने नाव, संपूर्ण पत्ता, वर्गणीचा कालावधी म. ऑ. कुपनवर लिहिणे आवश्यक आहे.
— पत्रिकेचा अंक प्रसिद्ध होताच सभासदाकडे रवाना होत असतो. अंक न मिळाल्याची तक्रार स्थानिक टपाल कचेरीत करावी आणि तिची प्रत 'पत्रिके'कडे पाठवावी. प्रती शिल्लक असल्यास दुसरी प्रत पाठविता येईल. पण पत्रिकेच्या प्रती मर्यादित असतात हे लक्षात घ्यावे.

पत्रव्यवहाराचा पत्ता :
**कार्यवाह, महाराष्ट्र साहित्य परिषद**
**टिळक रस्ता, पुणे ३०**

# परिषद वार्ता



## ( एप्रिल–मे १९७४ )

**वाङ्मयेतिहास खंडांचे प्रकाशन** : वाङ्मयेतिहास खंड ३, ४, ५ चे प्रकाशन दि. ६ एप्रिल रोजी राजभवनावर भारताच्या पंतप्रधान श्रीमती इंदिरा गांधी यांच्या हस्ते मोठ्या थाटाने पार पडले. या समारंभासाठी खास शामियाना उभारण्यात आला होता. माननीय पंतप्रधानांचे स्वागत 'शिंग' फुंकून करण्यात आले. श्रीमती इंदिरा गांधींनी न्यायमूर्ती महादेव गोविंद रानडे यांच्या तैलचित्राला फुले अर्पण केली. तदनंतर श्रीमती चिपलकट्टींनी सुस्वर आवाजात पसायदान गायिले. डॉ. रा. शं. वाळिंबे यांनी उपस्थितांचे स्वागत करून साहित्य-परिषदेचा इतिहास कथन केला. डॉ. भीमराव कुलकर्णी यांनी वाङ्मयेतिहासाच्या कार्याचा अहवाल सादर केला, श्रीमती इंदिरा गांधींच्या हस्ते ३, ४, ५ या खंडाचे संपादक प्रा. रा. श्री. जोग यांचा सत्कार करण्यात आला. सत्काराला उत्तर देताना प्रा. रा. श्री. जोग यांनी आपल्या भाषणात वाङ्मयेतिहासाच्या कार्याचे स्वरूप विषद केले. यानंतर श्रीमती इंदिरा गांधींनी वाङ्मयेतिहाच्या ३, ४, ५ या खंडांचे प्रकाशन केले. आपल्या भाषणात त्यांनी मराठी साहित्याचा गौरव करून वाङ्मयेतिहासाचे कार्य ऐतिहासिक व राष्ट्रीय आहे असे सांगितले. या कार्यक्रमाला राज्यपाल अलियावर जंग, बेगम जंग, मुख्यमंत्री वसंतराव नाईक, शिक्षणमंत्री अनंतराव नामजोशी, केंद्रीय नियोजनमंत्री श्री. मोहन धारिया, आरोग्यमंत्री र. के. खाडिलकर, परिषदेचे विश्वस्त तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी, श्री. वि. द. घाटे व निमंत्रित मोठ्या संख्येने उपस्थित होते. समारंभाला राष्ट्रपती व्ही. व्ही. गिरी, उपराष्ट्रपती श्री. गोपाळ-स्वरूप पाठक आदींचे संदेश आले होते. कार्यक्रम परिषदेच्या इतिहासात सुवर्णाक्षराने लिहावा असा झाला.

**डॉ. श्री. व्यं. केतकर स्मृतिदिन** : डॉ. केतकरांचा स्मृतिदिन दि. १० एप्रिल रोजी साजरा करण्यात आला. सकाळी कमला नेहरू उद्यानात डॉ. केतकर यांच्या स्मारकाला पुष्पांजली अर्पण करण्यात आली. या प्रसंगी डॉ. द. न. गोखले यांनी डॉ. केतकरांच्या काही आठवणी सांगितल्या. सायंकाळी परिषदेत डॉ. विद्याधर पुंडलिक यांचे 'डॉ. केतकरांचा सामाजिक विचार' या विषयावर व्याख्यान झाले. याच वेळी डॉ. पुंडलीक यांच्या हस्ते "डॉ. केतकर वाङ्मयविषयक लेख" या डॉ. गं. दे. खानोलकर यांनी संपादित केलेल्या:व मराठी संशोधन मंडळ, मुंबई यांनी प्रकाशित केलेल्या ग्रंथाचे प्रकाशन झाले. मराठी संशोधन मंडळाचे संचालक डॉ. म. वा. धोंड यांनी ग्रंथाचा परिचय करून दिला.

अनुक्रमणिका

**पंत प्रतिनिधी स्मृतिदिन** : परिषदेचे भूतपूर्व अध्यक्ष आणि औंध संस्थानचे माजी कलाप्रेमी अधिपती कै. बाळासाहेब पंत प्रतिनिधी यांचा स्मृतिदिन १३ एप्रिल रोजी साजरा करण्यात आला. या प्रसंगी डॉ. गो. के भट यांचे ' नाटकातील सामाजिक अन्वय ' या विषयावर भाषण झाले.

**सोलापूरचे साहित्य संमेलन** : महाराष्ट्र-साहित्य-परिषदेच्या सोलापूर शाखा सभेच्या वतीने सोलापूर जिल्हा साहित्य संमेलन २७, २८, २९ एप्रिल १९७४ रोजी सोलापूर येथे साजरे झाले. संमेलनाचे अध्यक्ष डॉ. रा. शं. वाळिंबे हे होते. संमेलनाचे उद्घाटन श्री. ग. दि. माडगूळकर यांनी केले. साहित्य-परिषदेचे प्रतिनिधी म्हणून डॉ. भालचंद्र फडके या संमेलनास उपस्थित होते.

श्री. गंगाधरपंत कुचन हे या संमेलनाचे स्वागताध्यक्ष होते. याप्रसंगी स्मरणिकेचे प्रकाशन पंडिता सुमतीबाई शहा यांच्या हस्ते झाले. शाखेचे जुने व निष्ठावंत कार्यकर्ते श्री शं. गो. पटवर्धन यांच्या "तीच होती पाटमोरी" या काव्यसंग्रहाचे या प्रसंगी प्रकाशन झाले.

**माजी अध्यक्षांचे आभार व नव्या अध्यक्षांची निवड** : महाराष्ट्र साहित्य परिषदेचे अध्यक्ष डॉ. रा. शं. वाळिंबे यांनी आपल्या अध्यक्षपदाचा राजीनामा दिला तो कार्यकारी मंडळाच्या दि. ९–६–१९७४ सभेत मंजूर करण्यात आला. डॉ. रा. शं. वाळिंबे यांच्या मार्गदर्शनाबद्दल व त्यांनी दीर्घकाल केलेल्या कार्याबद्दल त्यांचे आभार मानण्यातआले व उर्वरित काळासाठी प्रा. रा. श्री. जोग यांची महाराष्ट्र साहित्य परिषदेचे अध्यक्ष म्हणून निवड करण्यात आली.

कार्यवाह

अनुक्रमणिका

# महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका सूची

## ( अंक १८१–१८४–एप्रिल १९७२ ते मार्च १९७३ )

### लेख

## परीक्षणे

## शब्दवेध



## टीका–टिप्पणी



## भूतवेध



## किरकोळ



## पत्रव्यवहार

( अंक १८५, एप्रिल १९७३ ते अंक १८७–१८८, मार्च, १९७४ अखेर )

## लेख

## परीक्षणे



## शब्दवेध



## इतर

# महाराष्ट्र-साहित्य-परिषद्

टिळक रस्ता, पुणे ३०

१३ जुलै १९७४

## वार्षिक सभेची सूचना

स. न. वि. वि.

म. सा. परिषदेची वार्षिक साधारण सभा रविवार दि. २८ जुलै १९७४ रोजी पुणे येथे माधवराव पटवर्धन सभागृहात, सायंकाळी ५ वाजता भरणार आहे. आपण या सभेला अवश्य यावे ही विनंती.

### कामे

(१) दुखवटा.
(२) मागील सभेचा वृत्तान्त वाचून संमत करणे.
(३) १९७३–७४ चे वार्षिक कार्यवृत्त संमत करणे.
(४) १९७३–७४ ची उत्पन्न, खर्च आणि ताळेबंद पत्रके संमत करणे.
(५) १९७४–७५ चा अर्थसंकल्प संमत करणे.
(६) हिशेब–तपासनिसांची नियुक्ती करणे.
(७) कार्यकारिणीने सुचविलेल्या घटना दुरुस्तीवर विचार करणे (दुरुस्त्या सोबत जोडल्या आहेत.)
(८) अध्यक्षांच्या संमतीने आयत्या वेळेस येणारी कामे.

आपले

रा. श्री. जोग (अध्यक्ष)
भीमराव कुलकर्णी (कार्याध्यक्ष)

द. बा. डावरे
रा. ज. देशमुख } कार्यवाह.
वासू देशपांडे

### सभासदांच्या माहितीसाठी

(१) ज्यांच्या सभासदत्वाला बारा महिने पूर्ण झाले असतील त्यांनाच वार्षिक सभेतील कामकाजात मत देण्याचा हक्क राहील. (घ. नि. ८)

(२) कोणाही सभासदास कार्यवृत्त अथवा हिशेब इत्यादीसंबंधी वार्षिक सभेत ठराव मांडणे असल्यास त्याने ठरावाची लेखी सूचना अगोदर निदान सात दिवस कार्याध्यक्षांस पोहोचेल अशा बेताने पाठविली पाहिजे (घ. नि. १५)

(१) प्रा. डॉ. रा. शं. वाळिंबे यांनी अध्यक्षपदाचा राजिनामा दिल्याने, तो त्यांनी परत घ्यावा अशी त्यांना विनंती करणारा कार्यकारिणीच्या एकमताने स्वीकृत झालेला ठराव, दि. २१–४–७४ ठराव क्रमांक ५.

(२) डॉ. वाळिंबे यांनी राजीनामा परत घेत नसल्याचे कळवल्यामुळे, ऊर्वरित प्राध्यापकने प्रा. रा. श्री. जोग यांची अध्यक्षपदी नियुक्ति करणाऱ्या कार्यकारिणीच्या एकमताने स्वीकृत झालेला ठराव, दि. ९–६–७४ ठराव क्रमांक ५ व ६.

अनुक्रमणिका








# महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे
## १९७३–७४ चे कार्यवृत्त

आपली महाराष्ट्र साहित्य परिषद गेली सदुसष्ट वर्षे साहित्यक्षेत्रात कार्य करीत आहे. १९७३–७४ या गतवर्षात परिषदेने केलेल्या कार्याचा वृत्तान्त आम्ही सादर करीत आहोत.

### १. सभासद संख्या

| वर्ग | १९७३ मार्च अखेर | १९७४ मार्च अखेर |
|---|---|---|
| उपकर्ते | ३ | ३ |
| आश्रयदाते | ८ | ८ |
| सहाय्यक | २५ | २४ |
| हितचिंतक | २५ | २५ |
| आजीव सभासद | ६७२ | ६९८ |
| साधारण सभासद | १०७९ | १४३३ |
| एकूण | १८१२ | २१९१ |

### २. शाखा व संलग्न संस्था

अहमदनगर, सोलापूर, पंढरपूर, धुळे, जळगाव, सांगली, कोल्हापूर, सातारा, वाई संगमनेर या ठिकाणी परिषदेच्या शाखा आहेत. संलग्न संस्था बावीस आहेत.

### ३. स्मृतिदिन : नैमित्तिक

परिषदेच्या वतीने दरवर्षी काही स्मृतिदिन पाळले जातात. या निमित्ताने स्थानिक व परस्थ विद्वानांच्या व्याख्यानांचा लाभ सर्वांना होतो. यंदा झालेल्या व्याख्यानांचा तपशील असा :

ज्ञानकोशकार डॉ. श्री. व्यं. केतकर यांचा स्मृतिदिन १० एप्रिल रोजी साजरा करण्यात आला. सकाळी कमला नेहरू उद्यानात डॉ. केतकरांच्या स्मारकाला पुष्पांजली अर्पण करण्यात आली. प्रा. रा. वि. ओतुरकर यांनी डॉ. केतकरांच्या आठवणी सांगितल्या. सायंकाळी परिषदेत डॉ. प्र. न. जोशी यांचे 'डॉ. केतकरांचा प्राचीन महाराष्ट्र' या विषयावर व्याख्यान झाले.

१३ एप्रिल रोजी परिषदेचे माजी अध्यक्ष कै. बाळासाहेब पंतप्रतिनिधी यांचा स्मृतिदिन साजरा करण्यात आला. या प्रसंगी डॉ. गोविंद खरे यांचे 'कीर्तन : काल आज आणि उद्या' या विषयावर प्रात्यक्षिकासह व्याख्यान झाले.

श्री. बाबुराव कुमठेकरकृत 'हिंदी ज्ञानेश्वरी' परिचयार्थ दि. १२ मे रोजी साहित्य परिषद, महाराष्ट्र राष्ट्रभाषा सभा व आंतर भारतीच्या विद्यमाने एक कार्यक्रम आयोजित करण्यात आला होता. यावेळी डॉ. हरी रामचंद्र दिवेकर यांच्या अध्यक्षतेखाली डॉ. रा. शं. वाळिंबे यांचे व्याख्यान झाले.

बालकवी ठोंबरे यांच्या स्मृतिदिनानिमित्त ता. १३ मे रोजी 'औदुंबर' या बालकवींच्या कवितेवर एक चर्चात्मक कार्यक्रम आयोजित करण्यात आला होता. चर्चेचे नियंत्रण श्री. प्रभाकर पाध्ये यांनी केले. प्रा. स. शि. भावे यांनी आपल्या 'औदुंबर : एक चिरंतन भावकाव्य' या टिपणाचे वाचन केले. या टिपणावरील चर्चेत प्रा. रा. श्री. जोग, श्री. प्रभाकर पाध्ये, सौ. सरिता पदकी, प्रा. पुंडलिक, डॉ. अनुराधा पोतदार, डॉ. गं. ना. जोगळेकर, सौ. पद्मा गोळे, भारती मराठे आदींनी भाग घेतला.

२३ मे रोजी प्रा. नरहर कुरुंदकर यांचे 'लेखकाचे आविष्कार–स्वातंत्र्य' या विषयावर डॉ. रा. शं. वाळिंबे यांच्या अध्यक्षतेखाली व्याख्यान झाले.

४ जून रोजी स्वातंत्र्यवीर सावरकरजयंतीनिमित्त डॉ. प्र. ल. गावडे यांचे डॉ. शं. दा. पेंडसे यांच्या अध्यक्षतेखाली 'सावरकर यांची नाटके' या विषयावर विचार प्रवर्तक भाषण झाले.

साने गुरुजींच्या स्मृतिदिनानिमित्त दि. १२ जून रोजी प्रा. ग. प्र. प्रधान यांचे 'साने गुरुजींचे साहित्य' या विषयावर श्री. एस्. एम्. जोशी यांच्या अध्यक्षतेखाली भाषण झाले.

७ जुलै रोजी आजचे कथाकार हा विशेष कार्यक्रम आयोजित करण्यात आला. प्रा. विद्याधर पुंडलिकांच्या अध्यक्षतेखाली आजचे आघाडीचे नवोदित कथाकार श्री क. दि. सोनटक्के, श्री. ह. मो. मराठे, श्री. अनिल डांगे व श्री. श्याम मनोहर यांनी या प्रसंगी आपल्या कथांचे वाचन केले.

१२ जुलै हा प्रख्यात कादंबरीकार कै. ना. ह. आपटे यांचा स्मृतिदिन कै. ना. ह. आपटे यांच्या कुटुंबीय मंडळींनी त्यांचे छायाचित्र साहित्य परिषदेला भेट म्हणून दिले, त्याचे अनावरण दि. १२ जुलै रोजी श्री. पं. महादेवशास्त्री जोशी यांच्या हस्ते झाले.

२० जुलै रोजी कै. वा. म. जोशी यांच्या स्मृतिदिनानिमित्त डॉ. द. न. गोखले यांचे 'चरित्रकारांची सुखदुःखे' या विषयावर व्याख्यान झाले.

लोकमान्य बाळ गंगाधर टिळक यांच्या स्मृतिदिना निमित्त दि. २९ जुलै रोजी 'गीतारहस्यकार' टिळक या विषयावर डॉ. वि. रा. करंदीकर यांचे व्याख्यान झाले.

दि. ५ ऑगस्ट रोजी रवीन्द्रनाथ टागोर यांच्या स्मृतिदिनानिमित्त श्री. गोपीनाथ तळवलकर यांचे 'रवीन्द्रनाथांच्या नायिका' या विषयावर विचारप्रवर्तक भाषण झाले.

दि. ७ ऑगस्ट रोजी श्री. सतीश आळेकर यांच्या 'झुलता पूल' या एकांकिकेचा प्रयोग थिएटर ॲकॅडमीच्या वतीने चिपळूणकर सभागृहात झाला. प्रयोगानंतर त्यावर

चर्चा झाली. चर्चेत श्री. प्रभाकर पाध्ये, डॉ. विद्याधर पुंडलीक, सौ. सरिता पदकी, प्रा. माधव वझे, प्रा. अरविंद मंगरूळकर, श्री. सतीश आळेकर व श्री. जब्बार पटेल यांनी भाग घेतला.

विदर्भातील एक नामवंत कवी प्रा. देवीदास सोटे यांचे दि. २३ ऑगस्ट रोजी साहित्य-परिषदेच्या वतीने काव्यवाचन झाले.

महाराष्ट्र-साहित्य-परिषदेचे जुने पदाधिकारी व लोकशिक्षणकार कै. जांभेकर यांच्या छायाचित्राचे अनावरण दि. २५ ऑगस्ट रोजी करण्यात आले. अध्यक्षस्थानी प्रा. दे. द. वाडेकर होते. या प्रसंगी प्रा. गं. बा. सरदार यांचे ' जांभेकर: व्यक्ति आणि कार्य ' या विषयावर व्याख्यान झाले.

दि. १० ऑक्टोबर रोजी कै. विनायक कोंडदेव ओक यांच्या स्मृतिदिनानिमित्त डॉ. रा. शं. वाळिंबे यांच्या अध्यक्षतेखाली ' बाल वाङ्मयः स्वरूप आणि अपेक्षा ' या विषयावर परिसंवाद आयोजित करण्यात आला होता. श्री. अमरेंद्र गाडगीळ, श्री. सुधाकर प्रभु, श्री. यदुनाथ थत्ते व सौ. सरिता पदकी यांनी या परिसंवादात भाग घेतला.

साहित्य-परिषद व कॉंटिनेंटल प्रकाशन पुणे यांच्या वतीने दि. १३ ऑक्टोबर रोजी लोकहितवादी स्मृतिदिनानिमित्त डॉ. फडकुले यांच्या ' लोकहितवादी : काल आणि कर्तृत्व ' या ग्रंथाच्या अनुरोधाने ' लोकहितवादींचे आजचे महत्त्व ' या विषयावर परिसंवाद आयोजित करण्यात आला होता. प्रा. चंद्रशेखर बर्वे, डॉ. विद्याधर पुंडलिक, डॉ. वसंत क्षीरे, श्री. प्रभाकर पाध्ये व डॉ. फडकुले यांनी परिसंवादात भाग घेतला. अध्यक्षस्थानी डॉ. रा. शं. वाळिंबे हे होते.

माधव ज्यूलियन यांच्या ३४ व्या स्मृतिदिनानिमित्त डॉ. द. न. गोखले यांचे ' गाजलेले वरदा प्रकरण ' या विषयावर दि. २९ नोव्हेंबर रोजी डॉ. रा. शं. वाळिंबे यांच्या अध्यक्षतेखाली व्याख्यान झाले.

**४. शताब्दी उत्सव :**

काही विख्यात वाङ्मयसेवकांच्या जन्मशताब्दींनी हे वर्ष गाजले. कर्मवीर विठ्ठल रामजी शिंदे, कविवर्य भा. रा. तांबे व खॉं साहेब अब्दुल करीम खॉं यांच्या जन्मशताब्दीचे हे वर्ष होते, तसेच निबंधमाला शताब्दीचेही हे वर्ष होते. परिषदेने हे जन्मशताब्दीदिन विशेष प्रकारे साजरे केले.

कर्मवीर विठ्ठल रामजी शिंदे यांच्या जन्मशताब्दीनिमित्त महाराष्ट्र-साहित्य-परिषद व पुणे विद्यापीठ यांच्या वतीने रविवार दि. २२ एप्रिल १९७३ रोजी प्रा. गं. बा. सरदार यांचे ' महर्षी शिंदे आणि महाराष्ट्रातील सामाजिक विचारप्रवाह ' या विषयावर व्याख्यान झाले. तसेच जातीयता निर्मूलन समिती व साहित्य-परिषदेच्या वतीने दि. २८ एप्रिल रोजी तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांचे ' महर्षी विठ्ठल रामजी शिंदे :

व्यक्ती व कार्य ' या विषयावर व्याख्यान झाले. अध्यक्षस्थानी प्रा. श्री. ना. बनहट्टी हे होते.

महाराष्ट्र-साहित्य-परिषद, भरत नाट्य-संशोधन मंदिर व अब्दुल करीम खाँ संगीत प्रचारक मंडळ मुंबई या संस्थांच्या वतीने ९ ऑक्टोबर रोजी डॉ. रा. शं. वाळिंबे यांच्या अध्यक्षतेखाली भरत नाट्य मंदिरात खाँ साहेबांची जन्मशताब्दी साजरी करण्यात आली. पं. बाळकृष्णबुवा कपिलेश्वरी यांनी लिहिलेल्या खाँ साहेबांच्या ग्रंथाचे प्रकाशन या प्रसंगी करण्यात आले. तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी व डॉ. भीमराव कुलकर्णी यांची या प्रसंगी भाषणे झाली.

कविवर्य भा. रा. तांबे यांच्या जन्मशताब्दीनिमित्ताने शनिवार दि. १७ नोव्हेंबर रोजी प्रा. रमेश तेंडुलकर व डॉ. हेमंत इनामदार यांची 'तांबे यांची कविता' या विषयावर डॉ. रा. शं. वाळिंबे यांच्या अध्यक्षतेखाली व्याख्याने झाली. रविवार दि. १८ नोव्हेंबर रोजी तांबे यांच्या निवडक कवितांचे गायन झाले. श्री. गजानन वाटवे, श्री. बबनराव नावडीकर, कु. भारती कुलकर्णी व कु. शीला जोशी यांनी तांबे यांच्या कवितांचे गायन केले. या कार्यक्रमाचे संचालन श्री. व्यंकटेश माडगूळकर यांनी केले.

निबंधमाला शताब्दीनिमित्त दि. २५ जानेवारी १९७४ रोजी डॉ. वि. रा. करंदीकर यांचे ' मालाकारांचे व्यक्तिमत्त्व ' व डॉ. हेमंत इनामदार यांचे ' मालेचे वाङ्मयीन कार्य ' या विषयावर डॉ. रा. शं. वाळिंबे यांच्या अध्यक्षतेखाली व्याख्याने झाली.

### ५. निबंधमालाकारांचे कागदपत्र साहित्य परिषदेला अर्पण :

निबंधमालाकार श्री. विष्णुशास्त्री चिपळूणकरजयंतीनिमित्त म. म. द. वा. पोतदार यांच्या संग्रही असलेले श्री. विष्णुशास्त्री चिपळूणकर यांच्या हस्ताक्षरातील कागदपत्र अर्पण करण्याचा समारंभ दि. १० मे १९७३ रोजी आयोजित करण्यात आला होता. अध्यक्षस्थानी प्रा. श्री. ना. बनहट्टी होते. म. म. द. वा. पोतदार यांचे या प्रसंगी भाषण झाले. परिषदेचे अध्यक्ष डॉ. रा. शं. वाळिंबे यांनी कृतज्ञतापूर्वक कागदपत्र स्वीकारले.

कै. प्रा. अ. का. प्रियोळकर यांच्या संग्रही असलेला श्री. विष्णुशास्त्री चिपळूणकर यांच्या हस्ताक्षरातील एक कागदपत्रसंग्रह प्रा. प्रियोळकर यांच्या पत्नी श्रीमती प्रियोळकर यांनी मुद्दाम साहित्य परिषदेला दिला. परिषदेने कृतज्ञतापूर्वक तो स्वीकारला.

### ६. रविकिरण मंडळ सुवर्ण महोत्सव

साहित्य-परिषदेच्या वतीने रविवार दि. ९ सप्टेंबर १९७३ रोजी डॉ. रा. शं. वाळिंबे यांच्या अध्यक्षतेखाली रविकिरण मंडळाचा सुवर्ण महोत्सव मोठ्या थाटात साजरा करण्यात आला. रविकिरण मंडळाचे सदस्य श्री. वि. द. घाटे, राजकवी यशवंत, श्री. श्री. बा.

रानडे व कु. माधुरी पारसनीस यांचा या प्रसंगी सत्कार करण्यात आला. कवी गिरीशांचे बंधू व कै. माधवराव पटवर्धन यांचे सुपुत्र यांचाही या प्रसंगी सत्कार करण्यात आला. प्रा. श्री. के. क्षीरसागर, श्री. मो. ज्ञा. शहाणे, श्री. गोपीनाथ तळवलकर व डॉ. अनुराधा पोतदार यांची या प्रसंगी भाषणे झाली. श्री. श्री. बा. रानडे यांनी कै. मनोरमाबाई रानडे यांची एक कविता व नाट्यछटाकार दिवाकर यांची एक नाट्यछटा वाचून दाखविली. कु. माधुरी पारसनीस हिने आपली एक कविता सादर केली. सत्काराला रविकिरण मंडळाच्या वतीने राजकवी यशवंत यांनी उत्तर दिले.

## ७. टेंबे व्याख्यानमाला

कोल्हापूर येथे दि. ५, ६, डिसेंबर १९७३ या दिवशी महाराष्ट्र-साहित्य-परिषदेच्या कोल्हापूर शाखेच्या वतीने कै. टेंबे व्याख्यानमाला साजरी झाली. या प्रसंगी प्रा. गंगाधर गाडगीळ यांची दोन व्याख्याने प्राचार्य म. द. हातकणंगलेकर यांच्या अध्यक्षतेखाली झाली. व्याख्यानांचे विषय (१) हरिभाऊंची सदाशिव पेठ (२) माडगुळकरांचा माणदेश हे होते.

कोल्हापूर शाखा सभेचे अध्यक्ष डॉ. एस्. एस्. भोसले, त्यांचे सहकारी व टेंबे कुटुंबीय मंडळी यांच्या सहकार्याने व्याख्यानांचा कार्यक्रम यशस्वी झाला.

## ८. सत्कार, सन्मान व भेटी

सुप्रसिद्ध साहित्यिक व साहित्य-परिषदेचे उपाध्यक्ष श्री. रणजीत देसाई यांना 'पद्मश्री' ही पदवी राष्ट्रपतींनी प्रदान केल्याबद्दल दि. १७ जून १९७३ रोजी परिषदेच्या वतीने सत्कार करण्यात आला.

महाराष्ट्रातील एक ख्यातनाम शिक्षणतज्ज्ञ व साहित्यिक डॉ. ग. श्री. खैर यांच्या अमृत महोत्सवाप्रित्यर्थ परिषदेच्या वतीने दि. २४ जून १९७३ रोजी त्यांचा सत्कार करण्यात आला.

यवतमाळ साहित्य-संमेलनाचे अध्यक्ष म्हणून महाराष्ट्रातील ख्यातनाम कवी श्री. ग. दि. माडगूळकर यांची निवड झाली. त्याप्रीत्यर्थ साहित्य परिषदेच्या वतीने दि. १५ ऑक्टोबर रोजी त्यांचा सत्कार करण्यात आला.

साहित्य परिषदेचे सदस्य व प्रख्यात कवी सुधांशु यांना यावर्षी पद्मश्री ही पदवी राष्ट्रपतींनी प्रदान केल्याबद्दल त्यांचा परिषदेच्या कार्यालयात परिषदेच्या वतीने दि. २९ मार्च रोजी त्यांचा सन्मान करण्यात आला.

पुणे महानगरपालिकेचे उपमहापौर श्री. श्रीकृष्ण वैद्य यांनी २९-९-७३ रोजी साहित्य-परिषदेस भेट दिली. साहित्य-परिषदेचे कामकाज पाहून त्यांनी समाधान व्यक्त केले.

बांगला देशातील जहांगीर विद्यापीठाच्या बंगाली भाषा विभागाचे प्रमुख डॉ. मुस्ताफा नुरुल इस्लाम यांनी दि. १८ ऑक्टोबर रोजी साहित्य-परिषदेस भेट दिली. परिषदेचे अध्यक्ष डॉ. वाळिंबे यांनी त्यांचे स्वागत केले. त्यांच्याशी झालेल्या चर्चेत प्रा. ग. प्र. प्रधान, प्रा. य. दि. फडके, डॉ. रा. ना. दांडेकर, डॉ. वसंत जोशी, डॉ. भालचंद्र फडके, श्री. राजेन्द्र बनहट्टी आदींनी भाग घेतला.

## ९. अभीष्ट चिंतन

सुप्रसिद्ध कवयित्री सौ. पद्मा गोळे यांच्या षष्ट्यब्दीपूर्तीनिमित्त, प्रसिद्ध साहित्यिक प्रा. ना. सी. फडके यांच्या वाढदिवसानिमित्त, सुप्रसिद्ध लेखक व चिंतक प्रा. गं. बा. सरदार यांच्या ६५ व्या वाढदिवसानिमित्त व प्राचार्य न. गो. सुरू यांना ७५ वर्षे पूर्ण झाली यानिमित्त त्यांचे परिषदेच्या वतीने अभीष्ट चिंतन करण्यात आले.

## १०. महामंडळ व साहित्यसंमेलन

या वर्षात महामंडळाच्या तीन सभा झाल्या. या अनुक्रमे यवतमाळ, मुंबई व पुणे येथे झाल्या. महामंडळाच्या वतीने यवतमाळ येथे दि. २०, २१, २२, रोजी संमेलनाध्यक्ष कविवर्य पद्मश्री ग. दि. माडगूळकर यांच्या अध्यक्षतेखाली अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलन मोठ्या थाटात पार पडले.

### सुवर्ण महोत्सवी साहित्य संमेलन इचलकरंजीला

५० व्या सुवर्ण महोत्सवी साहित्य संमेलनाचे निमंत्रण महाराष्ट्र-साहित्य-परिषदेने दिले व ते महामंडळाने स्वीकारले. हे संमेलन नोव्हेंबर–डिसेंबरमध्ये इचलकरंजीमध्ये घेण्याचे निश्चित झाले आहे.

## ११. महामंडळाचे नवे पदाधिकारी

पुढील तीन वर्षांसाठी महामंडळाचे अध्यक्ष म्हणून डॉ. भाऊसाहेब कोलते, उपाध्यक्ष म्हणून प्रा. गंगाधर गाडगीळ, कार्यवाह म्हणून डॉ. भीमराव कुलकर्णी व कोषाध्यक्ष म्हणून श्री. बापूराव नाईक यांची निवड झाली आहे.

## १२. वाङ्मयेतिहास :

वाङ्मयेतिहासाचे तीन, चार, पाच हे तीन खंड तयार झाले आहेत. खंड दोनच्या कामाला या खंडाचे संपादक डॉ. स. गं. मालशे यांनी सुरुवात केली आहे. खंड 'सहा' चे काम या खंडाचे संपादक प्रा. नरहर कुरुंदकर यांनी बरेच पूर्ण केले आहे.

### वाङ्मयेतिहास खंड पंतप्रधानांना अर्पण :

महाराष्ट्र साहित्य पत्रिकेचे संपादक डॉ. भालचंद्र फडके यांनी खासदार कस्तुरे यांच्या

अनुक्रमणिका






समवेत दि. २१ डिसेंबर रोजी भारताच्या पंतप्रधान श्रीमती इंदिरा गांधी यांची दिल्ली येथे भेट घेऊन वाङ्मयेतिहासाचे तीन, चार, पाच हे खंड त्यांना अर्पण केले व या खंडांच्या प्रकाशनाचे त्यांना आमंत्रण दिले व त्यांनी ते स्वीकारले.

### प्रा. रा. श्री. जोग यांना वाङ्मयेतिहास खंड अर्पण :

वाङ्मयेतिहास खंड ३, ४, ५ चे संपादक प्रा. रा. श्री. जोग यांना दि. ३ जानेवारी १९७४ रोजी त्यांच्या निवासस्थानी जाऊन वाङ्मयेतिहास खंड, ३, ४, ५ परिषदेचे अध्यक्ष डॉ. रा. शं. वाळिंबे यांच्या हस्ते अर्पण करण्यात आले. याप्रसंगी शाल, श्रीफळ आदीही अध्यक्षांच्या हस्ते त्यांना अर्पण करण्यात आले, परिषदेचे पदाधिकारी डॉ. भीमराव कुलकर्णी, प्रा. डॉ. भालचंद्र फडके, श्री. मधुकाका कुलकर्णी, श्री. रा. ज. देशमुख व श्री. वासू देशपांडे या प्रसंगी उपस्थित होते.

### पुणे विद्यापीठाची देणगी

पुणे विद्यापीठाने वाङ्मयेतिहास खंड ३ व ५ यांना रु. २५०० चे प्रकाशन अनुदान दिले आहे. साहित्य-परिषद विद्यापीठाची ऋणी आहे.

### १३. दुखवटा व शोकसभा :

१९७३-७४ या सालात महाराष्ट्र-साहित्य-परिषदेचे काही ऋणानुबंधी, स्नेही यांचे दुःखद निधन झाले. प्रा. अ. का. प्रियोळकर, श्री. वि. वि. बोकील, श्री. य. रा. दाते, प्रा. दि. के. बेडेकर, श्री. लालजी पेंडसे, कवी गिरीश, प्रबोधनकार ठाकरे, 'जागृति'-कार भ. व. पाळेकर व के. नारायण काळे यांच्या दुःखद निधनाबद्दल शोकसभा घेण्यात आल्या. सरदार आबासाहेब मुजुमदार, गोव्याचे मुख्यमंत्री दयानंद बांदोडकर, प्रा. म. दा. साठे, श्रीमती सुधा अत्रे, विदर्भातील कवी श्री. ना. ना. हूड, चरित्रकार श्री. नी. म. केळकर, प्रकाशक वा. ग. ढवळे, सौ. हिरा कर्नाड, कवी शं. द. भोसले, डॉ. मि. अ. परब, श्री. अ. वा. मराठे श्री. शंकर घाणेकर, श्री. दिवाकर कृष्ण, शिक्षण तज्ञ श्री. नी. वा. किंकर, श्री. अ. ह. लिमये इत्यादी परिषदेशी ऋणानुबंध असणाऱ्या माननीय व्यक्तींच्या दुःखद निधनाबद्दल कार्यकारी मंडळाने दुखवटा व्यक्त केला.

### १४. परीक्षा

### पारितोषिक वितरण समारंभ

साहित्य परिषदेच्या १९७३ सालच्या विविध परीक्षांत उत्तीर्ण झालेल्या विद्यार्थ्यांना प्रमाणपत्रे व पारितोषिक विजेत्यांना पारितोषिके देण्याचा समारंभ रविवार दि. १५ जुलै १९७३ रोजी न्यू इंग्लिश स्कूल रमणबागचे मुख्याध्यापक श्री. माधवराव टिळक यांच्या हस्ते झाला.

अनुक्रमणिका

जानेवारी १९७४ मध्ये झालेल्या परिषदेच्या परीक्षांची १२ केंद्रे होती. सर्व केंद्रांना मिळून पुढीलप्रमाणे उमेदवार बसले आणि उत्तीर्ण झाले.

| परीक्षा | बसले | उत्तीर्ण झाले |
|---|---|---|
| प्रथमा | ३४२ | १८८ |
| प्रवेश | ५७ | ५३ |
| प्राज्ञ | ५८ | २३ |
| विशारद | ३१ | १९ |
| आचार्य ( पूर्ण ) | ३ | ३ |
| आचार्य ( भाग २ ) | ३ | १ |
| | ४९४ | २८७ |

**१९७४ मधील परीक्षांची केंद्रे** ( १ ) पुणे, नू. म. वि. प्रशाला, ( २ ) अष्टे, महात्मा गांधी विद्यालय. ( ३ ) बार्शी, सुलाखे हायस्कूल ( ४ ) हिंगोणे, जीवन शिक्षण विद्यामंदिर, (५ ) वडजी, श्रीशिवाजी विद्या मंदिर, ( ६ ) खोपोली, जनता विद्यालय, ( ७ ) कर्जत, अभिनव ज्ञान मंदिर. ( ८ ) केरी–पेडणे (गोवा) (९) माटुंगा–हिंदी हायस्कूल. ( १० ) पारनेर–सेनापती बापट विद्यालय. (११) माहीम–कॅनोसा हायस्कूल ( १२ ) देवळाली कॅम्प.

**पारितोषिके :**

(१) न्या. म. गो. रानडे पारितोषिक.

**प्राज्ञ** : प्रथम क्रमांक रु. ५० ओक संजय नरहरी, पुणे.

( २ ) कै. अंतुकाका भिडे भोरकर पारितोषिक.

**विशारद** : द्वितीय क्रमांक रु. २५ नगरकर विजया श्रीधर, पुणे.

(३) म. सा. परिषद पारितोषिके

**विशारद** : प्रथम क्रमांक रु. २५ कुवळ उल्हासकुमार बापू– केरी (गोवा)

**प्रवेश** : प्रथम क्रमांक रु. १५, पेडणेकर वासुदेव श्रीधर–– केरी

**प्रथमा** : प्रथम क्रमांक रु. १० जोशी श्यामला बाळकृष्ण, कर्जत.

**परीक्षा वर्ग** : जुलै ते डिसेंबर अखेर प्राज्ञ, विशारद व आचार्य या तीन परीक्षांचे वर्ग चालवण्यात आले. वर्गास पुढील व्यक्तींनी मार्गदर्शन केले. डॉ. म. वि. गोखले, डॉ. गं. ना. जोगळेकर, डॉ. मु. श्री. कानडे, डॉ. भीमराव कुलकर्णी, डॉ. वि. रा. करंदीकर, श्री. मो. रा. वाळंबे, प्रा. सौ. ललिता कुंभोजकर, डॉ. सुधाकर भोसले, डॉ. भा. दि फडके, डॉ. स. गं. मालशे, श्री. श्री. स. गोसावी, श्री. न. म. जोशी, प्रा. द. दि. पुंडे, डॉ. हे. वि. इनामदार, सौ. लीला दीक्षित, सौ. छाया गोडबोले. प्रा. सौ. लद्दू प्रा. वि. भा. देशपांडे.

## १५. साहित्य-पत्रिका

इतिवृत्त वर्षात साहित्य-पत्रिकेचे तीन अंक प्रकाशित झाले. वाङ्मय समालोचन विशेषांक, महर्षी विठ्ठल रामजी शिंदे अभिवादन अंक, कविवर्य तांबे विशेषांक हे विशेषांक प्रसिद्ध करण्यात आले. वृत्तपत्रे, रसिक, समालोचक, साहित्य-परिषदेचे सभासद आदी सर्वांनीच या अंकांचे स्वागत केले. डॉ. भालचंद्र फडके आणि संपादन समिती यांनी विशेष परिश्रम घेऊन हे अंक संपादित केले.

## या वर्षात परिषदेकडे आलेली नियतकालिके

दैनिके : सकाळ, तरुण भारत, संध्या ( पुणे, नागपूर ), गोमंतक

साप्ताहिके : साधना, प्रतोद, मार्मिक, विवेक, प्रबोधन चंद्रिका, अर्थ, प्रेरणा, माणूस, मराठवाडा, महाराष्ट्र, मनोहर.

पाक्षिके : अमेरिकन वार्ताहर, समाज पत्रिका, सोवियत देश.

मासिके : किर्लोस्कर, स्त्री, सत्यकथा, युगवाणी, उद्यम, प्रतिष्ठान, प्रसाद, नवभारत, अमृत, साहित्य सहकार, वाचनालय, पी. ई. एन्. सन्मति, आनंद, कुमार, आलोचना, सह्याद्री, मायमराठी, भारत मित्र, मराठी विज्ञान पत्रिका, क्रीडा खबर, टि. म. विद्यापीठ पत्रिका, राजस, लोकराज्य, किशोर.

त्रैमासिके : मराठी संशोधन पत्रिका, ज्ञानेश्वर, भारतीय इतिहास:आणि संस्कृति, पुणे विद्यापीठ पत्रिका, भा. इ. सं. मंडळ त्रैमासिक, डेक्कन कॉलेज रिसर्च बुलेटिन.

## १६. नवीन आजीव सभासद

(१) श्री. मा. ना. आचार्य चौल ( कुलाबा ) ( २ ) श्री. सतिश मेहता कोपरगाव (३) श्री. मा. ना. राजहंस– पुणे ( ४ ) सौ. सुमन मा. राजहंस– पुणे ( ५ ) प्रा. शं. के. आडकर– अहमदनगर. ( ६ ) श्री. शि. वा. कोल्हटकर– पुणे ( ७ ) प्रा. चंद्रकांत धांडे– पैठण. ( ८ ) श्री. श्री. ल. भातंब्रेकर– औसा (९) सौ. माणिक पाठक– पुणे (१०) श्री. श्रीकांत राय– अकोला (११) श्री. कु. भा. खांबेटे– पुणे ( १२ ) पं. बाळकृष्णबुवा कपिलेश्वरी– मुंबई ( १३ ) प्रा. प्र. रा. दामले– पुणे.

## १७. वाचनालय व कै. वा. गो. आपटे संदर्भग्रंथालय

या वर्षाच्या पहिल्या सत्रात वाचनालय व ग्रंथालयाचे निमंत्रक म्हणून डॉ. भीमराव कुलकर्णी हे काम पाहात होते. डिसेंबर १९७४ मध्ये श्री. रा. ज. देशमुख परिषदेचे कार्यवाह झाल्यानंतर ते वाचनालय व ग्रंथालय विभागाचे निमंत्रक झाले. त्यांनी वाचनालय व संदर्भ ग्रंथालयातील पुस्तकांची मोजणी सुरू केली. वाचनालयात ७५० पुस्तके एकूण पुस्तकांत कमी आढळली. तसेच संदर्भ ग्रंथालयात आतापर्यंत १६००

पुस्तके कमी आढळली आहेत. तपासण्याचे काम अद्याप पुरे झाले नाही. ते तसेच चालू आहे. वाचनालय हे तुटीत चालते असे पाहून टाइम्स आदी वृत्तपत्रे त्यांनी बंद केली. मासिकांची व पुस्तकांची खरेदीही त्यांनी थांबवली आहे. यंदाच्या वर्षी वाचनालयाला अनुदान रु. ३९३२ मिळाले.

## आभार

परिषदेच्या कार्याला अनेक व्यक्तींचे आणि संस्थांचे साहाय्य लाभत असते. महाराष्ट्र राज्य शिक्षणखाते, साहित्य आणि संस्कृती मंडळ, पुणे महानगरपालिका, या संस्थांनी दिलेल्या अनुदानाचा मुद्दाम उल्लेख करावासा वाटतो. परिषदेच्या कार्याला वृत्तपत्रांनी वेळोवेळी प्रसिद्धी देऊन सहकार्य केल्याबद्दल त्यांचे आभार मानणे आवश्यक आहे. त्याशिवाय विविध व्यक्तींनी आणि संस्थांनी हस्ते परहस्ते परिषदेस हार्दिक सहकार्य दिल्यामुळेच, परिषदेच्या कार्याचा विस्तार करणे. कार्यकर्त्यांना सुलभ झाले. सर्वांना धन्यवाद.

## शाखा सभा वृत्तान्त

### म. सा. परिषद, कोल्हापूर शाखा

म. सा. प. च्या कोल्हापूर शाखेतर्फे चालू वर्षात पुढीलप्रमाणे कार्यक्रम झाले.

कै. गोविंदराव टेंबे व्याख्यानमाला म. सा. परिषदेच्या वतीने कोल्हापूर शाखेने आयोजित केली. या प्रसंगी डिसेंबर १९७३ मध्ये प्रा. गंगाधर गाडगीळ यांची दोन व्याख्याने झाली.

शाखा सभा व श्री लेखन वाचन भांडार, पुणे यांच्या वतीने प्रा. वि. रा. तोडकर यांच्या ' गस्त ' या काव्यसंग्रहाचे सुप्रसिद्ध कवी श्री. नारायण सुर्वे यांच्या अध्यक्षतेखाली प्रकाशन समारंभ झाला. या प्रसंगी प्रा. माळी, प्रा. कवठेकर, प्रा. जाधव, प्रा. कमलाकर दीक्षित, प्रा. सुधाकर पवार व डॉ. भोसले यांची रसग्रहणपर भाषणे झाली.

नाट्याचार्य खाडिलकर जन्मशताब्दीनिमित्त, त्यांचे नातू दैनिक ' नवाकाळ 'चे संपादक श्री. नीळकंठ खाडिलकर यांनी शाखेस दिलेल्या रु. १०० च्या देणगीतून महाविद्यालयीन विद्यार्थ्यांसाठी निबंधस्पर्धा आयोजित करण्यात आली.

कर्मवीर वि. रा. ऊर्फ अण्णासाहेब शिंदे जन्मशताब्दी महोत्सवानिमित्त जिल्हा परिषद, कोल्हापूर यांनी आयोजित केलेल्या शुभारंभ समारंभात शाखेने सहभाग दिला.

याखेरीज चर्चा, परिसंवाद असे कार्यक्रम झाले. सभासदवाढीची मोहीम हाती घेऊन शाखेने ती यशस्वी केली.

शाखेसाठी जाणत्या, जुन्या व अनुभवी मंडळींचे सल्लागार मंडळ नेमण्यात आले. मंडळाचे सन्मान्य सदस्य पुढीलप्रमाणे :

१. बॅरि. डॉ. अप्पासाहेब पवार, कुलगुरू, शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर.

अनुक्रमणिका

२. श्री. शिवाजीराव सावंत

३. श्री. रा. ना. सप्रे

राजर्षी छ. शाहू जन्मशताब्दी व कर्मवीर वि. रा. शिंदे जन्मशताब्दी निमित्त कार्य-क्रम आयोजित करण्यासाठी कोरगावकर ट्रस्ट, कोल्हापूरने शाखेस रु. ५००।– ची देणगी मंजूर केली आहे.

शाखेच्या, विविध थरांतील कार्यकर्त्यांनी शाखेचे काम जोमाने सुरू ठेवले आहे.

## अहमदनगर शाखा

* १५-४-७३ रोजी प्रा. नरहर कुरुंदकर यांचा अहमदनगर शाखा सभेने सत्कार करून साहित्य चर्चेचा कार्यक्रम घडवून आणला.

* नगरचे एक कार्यकर्ते श्री. वसंतराव वैद्य यांच्या 'उद्री' या कादंबरीचे प्रकाशन श्री. सती गोदावरी माता यांच्या हस्ते झाले. श्री. वसंतराव वैद्य व सती गोदावरी माता यांचा सत्कार शाखा सभेने केला.

* परिषदेचे एक सदस्य श्री. अं. ज. घारे यांना आदर्श शिक्षक म्हणून राष्ट्रीय पुरस्कार मिळाला. तसेच प्रा. शं. के. आडकर, प्रा. कु. लीला गोविलकर यांना डॉक्टरेट पदवी मिळाल्याबद्दल शाखासभेच्या वतीने त्यांचे अभिनंदन करण्यात आले.

* शाखा सभेने अहवालसाली स्वामी रामतीर्थ जन्मशताब्दी महोत्सव समिती, रोटरी क्लब लायन्स क्लब, महर्षी विठ्ठल रामजी शिंदे जन्मशताब्दी महोत्सव समिती यांच्याशी सहकार्य करून व्याख्याने, एकांकिका स्पर्धा, निबंध लेखनस्पर्धा, वक्तृत्वस्पर्धा आयोजित केली.

* प्राचार्य ह. कि. तोडमल व प्रा. डॉ. गंगाधर मोरजे यांची महर्षी विठ्ठल रामजी शिंदे यांच्या जीवनावरची चरित्रे समारंभपूर्वक प्रसिद्ध करण्यात आली. श्री. उत्तम शिरवळकर, श्री. जवाहर मुथा यांचेही वाङ्मयीन साहित्य प्रसिद्ध झाले. शाखा सभेने आनंद प्रकट करून त्यांचे अभिनंदन केले.

## संगमनेर शाखा–सभा

(१) २९ नोव्हेंबर 'माधव जूलियन वाङ्मयदर्शन' या विषयावर डॉ. प्रा. सु. रा. चुनेकर यांचे प्राचार्य म. वि. कौंडिण्य यांचे अध्यक्षतेखाली व्याख्यान झाले.

(२) ६ डिसेंबर रोजी कवी श्री. दया पवार यांच्या काव्यवाचनाचा कार्यक्रम अध्यक्ष श्री. वि. श्री. मराळकर यांच्या अध्यक्षतेखाली साजरा झाला.

(३) दि. ८ डिसेंबर रोजी पंडित सीताराम चतुर्वेदी (बनारस) यांचे 'हिंदी नाट्यसाहित्य' या विषयांवर व्याख्यान झाले. अध्यक्षस्थानी प्रा. डॉ. कलवडे हे होते.

(४) १२ जानेवारी रोजी पेटिट विद्यालयातील मराठीचे प्राध्यापक श्री. श्रीकृष्ण

अनुक्रमणिका

गंधे यांच्या कथावाचनाचा कार्यक्रम नगरचे प्राचार्य ह. कि. तोडमल यांच्या अध्यक्षतेखाली पार पडला.

(५) पुणे येथील प्रा. श्री. चंद्रशेखर बर्वे यांचे कै. राम गणेश गडकरी यांच्या स्मृतिदिनानिमित्त भाषण झाले. अध्यक्षस्थानी श्री. फटांगरे हे होते. दि. २३ जानेवारी रोजी हा कार्यक्रम झाला.

(६) कै. रा. ग. गडकरी यांच्या 'एकच प्याला' या नाटकाचे सामुहिक वाचन करण्यात आले. दि. २४ जानेवारी रोजी हा कार्यक्रम झाला.

(७) प्रा बापूसाहेब लिखिते–यांचे "संत एकनाथ महाराज" या विषयावर दि. ७ फेब्रुवारी रोजी व्याख्यान झाले.

**सोलापूर शाखा**

(१) शाखेच्या वतीने ३०–८–७३ रोजी महाविद्यालयीन विद्यार्थ्यांच्या कथास्पर्धा घेण्यात आल्या. परीक्षक म्हणून श्री. जामदार वकील व श्री. पांडुरंग काळे यांनी काम पाहिले. अध्यक्ष श्री. द. मो. दामले व संयोजक प्रा. रतनचंद गांधी होते.

(२) कोजागिरी पौर्णिमेनिमित्त काव्यगायन व वाचन आणि विविध गुणदर्शनाचा कार्यक्रम सरस्वती मंदिर प्रशालेत झाला. संयोजन श्री. रा. व्यं. छत्रपती व प्रा. हिरेमठ यांनी केले. निवेदिका प्रा. यशस्विनी खाडिलकर या होत्या.

(३) खाडिलकर–पांगारकर–केळकर जन्म शताब्दिमहोत्सवाचा समारोप दि. ३०-११-७३ रोजी डॉ. वि. म. कुलकर्णी यांच्या 'नाट्याचार्य खाडिलकर' या व्याख्यानाने करण्यात आला. श्री. द. मो. दामले अध्यक्ष होते. श्री. पांडुरंग काळे व श्री. चंद्रभूषण कुलश्रेष्ठ यांचा सत्कार करण्यात आला.

(४) कै. भा. रा. तांबे जन्मशताब्दि महोत्सवानिमित्त दि. १८-१-७४ रोजी कुचन प्राथमिक शाळेतील बालिकांचे समूहगीत व विविध कार्यक्रम आखण्यात आले होते.

(५) श्री. कवि दत्ता हलसगीकर यांच्या 'आराधना' या काव्यसंग्रहाचे प्रकाशन दि. २९-१-७४ रोजी शाखा-सभा व लक्ष्मी विष्णु साहित्य मंडळाचे वतीने श्री नारायण सुर्वे यांच्या अध्यक्षतेखाली साजरे करण्यात आले. या प्रसंगी म. सा. पत्रिकेचे संपादक डॉ. भालचंद्र फडके उपस्थित होते.

वरील विविध कार्यक्रमांचे आयोजन प्रा. हिरेमठ प्रा. गांधी श्री. रा. व्यं. छत्रपती प्रा. खाडिलकर, श्री. प्रवीण पोटावत्ती इत्यादींचे सहकार्याने करण्यात आले.

डॉ. भिमराव कुलकर्णी
कार्याध्यक्ष

द. वा. डावरे
रा. ज. देशमुख
वासू देशपांडे
कार्यवाह

अनुक्रमणिका





# कार्यकारी मंडळाने सुचविलेल्या घटना दुरुस्त्या

| मूळ घटना | दुरुस्ती |
| --- | --- |
| **६. सभासदवर्ग**-परिषदेचे सभासद पुढील प्रकारचे असतील. | **घटना कलम ६** |
| २. आश्रयदाते-किमान १००० (एक हजार) रुपये देणारे. | २. आश्रयदाते-किमान २००० (दोन हजार) रुपये देणारे. |
| ३. साहाय्यक-किमान ५०० (पाचशे) रुपये देणारे. | ३. साहाय्यक-किमान १००० (एक हजार) रुपये देणारे |
| ४. हितचिंतक-किमान २५० (अडीचशे रुपये देणारे. | ४. हितचिंतक-किमान ५०० (पाचशे) रुपये देणारे |
| ५. आजीव-किमान १०० (शंभर) रुपये देणारे (१ ते ५ मधील रक्कम एक वर्षाच्या आत पुरी करावी.) | ५. आजीव-किमान २०० (दोनशे) रुपये देणारे |
| ६. साधारण-वार्षिक रु. ५ (पाच) देणारे. | ६. साधारण-वार्षिक रु. १५ (पंधरा) देणारे. |
| **८. सभासदांचे अधिकार**—परिषदेच्या सभासदास पुढील अधिकार राहतील : परिषदेच्या सर्व सभांस उपस्थित राहणे, तेथे होणाऱ्या चर्चेत भाग घेणे, मत देणे, कार्यकारी मंडळाने गुप्त म्हणून ठरवून ठेवलेल्या कागदपत्राव्यतिरिक्त हिशोब दप्तर व इतर कागदपत्र पाहावयास मागणे, साहित्यमहामंडळाच्या संमेलनाचे प्रतिनिधी होणे, तसेच इतर सर्व प्रकारचे सभासदत्वाचे मूलभूत हक्क राहतील. मात्र ज्यांच्या सभासदत्वाला बारा महिने पूर्ण झाले असतील अशा सभासदानांच त्रैवार्षिक निवडणुका, घटनाविषयक प्रश्न आणि वार्षिक सभांतील कामकाज याबाबतीत मत देण्याचा हक्क राहील. ज्या साधारण सभासदाकडे एक वर्षाची बाकी थकली असेल त्यास परिषदेची 'पत्रिका' मिळणार | **घटना कलम ८**<br><br>"मात्र त्याने ही बाकी दिल्यास त्यास मागील वर्षाचे अंक शिल्लक असल्यास मिळतील" हे या कलमातील वाक्य गाळावे. |

अनुक्रमणिका

| मूळ घटना | दुरुस्ती |
| --- | --- |
| नाही. **"मात्र त्याने ही बाकी दिल्यास त्यास मागील वर्षाचे अंक शिल्लक असल्यास मिळतील."** कोणत्याही सभासदास राजीनामा देता येईल. मात्र वर्गणी परत मागण्याचा अधिकार राहणार नाही. | |
| **२१. का. मं. ची मागणी सभा**- कार्यकारी मंडळाच्या सहा सभासदांनी विशेष महत्त्वाच्या कामाकरिता लेखी मागणी केल्यास तशी सभा चिटणीसांनी निदान चार दिवस अगोदर सूचना देऊन भरविली पाहिजे. | **घटना कलम २१**<br>या कलमातील ६ सभासदांच्याऐवजी ५ सभासद अशी दुरुस्ती करण्यात यावी. या कलमाच्या शेवटी खालील वाक्य जोडण्यात यावे.<br>"या विशेष सभेस गणसंख्येची आवश्यकता आहे. गणसंख्येच्या अभावी तहकूब सभेसही गणसंख्या आवश्यक आहे. ही गणसंख्या ८ असावी." |
| **२४. द्रव्यनिधी व खर्च**-वर्गण्या, देणग्या, बाकी रकमा वगैरे वसूल करण्याचे, पावत्या देण्याचे आणि दैनंदिन हिशेब ठेवण्याचे काम कार्यवाहांचे आहे. "अशा वसुलीतून किरकोळ खर्चाकरता ५०(पन्नास) रुपयेपर्यंतची रकम कार्यालयात ठेवून बाकीच्या वसूल रकमा कार्यवाहांनी बँकेत जमा कराव्या व खर्चाकरिता संमती असेल त्याप्रमाणे वेळोवेळी कोषाध्यक्षांकडून रकमा मागवून घ्याव्या. कोषाध्यक्ष आणि कार्यवाह यांनी खर्च अर्थसंकल्पाप्रमाणे होत आहे याकडे लक्ष द्यावे. विशेषप्रसंगी लागणारा अधिक खर्च कार्यकारी मंडळाच्या संमतीने करावा. | **घटना कलम-२४**<br>रुपये पन्नास ऐवजी रु. २५०=०० करण्यात यावेत. |
| **३०. संलग्न संस्था मान्यता**-(आ) संलग्न संस्थांनी नोंदणी आकार पाच रुपये द्यावा व दरवर्षी दहा रुपये वर्गणी द्यावी. | **घटना कलम-३०**<br>(आ) या कलमातील ५ रुपये ऐवजी १० रुपये व दरवर्षी रु. १० ऐवजी १५ रुपये वर्गणी द्यावी अशी दुरुस्ती करण्यात यावी.<br>**दुरुस्त कलम**-संलग्न संस्थांनी नोंदणी आकार रुपये दहा द्यावा व दरवर्षी पंधरा रुपये वर्गणी द्यावी. |

अनुक्रमणिका

| मूळ घटना | दुरुस्ती |
|---|---|
| **३१. शाखा स्थापणे वगैरे**–(आ) त्या त्या विभागातील सभासद त्या शाखेचे सभासद राहतील. शाखेतील सर्व प्रकारच्या सभासदांच्या वर्गणीपैकी एक तृतीयांश रक्कम तिचे कार्य चालविण्यासाठी परिषदेच्या कार्यकारी मंडळाकडून देण्यात येईल. | **घटना कलम–३१ (आ)** या कलमाच्या शेवटी खालील वाक्ये जोडावीत. "शाखा म. सा. प. चे सभासद नोंदत असते. शाखेच्या कार्यकारी मंडळाने नेमलेल्या तीन सभासदांच्या उपसमितीने शाखेकडे आलेल्या सभासदत्वाच्या सर्व अर्जांचा निर्णय करावा व आपल्या शिफारशीसह ते म. सा. परिषदेकडे एक महिन्याच्या आत पाठवावेत. तसेच प्रत्येक शाखेने आपले ताळेबंदपत्रक परिषदेकडे पाठविले पाहिजे. |
| **३३. घटनाबदल**–परिषदेच्या घटनेत बदल करणे झाल्यास तशी घटनादुरुस्तीची सूचना प्रथम कार्यकारी मंडळापुढे आली पाहिजे. नंतर एक महिन्याच्या पूर्वसूचनेने ती त्यासाठी बोलाविलेल्या विशेष साधारण-सभेत विचारार्थ ठेवण्यात यावी. अशी घटनादुरुस्ती संमत होण्यासाठी, सभेस उपस्थित असलेल्या व मतदान करणाऱ्या सभासदांच्या २।३ (दोन तृतीयांश) बहुमताची आवश्यकता आहे. | **घटना कलम ३३** या कलमाच्या शेवटी खालील वाक्य जोडण्यात यावे "साहित्य परिषदेच्या सभासदांना घटनेतील दुरुस्त्यांना संमती वा असंमती पोस्टाने कळविण्याची मुभा असावी. अशा स्वरूपाची पोस्टाने आलेली मते घटना दुरुस्तीस संमत वा असंमत मतात ग्राह्य धरण्यात यावीत." |

**डॉ. भिमराव कुलकर्णी**
कार्याध्यक्ष

**द. बा. डावरे**
**रा. ज. देशमुख**
**वासू देशपांडे**
कार्यवाह

अनुक्रमणिका

महाराष्ट्र साहित्य
शेड्यूल IX नियम
**१ एप्रिल १९७२ ते ३१ मार्च**

| खर्च | रु. पै. | रु. पै. |
|---|---|---|
| पुणे महानगरपालिका कर व भुईभाडे | २८१–६० | |
| वीज | ८४०–५० | |
| इमारत दुरुस्ती | ५२३–९१ | |
| | | १,६४६–०१ |
| **संस्था :** | | |
| पगार व प्रॉव्हिडंट फंड | ८, ९५७–८९ | |
| छपाई व स्टेशनरी | १, ८७३–९२ | |
| टपाल व दूरध्वनी | १, २९४–१० | |
| आतिथ्य | ४०४–२५ | |
| | | १२,५३०–१६ |
| साहित्य-सांस्कृतिक कार्यक्रम | | १,३९६–५० |
| महामंडळ (वर्गणी व प्रवास) | | ७५९–७५ |
| हिशेब तपासनीस | | १५०–०० |
| कार्यकारी मंडळ ( प्रवासादि ) | | २,१४५–१३ |
| निवडणूक खर्च | | ६९–९६ |
| किरकोळ | | ३५०–३१ |
| शाखा-सभा | | ७४४–३३ |
| परीक्षा व वर्ग | | २,१४२–७५ |
| म. सा. पत्रिका | | १३,९१२–७१ |
| वाचनालय पगार व इतर | | ३,३७४–२१ |
| संशोधन | | २३३–६५ |
| कै. टेंवे व्याख्यानमाला | | ३००–०० |
| कै. पंत प्रतिनिधी व्याख्यानमाला | | ८२–५० |
| गोखले पारितोषिक | | १५२–०० |
| न्या. रानडे पारितोषिक | | ५०–०० |
| वाङ्मय-समालोचन ( मानधन ) | | ५०–०० |
| बेरीज पुढे ओढली | | ४०,०८९–९७ |

अनुक्रमणिका

परिषद पुणे ३०

१७ ( १ ) प्रमाणे.

**१९७४ या वर्षाचे उत्पन्न-खर्चपत्रक**

| उत्पन्न | | रु. पै. | रु. पै. |
|---|---|---|---|
| **देणग्या :** | | | ४,४१४-८० |
| सरकारी अनुदान | | १०,३७०-०० | |
| सरकारी अनुदान (वाचनालय) | | ३,९३२-०० | |
| साहित्य संस्कृतिमंडळ अनुदान ( पत्रिका ) | | ५,०००-०० | |
| पुणे महानगरपालिका अनुदान (७२।७३ चे ) | | ५००-०० | |
| | | | १९,८०२-०० |
| **डिव्हिडंट :** | | | १४३-०० |
| **व्याज :** | | | |
| बँक ऑफ महाराष्ट्र ( से. ) | | ३०४-४१ | |
| ,, ,, (ठेवी) | | १,६१७-२५ | |
| सिक्युरिटीज | | १,४३५-०० | |
| | | ३,३५६-६६ | |
| **वजा :** | | | |
| नाट्यशाखा ठेवीकडे | ६५=०० | | |
| गोखले पारितोषिककडे | १८४-५० | — २४९-५० | ३,१०७-१६ |
| **इतर उत्पन्ने** | | | |
| साधारण सभासद वर्गणी | | | ५,२०९-५० |
| संलग्न संस्था वर्गणी | | | ६५-०० |
| वाचनालय | | | ५,९७३-६८ |
| पत्रिका | | | १,५९४-६० |
| बेरीज पुढे ओढली | | | ४०,३०९-७४ |

अनुक्रमणिका







महाराष्ट्र-साहित्य
शेड्यूल IX नियम
**१ एप्रिल १९७३ ते ३१ मार्च**

| खर्च | रु. पैसे | रु. पैसे |
|---|---|---|
| मागील पानावरील बेरीज | | ४०,०८९-९७ |
| **घसारा :** | | |
| इमारत २½ टक्के | २,५५६-३७ | |
| फर्निचर १० टक्के | ३,१६३-८० | |
| वाचनालय १० टक्के | २,०६५-८८ | |
| | | ७,७८६-०५ |
| वाढावा | | ४९०-२२ |

अनुक्रमणिका

परिषद, पुणे ३०

१७ ( १ ) प्रमाणे

**१९७४ या वर्षाचे उत्पन्न–खर्चपत्रक**

| उत्पन्न | | रु. पै. | रु. पै. |
|---|---|---|---|
| मागील पानावरून . | | | ४०,३०९–७४ |
| परीक्षा व वर्गशुल्क | | | २,५३१–२० |
| दूरध्वनी | | | ८४–७० |
| किरकोळ | | | १३–०० |
| वाङ्मय समालोचन | | | १,०००–०० |
| कै. टेंवे व्याख्यानमाला | | | ३००–०० |
| कै. पंतप्रतिनिधी व्याख्यानमाला | | | १००–०० |
| न्या. रानडे पारितोषिक | | | ५०–०० |
| **प्रकाशने :** | | | |
| ७३–७४ मधील विक्री | | ५,००१–७८ | |
| ३१–३–७४ चा साठा | | २६,१७१–९० | |
| वजा–७३–७४ चा खर्च | ४,४१३=९० | ३१,१७३–६८ | |
| १–४–७३ चा साठा | +२२,७८२=१८ | –२७,१९६–०८ | ३,९७७–६० |
| | | | ४८,३६६–२४ |

अनुक्रमणिका

महाराष्ट्र-साहित्य

शेड्यूल VIII नियम

दि. ३१ मार्च १९७४

| निधी व देणी | रु. पै. | रु. पै. |
|---|---|---|
| **स्थिर निधी :** | | |
| मागील ताळेबंदावरून | ६६,२०५-४५ | |
| ७३-७४ ची आजीव सभासद वर्गणी | १,४२२-०० | ६७,६२७-४५ |
| **इतर राखीव निधी :** | | |
| (१) इमारत : मागील ताळेबंदावरून | | ८९,६४४-९४ |
| (२) ग्रंथालय : मागील ताळेबंदावरून | | २३,५७३-१० |
| (३) संशोधन | | ३७५-०० |
| (४) हीरक महोत्सव प्रकाशने | | |
| मागील ताळेबंदावरून | २१,८३२-६२ | |
| ७३-७४ ची ग्रंथविक्री | + १,४५७-८५ | |
| | २३,२९०-४७ | |
| वजा ७३-७४ मधील खर्च | - १५३-०० | |
| | २३,१३७-४७ | |
| ७३-७४ मधील व्याज | ५४-०० | |
| | | २३,१९१-४७ |
| ३१-३-७४ चा साठा | | २९,७११-६८ |
| (५) प्रकाशन निधी : मागील ताळेबंदावरून | | ३३,०९१-२० |
| पुढील पानावर | | २६,७२१४-८४ |

परिषद, पुणे ३०
१७ ( १ ) प्रमाणे,
रोजीचा ताळेबंद

| जिंदगी व येणी | रु. पै. | रु. पै |
|---|---|---|
| **(१) स्थिर जिंदगी :** | | |
| इमारत–लीज होल्ड जागेवर-- | | |
| मागील ताळेबंदावरून | | १,०२,२५४–७० |
| **( २ ) रोखे** ( दर्शनी किंमतीचे ) **:** | | |
| ३ टक्के कन्व्हर्शन लोन १९४६ चे | ५,३००–०० | |
| ३ टक्के कन्व्हर्शन लोन १९४६ चे | २,७००–०० | |
| ४ टक्के ट्रेझरी सेव्हिंग्ज डिपॉझिट १० वर्षे | १,०००–०० | |
| ४॥ टक्के डिफेन्स डिपॉझिट सर्टिफिकेट | १३,०००–०० | |
| ४॥ टक्के डिफेन्स डिपॉझिट सर्टिफिकेट | १३,०००–०० | ३५,०००–०० |
| **( ३ ) शेअर्स :** | | |
| २३ सें. प्रॉव्हिन्स रेल्वेज ( १०० रु. चे ) | २,३००–०० | |
| २५ महाराष्ट्र स्टेट को. बँक ( ५० रु. चे ) | १,२५०–०० | ३,५५०–०० |
| **(४) फर्निचर व डेड स्टॉक :** | | |
| मागील ताळेबंदावरून | ३०,९०८–९६ | |
| ७३–७४ चा खर्च | ७२९–०० | ३१,६३७–९६ |
| **(५) वाङ्मयेतिहास योजना :** | | ३१,१६४–८० |
| पुढील पानावर | | २०३६०७–४६ |

| निधी व देणी | रु. | पैसे | रु. | पैसे |
|---|---|---|---|---|
| मागील पानावरून | | | २,६७,२१४–८४ | |
| ( ६ ) गिरिजा-गंगाधर-जांभेकर पारितोषिक | | | १,४८०–०० | |
| ( ७ ) विश्वनाथ-पार्वती गोखले पारितोषिक | | | | |
| मागील ताळेबंदावरून | ५,७४२–५० | | | |
| ७३–७४ मधील व्याज | १८४–५० | | | |
| | | | ५,९२७–०० | |
| ( ८ ) ह. ना. आपटे पारितोषिक ( ठेव ) | | | १,०००–०० | |
| ( ९ ) अंतुकाका भिडे पारितोषिक ( ठेव ) | | | ५००–०० | |
| ( १० ) नाट्यशाखा देणगी ( ठेव ) | | | | |
| मागील ताळेबंदावरून | १,१३०–०० | | | |
| ७३–७४ मधील व्याज | ६५–०० | | १,१९५–०० | |

परिषद, पुणे ३०

१७ ( १ ) प्रमाणे

**रोजीचा ताळेबंद**

| जिंदगी व येणी | रु. पैसे | रु. पैसे |
|---|---|---|
| ( ६ ) ग्रंथालय मागील ताळेबंदावरून | | २८,०६३–७३ |
| **( ७ ) वाचनालय** | | |
| मागील ताळेबंदावरून | १४,७२७–१९ | |
| ७३–७४ मधील ग्रंथखरेदी | ५,९३१–६३ | |
| | | २०,६५८–८२ |
| ( ८ ) प्रकाशने : ( शिल्लक साठा ) | | २६,१७१–९० |
| ( ९ ) हीरक महोत्सव ( प्रकाशने ) | | २९,७११–६८ |
| ( १० ) वाङ्मयेतिहास ( साठा ) | | २४३–२० |
| ( ११ ) वीज बोर्ड डिपॉझिट | | २६०–०० |

अनुक्रमणिका

महाराष्ट्र साहित्य
शेड्यूल VIII नियम
दिनांक ३१ मार्च १९७४

| निधी व देणी | | रु. पै. | रु. पै. |
|---|---|---|---|
| मागील पानावरून | | | २,७७,३१६-८४ |
| ( ११ ) सांगली शाखा (ठेव) | | | ४००-०० |
| ( १२ ) प्रॉव्हिडं फंड : | | | |
| मागील ताळेबंदप्रमाणे | | ६,३७५-४९ | |
| ७३-७४ मधील जमा | ४१७-९२ | | |
| ७३-७४ मधील व्याज | २९१-५० | ७०९-४२ | ७,०८४-९१ |
| ( १३ ) घसारा : | | | |
| मागील ताळेबंदावरून | | ३९,३८१-४१ | |
| ७३-७४ ची तरतूद | | ७,७८६-०५ | ४७,१६७-४६ |
| ( १४ ) देणी : | | | |
| ॲडव्हान्स (वाचनालय अनामत) | | ८००-०० | |
| ॲडव्हान्स (इतर) | | ४७-०० | |
| हिशेब तपासनीस | | २५०-०० | |
| इतर देणी | | ३८,९३०-५९ | |
| प्रॉ. फंड | | ३८-९८ | ४००६६-५७ |
| ( १५ ) फरक ( मागील ताळेबंदावरून ) | | | ६-६० |
| | | एकूण रू. | ३७२०४२-३८ |

तपासले बरोबर आहे.
जी. एम्. ओक, ॲंड को. चार्टर्ड अकाऊन्टस्
करिता डी. व्ही. साठे

दि. ११ जून १९७४

अनुक्रमणिका

परिषद्, पुणे, ३०
१७ ( १ ) प्रमाणे
**रोजीचा ताळेबंद**

| जिंदगी व येणी | रु. पै. | रु. पै. |
|---|---|---|
| मागील पानावरून | | ३,०८,७१६–७९ |
| ( १२ ) **आयकर वसुली :** मागील ताळेबंदावरून | | १३८–०० |
| ( १३ ) **अखेर शिल्लका :** | | |
| रोख | ५००–७२ | |
| बँक ऑफ महाराष्ट्र ( से. ) | १,१९९–९५ | |
| बँक ऑफ महाराष्ट्र (करंट) | ३९–६५ | |
| बँक ऑफ महाराष्ट्र ( ठेवी ) | २२,४००–०० | |
| स्टेट बँक ( विश्वस्त खाते ) | ४,४१०–६३ | |
| स्टेट बँक ( ठेवी ) | १५,८००–०० | |
| बँक ऑफ महाराष्ट्र ( हीरक महोत्सव ) | ६२८–७५ | |
| जनता सहकारी बँक ( से. ) | ५३८–६५ | |
| प्रॉव्हिडंट फंड ( सेवकवर्ग ) | २,२८४–९१ | |
| प्रॉव्हिडंट फंड ( ठेवी सेवक वर्ग ) | ४,८००–०० | ५२,६०३–२६ |
| (१४) **येणी :** | | १७३–५० |
| ( १५ ) ७३–७४ चा फरक | | ३३१–९५ |
| ( १६ ) **तूट :** | | |
| मागील ताळेबंदावरून | १०,५६९–१० | |
| ७३-७४ चा वाढावा | ४९०–२२ | १०,०७८–८८ |
| एकूण रु. | | ३,७२०४२–३८ |

द. बा. डावरे
रा. ज. देशमुख
वासू देशपांडे
} कार्यवाह

दा. दि. कुलकर्णी
कोषाध्यक्ष

वि. द. घाटे
लक्ष्मणशास्त्री जोशी
विश्वस्त

अनुक्रमणिका

## जमा

| खात्याचे नाव | अंदाज १९७३–७४ | प्रत्यक्ष जमा १९७३–७४ | अंदाज १९७४–७५ |
|---|---|---|---|
| व्याज व डिव्हिडंड | ४,५००=०० | ३,४९९=६६ | ४०००=०० |
| देणग्या | ४,०००=०० | ४,४१४=८० | ५०००=०० |
| सरकारी अनुदान | १०,०००=०० | १०,३७०=०० | १५०००=०० |
| महापालिका अनुदान | ५००=०० | ५००=०० | ५००=०० |
| साहित्य संस्कृती मंडळ-अनुदान | ५,०००=०० | ५,०००=०० | ५०००=०० |
| साधारण सभासद वर्गणी | ५,०००=०० | ५,२०९=५० | ८५००=०० |
| संलग्न संस्था वर्गणी | १५०=०० | ६५=०० | १५०=०० |
| पत्रिका वर्गणी जाहिरात | ५,०००=०० | १,५९४=६० | १६००=०० |
| परीक्षा व वर्ग शुल्क | ३,०००=०० | २,५३१=२० | ३०००=०० |
| किरकोळ | १००=०० | १३=०० | ५०=०० |
| टेंबे व्याख्यानमाला | ३००=०० | ३००=०० | ३००=०० |
| प्रतिनिधी व्याख्यानमाला | १००=०० | १००=०० | १००=०० |
| रानडे पारितोषिक | ५०=०० | ५०=०० | ५०=०० |
| प्रकाशने | ६,०००=०० | ५,००१=७८ | ७०००=०० |
| वाचनालय व ग्रंथालय | ६,०००=०० | ५,९७३=६८ | ६०००=०० |
| अनामत | १,०००=०० | २,४८०=०० | २५००=०० |
| अनुदान | ६,०००=०० | ३,९३२=०० | ४५००=०० |
| ग्रंथालय मेन्टेनन्स | १,२००=०० | — | — |
| ग्रंथालयाकडून अंशतः फेड | २,०००=०० | — | — |

अनुक्रमणिका






परिषद, पुणे ३०

**अर्थसंकल्प**

## खर्च

| खात्याचे नाव | अंदाज १९७३–७४ | प्रत्यक्ष खर्च १९७३–७४ | अंदाज १९७४–७५ |
|---|---|---|---|
| कर व भुईभाडे | ३००=०० | २८१=६० | ३००=०० |
| वीज | १, ०००=०० | ८४०=५० | १०००=०० |
| पगार व प्रॉ. फंड | १२, ५००=०० | ८, ९५७=८९ | १२५००=०० |
| छपाई व स्टेशनरी | २, ०००=०० | १, ८७३=९२ | ३०००=०० |
| टपाल व दूरध्वनी | १, ५००=०० | १, २९४=१० | २५००=०० |
| आतिथ्य | ७००=०० | ४०४=२५ | ६००=०० |
| साहित्य सांस्कृतिक कार्यक्रम | ३, ०००=०० | १, ३९६=५० | २०००=०० |
| महामंडळ | ३००=०० | ७५९=७५ | १०००=०० |
| कार्यकारी मंडळ, वार्षिक सभा | १, ५००=०० | २, १४५=१३ | २५००=०० |
| शाखा सभा | १, ४००=०० | ७४४=३३ | १५००=०० |
| परीक्षा व वर्ग | ३, ०००=०० | २, १४२=७५ | २५००=०० |
| पत्रिका | १५, ०००=०० | १३, ९१२=७१ | १८०००=०० |
| फर्निचर व वस्तू | ५, ०००=०० | ७२९=०० | ५०००=०० |
| किरकोळ | ४००=०० | ३३०=३१ | ५००=०० |
| हिशेब तपासनीस | १५०=०० | २५०=०० | २५०=०० |
| टेंबे व्याख्यानमाला | ३००=०० | ३००=०० | ३००=०० |
| प्रतिनिधी व्याख्यानमाला | १००=०० | ८२=५० | १००=०० |
| रानडे पारितोषिक | १००=०० | ५०=०० | १००=०० |
| भिडे पारितोषिक | ५०=०० | २५=०० | ५०=०० |

अनुक्रमणिका

## जमा

| खात्याचे नाव | अंदाज १९७४-७५ | प्रत्यक्ष जमा १९७३-७४ | अंदाज १९७४-७५ |
|---|---|---|---|
| विश्वस्तांकडून व्याज | ५,००० = ०० | — | ५००० = ०० |
| | ६४,९०० = ०० | ५१,०३५ = २२ | ६८,२५० = ०० |

| | | | |
|---|---|---|---|
| * वाङ्मयेतिहास | ६०,७३१ = ३७ | ३७३१ = ३७ | ५३,००० = ०० |

मागील शिल्लक १५००० = ०० अनुदान

१८,७३१ = ३७

परिषद, पुणे ३०

**अर्थसंकल्प**

## खर्च

| खात्याचे नाव | अंदाज १९७४-७५ | प्रत्यक्ष खर्च १९७३-७४ | अंदाज १९७३-७४ |
|---|---|---|---|
| आपटे पारितोषिक | २०२=०० | – | ३०३=०० |
| गोखले पारितोषिक | १५०=०० | १५२=०० | १५०=०० |
| वकील व कोर्ट फी | २००=०० | – | २००=०० |
| इमारत दुरुस्ती | २, ०००=०० | ५२३=९१ | १५००=०० |
| वाचनालय | १२, ०००=०० | ९, २८१=३४ | १००००=०० |
| प्रकाशने | १०,००० = ०० | ४४१३ = ९० | ४००० = ०० |
| संशोधन | ३००० = ०० | २३३ = ६५ | २००० = ०० |
| प्रचार | ५०० = ०० | — | ५०० = ०० |
| ट्रस्टींकडे | ७००० = ०० | — | ५००० = ०० |
| निवडणूक | २००० = ०० | ६९ = ९६ | — |
| एकूण रु. | ६२,८५२=०० | ५०९९५=०० | ६५,८५३=०० |

| | अंदाज १९७३-७४ | प्रत्यक्ष १९७३-७४ | अंदाज १९७३-७४ |
|---|---|---|---|
| वाङ्मयेतिहास | ९५,००० = ०० | १५,७७५=२७ | ३०,०००=०० |
| | देणी | ६२,२८९=३० | |
| | | ७८,०६४=५७ | |

अनुक्रमणिका





G. M. Oka & Co.

Chartered Accountants
M. P. MARATHE, B. Com., F.C.A.
D. V. SATHE, A. C. A.

Phone : *56143*
Poona 4

## Auditor's Report

Name of the Public Trust : **Maharashtra Sahitya Parishad, Poona**
**( Reg. No. F – 90 )**

We have audited the accounts of the above Public Trust for the year ended 31st March, 1974 and have to report that :

( a ) The accounts are maintained regularly and in accordance with the provisions of the Act and Rules.

( b ) The receipts and disbursements are properly and correctly shown in the accounts.

( c ) The cash balance as at the end of 31st March, 1974 and vouchers in the custody of the Treasurer on the date of audit were in agreement with the accounts. We have not verified physically the cash balance as on 31st March, 1974.

( d ) All books, deeds, accounts, vouchers or other documents or recoreds required by us were produced before us.

( e ) No register of immoveables and moveable property is maintained in the prescribed form. Changes in the properties are not communicated in spite of similar remarks made in last year's report.

( f ) The Treasurer appeared before us and furnished the necessary information required by us.

( g ) No property or funds of the Trust were applied for any object or purpose other than the object or purpose of the Trust.

( h ) There are no outstandings for more than one year and no amounts were written off as bad debts.

( i ) There were no repairs exceeding Rs. 5,000/–.

( j ) No property or money of the Public Trust has been invested contrary to the provisions of Sec. 35 of the Act.

( k ) There are no alienation of the immoveable property contrary to Sec. 36 of the Act.

( l ) Matters which we think should be brought to your notice are set out in notice I to 6 attached to and forming part of the said accounts.

( m ) No cases of irregular, illegal transactions etc. by the Trust have come to our notes during the course of our audit.

( n ) No budget has been filed in the form provided by Rule 16–A.

**For G. M. Oka & Co.**
Chartered Accountants.
( **D. V. Sathe** )
Partner.

अनुक्रमणिका

## Maharashtra Sahitya Parishad, Poona

Note attached to and forming part of the accounts for the year ended 31-3-1974.

( 1 ) Difference in books for the previous year Rs. 6·60 is shown on the liability side of the Balance sheet. Further difference in books Rs. 331·95 for the year is shown on the Assets side of the Balance Sheet.

( 2 ) Sum of Rs. 40/– receivable on account of Interest on 4% Treasury Saving Deposit of Rs. 1,000/– and Rs. 1,027/– Interest on Fixed Deposit with the State Bank of India have not been collected during the year.

( 3 ) " Heerak Mahotsav Nidhi " showed a credit balance of Rs. 23,191·47 as on 31–3–1974, while the balance with Bank of Maharashtra on account of that Fund as on that date was only Rs. 628·75

( 4 ) We have not verified the following Securities and Shares. We were told that they are kept with the State Bank of India for safe custody. No certificate from the Bank has been produced to us.

| | Face value |
|---|---|
| 3% Conversion Loan | Rs. 5,300–00 |
| 3% Conversion Loan | Rs. 2,700–00 |
| 4% Treasury Savings Deposit | Rs. 1,000–00 |
| 4½% Defence Deposit Certificate | Rs. 13,000–00 |
| 4½% Defence Deposit Certificate | Rs. 13,000–00 |

23 Shares of Central Provinces Railways Company Ltd.,

25 Shares of The Maharashtra State Co-oparetive Bank Ltd.

( 5 ) We have not verified the Library Books. Valued in the Balance Sheet at Rs. 20,658·82 nor was a list of the books and method of valuation as on 31st March 1974 was

अनुक्रमणिका

produced to us. We consider Depreciation at 10% on these books as inadequate and no provision for loss of books has been made.

( 6 ) No minute books were made available to us for our verification.

**For G. M. Oka & Co.**
Chartered Accountants,

Poona.
Date : 12th July 1974.

**( D. V. Sathe )**
Partner

अनुक्रमणिका